मानभावी लोकांकरितां धार्मिक ग्रंथ.

# मतिरत्नाकर ग्रंथ १

# व

# दर्शनप्रकाश ग्रंथ २

मुद्रक व प्रकाशक.

शंकर नरहर जोशी,

म्यानेजर चित्रशाळा प्रेस, ८१८ सदाशिव पेठ

पुणें शहर.

किंमत १। रुपया.

# प्रस्तावना.

या आपल्या हिंदुधर्मीत कृतयुगापासून आजपर्यंत बऱ्याच ग्रंथकाव्यादिक, दुर्धर रचना झाल्या व मार्गही पृथक बरेच झाले. परंतु सर्व काव्यरचनेचा एक सांकेत आजपर्यंत जुळलाच नाहीं व एक असतां तर भगवद्गीते मध्यें ॥ बहुशाखा ह्यनंताश्च बुद्धयो व्यवसायिनां ॥ व ॥ वेद वादरताः पार्थ नान्यदस्तीतिवादिनः ॥ ऋषिभिर्बहुधा गीतं छंदोभिर्विविधैः पृथक् ॥ या वाक्याचें कारण नव्हतें, तरी अशा विविध सर्व मतांचा ताळा समुद्रमंथनन्यायें व राजहंसपक्षिन्याये क्षीरनीराचा निवाडा करून सुज्ञजनीं विमल दृष्टीनें वस्तुस्वज्ञान दुग्धप्राशन करावें व स्वाचारें भवबंधादि पुनरावृत्ति चुकवून अविनाश सुखपदाशीं पात्र व्हावें.

मूळ पुस्तकांच्या प्रती शुद्ध न मिळाल्या कारणानें व छापणें गति न माहीत असल्याकारणानें या पुस्तकांत बरेच दोष राहिले आहेत याबद्दल वाचकांकडून माफी असावी. पुढील आवृत्तींत सुधारणा होईल.

या पुस्तकांत परमेश्वरअवतार व आचार्यपद्धती दिल्याच आहेत. या वेगळ्या अवतारआचार्य पद्धति ग्रंथ संपल्यानंतर शेवटीं संस्कृत श्लोक व श्रुति उपनिषदादी भागवत हरीवंश ही लिलामृतसिंधूतील उदाहरणार्थ दिलीं आहेत. व जुने शब्दही पुस्तकांत वापरले आहेत.

| | |
|---|---|
| दर्शन प्रकाश | मतिरत्नाकर |
| शक १५६० | शक १६१७ |
| + ७८ | ७८ |
| १६३८ | १६९५ |

# मतिरत्नाकर अनुक्रमणिका.



# दर्शनप्रकाश अनुक्रमणिका.



|| श्रीचक्रधर प्रसन्न ||

# मति रत्नाकर ग्रंथ १.

|| प्रकरण आदिपुरुष गुरुवर्या नमन ||

ॐनमो आदिपुरुषोत्तमा || अव्यक्ता निर्गूणा निरुपमा ||
श्रीकृष्णनाथा मेघश्यामा | जगद्गुरु || १ || नमन श्रीदत्ता
परब्रम्ह अवतारा | निगमादि सकळ प्रमाणा अगोचरा |
मोक्षमार्ग उपदेशीं प्रथम दातारा | उपकारक तूं || २ ||
तुझा जालेया वर प्रसादु | तयाचा उन्मळे अज्ञानकंदु |
येरानाना जल्प भ्रांतीवादु | झावळें पर्णे || ३ || आतां
नमन प्रथम आचार्या | नागाऽर्जुनादिकां मुनिवर्या || पर-
मार्थी मोक्षवेवसाया | नमन माझें || ४ || आतां जे मज
उपकारभूत | जे हीं उपदेशीला पर सिद्धांत | तया करूं
साष्टांग प्रणिपात | सर्व भावीं || ५ || तयाचेनि प्रसादें
बरवा | जोयथार्थ बोध सुहावा | तो लाधला पुर्व कनवा |
मुनि दिवाकरूं || ६ || तवं शिष्यें विनाविलें भावें | जें
मज यथार्थ ज्ञान निरुपावें | आणि सकळ मतासीं उप-
लवावें | भ्रांती फिठावया || ७ || मग श्रीगुरु म्हणे
शिष्या शिरोमणी | ऐक नाना मतांची मांडणी | आणि
यथार्थ बोध श्रवणी | अवधारिजे || ८ ||

## ॥ प्र० २ सकळ मत संक्षिप्त उपलक्षणं ॥

धांडोळिलीं सकळही मतें । परितियें अघवींच असती विपरितें । नांहीं पदार्थ निर्णयो तेथें । भ्रांति रूपें ॥ ९ ॥ तंव विनउनि पुसे शिष्य । कवणाचा कवण उपदेश । अन्यथात्वीं मानिती विश्वास । ते निरोपावे मज ॥ १० ॥ ऐकुनि शिष्याची विनवणी मग सांगता झाला परज्ञानी । म्हणे म्यां जे केली मतांतर शोधणी । ते आईक आतां ॥ ११ ॥*॥*॥ जेथोनि ज्ञान तेथेंचि अज्ञान । जे शुद्ध तेंचि मळीण । नित्य मुक्त तेथेंचि बंधन । बोलती अविद्येचें ॥ १२ ॥ जेथेंचि सामर्थ्य तेथेंचि दानता । आनंद पुर्ण तेथेंचि दुःख रूपता । परी अभिमानें भरले अद्वैत नसंडिती वादु ॥ १३ ॥ कुतर्क वाचाळपणें । जीवेश्वरा अभेद देखणें । बोधले अन्यथा ज्ञानें । पाखांडियेजे ॥ १४ ॥ म्हणती ब्रह्मचि इच्छा वसे । अविद्या पातलें जीवदशे । जेवीं महदांश घटावकाशें । दिसे भिन्न ॥ १५ ॥

"तत्त्वमासि" इति श्रुतिः ॥

सामवेदस्य महावाक्यं । तत् । त्वं । असि ।
इति पदत्रयं ॥

## ॥ प्र० ३ ब्रह्मपरिणाम मत सृष्टी रचना. ॥

प्रथम तत्त्वमसी मत निर्धारू— । जाण शुद्ध चैतन्य ब्रह्म निराकारू । तेथें इच्छा तेचि माया सोहंकारू । ते अर्ध मात्रका बोलिजे ॥ १६ ॥ तत्पदीं परमात्मा ईश्वरू । त्वपदीं जीवात्मा सविकारू । जो स्वबोध स्वरूपाचा विसरू ।

ते अविद्या बोलिजे ॥ १७ ॥ पूर्ण चैतन्य बोलिजे पर-
मात्मा । प्रत्यक्ष चैतन्य म्हणिजे जीवात्मा । त्रिगुण भूत
संघातु अनात्मा । प्रपंच बोलिजे ॥ १८ ॥ अर्ध मात्रे
पासूनी तीन मात्रुका । अकार उकार मकार आईका ।
तेथें जन्म हरिहर ब्रह्मादिकां । हे ब्रह्मांड रचना ॥ १९ ॥
मुळ प्रकृती देह मात्रुका ॐ कार । परावाचा अभिमानी
सर्वेश्वर । सर्व साक्षी: अवस्था तेथींचा विस्तार । बोलिला
असे ॥ २० ॥ मायादेह तेथ रुद्र अभिमानी । पश्यंती
वाचा मकार जननी । प्रलय अवस्था तिये स्थानीं । बोलिली
असे ॥ २१ ॥ कैलास स्थान । तमोगुण आनंद भोग जाण ।
अव्यक्ता कृति देह प्रमाण । यातेंच म्हणिजे ॥ २२ ॥
हिरण्य गर्भ देह उकार मात्रुका । विष्णु अभिमानी
मध्यमावाचा देखा । स्थिती अवस्था हे तेथींची टिका ।
बोलिली असे ॥ २३ ॥ हेंचि वैकुंठ स्थान । आणि
तेथेंचि सत्वगुण । आनंद भोगुजाण । बोलत असती ॥ २४ ॥
स्थूळ देह ब्रह्मा अभिमानी आईका । सृष्टी अवस्था
अकार मात्रुका । वैखरी वाचा उद्भव सकळिका । निग-
माचा तेथें ॥ २५ ॥ विराट देह ब्रम्हा अभिमानी ऐका ।
सृष्टी (उत्पत्ती) अवस्था अकार मात्रुका । वैखरी वाचा
उद्भव सकाळिका । वेदाचा तेथें ॥ ? ॥ २६ ॥ हें सत्य-
लोक स्थान । जेथें वर्ते रजो गुण । आनंद भोगजाण ।
बोलत असती ॥ २७ ॥ उत्पत्ति स्थिती आणि संहार ।
आईका तिहीं देवाचा व्यापार । आतां सांगेन पुढिल विस्तार ।
जीवात्मयाचा ॥ २८ ॥

## ॥ प्र० ४ जीवात्मा विस्तार ॥

महाकारण देह बोलिजे प्रथम । तेथेंचि प्रत्यगात्मा अभिमानी उत्तम । तुर्या अवस्था तेथें विश्राम । परवाचेचा ॥ २९ ॥ कारणदेह प्राज्ञ अभिमानी । सुषुप्ती अवस्था तिये स्थानीं । मकार मातृका निर्धारुनी । पश्यंती वाचा ॥ ३० ॥ हेंचि हृदयस्थान । येथें बोलिजे तमो गुण । आनंद भोग जाण । प्रतिष्ठिती ॥ ३१ ॥ लिंगदेह अवस्था बोलिजे स्वप्न । तै जस अभिमानी वाचा मध्यमा जाण । उकार मातृका हे कारण । बोलिलें असें ॥ ३२ ॥ येथेंचि कंठस्थान । प्रतिष्ठती सत्वगुण प्रविविक्त ? भोग जाण । बोलत असती ॥ ३३ ॥ स्थूळदेह अभिमानी विश्वतेथींचा । जागृती अवस्था वैखरी वाचा । अकार मात्रुका हा आवाका स्थूळ देहाचा जाणावा श्रोती ॥३४॥ येथें बोलिजे नेत्रस्थान । तथ प्रतिष्ठिला रजो गुण । स्थूळ भोग जाण । आश्रय साक्षी ॥ ३५॥ हे तत्पदाची । उभावणी अष्ट देहांची । सांगितली पंचकरणीची । विस्तारूनिया ॥ ३६ ॥

## ॥ ५ प्रकरण पिंड रचना ज्ञान ॥

आतां सांगो पिंड रचना । जे त्रिविध पंचकाची विवंचना । कवणा पासा व कवणा । विस्तार जाला ॥ ३७ ॥ सात्विक अहंकारा पासूनि देखा । जन्मझाले अंतःकर्ण पंचका । अकळीत वाणी बोलिली ऐका । विस्तारुहा ॥३८॥ मन बुद्धि चित्त अहंकार । अंतःकरण सर्व व्यापार । येणें चिद्वारें विवेक साचार आत्मयासी ॥३९॥ राजस अहंकारा-

पासूनि इंद्रिय पंचक । श्रवण घ्राणः चक्षू रसना त्वक् । रस रूप गंध आळाप पूर्वक । हे विषय पांच ॥ ४० ॥ वाचा पाणी आणि चरण । उपस्थेंद्रिय आणि गुदस्थान । या इंद्रयांचे देहीं वर्तन । सुष्ट दुष्ट कर्में ॥ ४१ ॥ व्यान उदान आणि समान । प्राण आणि आपान । हे पंचविधि वायु रजो गुण । प्रसवता झाला ॥ ४२ ॥ श्रवणादि ज्ञान इंद्रियें पांच । वाचादि कर्मेंद्रियें साच । व्यानादि वायु पांच । रजादि उद्भव जाणा ॥ ४३ ॥ तामस अहंकार म्हणजे तमोर्मी । हें भूत पंचकाची जन्म भूमी । तयाचा प्रकाश सांगेन मी । विस्तारूनिया ॥ ४४ ॥ पहिले विषय पंचक । सांगितले रस रूपादिक । ते तामस अहंकार उत्पादक । जाणावे पैं ॥ ४५ ॥ तामस अहंकारापासाव आकाश झाले । आकाश वायु प्रसवलें । वायुपासाव तेज जन्मलें । प्रकाशरूप ॥ ४६ ॥ तेजापासाव आप जाणा । आपा पासाव पृथ्वीरचना । ऐसी पांच भूतें पंचविसगुणा । विस्तारिती ॥ ४७ ॥

## प्रकरण ६ अस्थि मांस लाळ मुत्र क्षुधा तृषादि वर्णन ॥

### ॥ श्लोक ॥

॥ अस्थि मांसं च नाडीका त्वग्रोमणी तथैव च ॥
॥ पृथिव्याश्च गुणाः पंच ब्रह्मज्ञानेन चोच्यते ॥१॥

ऐका अस्थि मांस आणि त्वचा । रोमनाडी अंश पृथ्वीचा । अवस्था (स्थान वर्ण मुख) आहार तेथींचा

स्वादु सांगेन ॥ ४८॥ वर्ण पिवळा घर स्वाधिष्ठानें । मुख जिव्हा घ्राण स्वादुगोडजाण । आहार गंध हे तेथची खूण । बोलिली असें ॥ ४९ ॥

"श्लोक"

॥ शुक्रशोणितस्वेदाश्च मूत्रं लाला तथैव च ॥
॥ अपां पंच गुणाश्चैते ब्रह्मज्ञानेन चोच्यते ॥ २ ॥

लाळ मुत्र आणि शुक्र श्रोणित ॥ निस्वेद हे आपाचे गुण बोलिजेत ॥ घर नाभी ( लिंगस्थान ) वर्ण श्वेत । मुख उपस्थ बोलिजे (जिव्हा) ॥ ५० ॥ स्वादु क्षार आहार मैथुन । येथून झालें आपाचें व्याख्यान । आतां सांगेन तेजाचें गुण विस्तारुनि ॥ ५१ ॥

"श्लोक"

निद्रा क्षुधा तथा तृष्णा चालस्यं मैथुनं च वै ॥
तेजोगुणाश्च ते पंच ब्रह्मज्ञानेन चोच्यते ॥ ३ ॥

क्षुधा तृषा उष्ण निद्रालस्य । वात कांती हा तेजाचा अंश । वर्ण रक्ताचा असे वास । हृदय ( नाभीं ) स्थानीं ॥ ५२ ॥ मुखनेत्र देखणें बोलिजे आहारु । स्वादु तिखट हा तेजाचा व्यापारू । आतां सांगो पुढिल विस्तारु । वायुतत्वाचा ॥ ५३ ॥

॥ प्र० ७ वायुतत्व रागलज्जाभयादी वर्णन ॥

"श्लोक"

आकुंचनप्रसरणे रोधनं धूनधावने ॥
वायोः पंच गुणाश्चैते ब्रह्मज्ञानेन चोच्यते ॥ ४ ॥

धावणें चळणें आणि संकोचणें । प्रसरणें आणि निरोधणें । हे वायुतत्त्वाचे गुण जाणे ॥ निर्धारेसी ॥ ५४ ॥ घर कंठ ( हृदय ) स्थान वर्ण निळ । मुख त्वचा नासिक स्वादु अम्ल । आहारु परीमळ ( स्पर्शमूळ ) बोलिला असे ॥५५॥

" श्लोक "

रागद्वेषौ तथा लज्जा भयमोहौ भयावहौ ॥
नभोगुणाश्च वै पंच ब्रह्मज्ञानेन चोच्यते ॥ ५ ॥

राग लज्जा आणि भय द्वेष उद्देश । मोह हा आकाशाचा अंश । तयाचा असे रहिवास । ल्लहाट ( कंठ ) प्रदेशीं ॥ ५६ ॥ मुख श्रवण आहार ऐकणें । वर्ण काळा स्वादु कडू जाणें । हे आकाश तत्त्वांचीं लक्षणें । बोलिलें असती ॥ ५७ ॥ ऐका महद्भूताचे हतयार । उर्वीये? फरश अंकुश निरंतर आपाची सुरी सविकार । तेजाचा भाला ॥ ५८ ॥ वायुचे खांडे ओडन । आकाशा नियमिला बाण । हे अनिळ पुराणींची खूण । बोलिली असे ॥ ५९ ॥ " इति अनळ पुराणें "

आप निजे, 'पृथ्वी बोले, । तेज देखे, ' वायू चाले, । आकाश जागे, ' ऐकोनि डोले । आपुला ठाईं ॥ ६० ॥

आतां सांगेन आणिक विचारू । देही दशनाम उच्चारू । यांचीं घरें पृथक् पृथक् व्यापारू । साक्षत्वें निर्धारू बोलिला असे ॥६१॥

" श्लोक "

प्राणोऽपानः समानश्चोदानव्यानौ च वायवः ॥
नागश्च कूर्मः कृकलो देवदत्तधनंजयौ ॥ ६ ॥

प्राण व्यान आणि आपान। उदान देहीं व्यापक समान। नाग कूर्म कृकर। ( किलकिली ) देवदत्त धनंजय। दशप्राण हे ॥ ६२ ॥

" श्लोक "

हृदि प्राणो गुदेऽपानः समानो नाभिसंस्थितः ॥
उदानः कण्ठदेशस्थो व्यानः सर्वशरीरगः ॥ ७ ॥
कर्णे नागोक्षिण कूर्मश्च कृकरो हस्तयोस्तथा ॥
मुखस्थो देवदत्तश्च पृष्ठदेशे धनंजयः ॥ ८ ॥

" तथा चान्ये तु "

घोषे धनंजयो ज्ञेयः क्रंदने कृकरस्तथा ॥
जृंभायां देवदत्तश्च उद्गारे नागनामकः ॥ ९ ॥
उन्मीलने भवेत्कूर्मो दशैवं मारुताः स्थिताः ॥१०॥

प्राण हृदयीं जाणिजे। व्यान सर्व शरिरीं म्हणिजे। आपान गुदस्थानीं बोलिजे। उदान तो कंठीं ॥ ६३ ॥ समान नाभिस्थानीं। नाग बोलिजे कर्णी। कूर्म नेत्री प्रतिष्ठुनी। कृकर दोहीं हातीं ॥६४॥ देवदत्त मुखीं अवधारी। धनंजयो पुष्टीं सपरिवारी। हीं दशवायु घरें दोहा भीतरी। आणि व्यापार आईका ॥ ६५ ॥

॥ प्र० ८ दशवायु व्यापार मत वर्णन ॥

प्राण श्वासोच्छ्वासीं येरझार करी। आणि व्यापारी अन्नोदक आहारी। व्यान रसधातू तेणें शरीरीं। पुष्टी दिसे ॥ ६६ ॥ आपाणें मळ मूत्र सारणें। उदानें देहांतकाळीं

प्रगट होणें । समानें सर्व संधीं बैसणें । लवती हात पाय ॥ ६७ ॥ नागवसें ताळुका कमळीं । कूर्मदृष्टी न्याहाळी । कृकल कर्णक मंडळी । लुब्ध जाहाला ॥ ६८ ॥ देवदत्त मुखा माजीं असे । धनंजयोनाकीं वसे । हे पांचही पवन ऐसे ब्रम्हांडीं असती ॥ ६९ ॥ जांभई देवदत्ताची ढेकर नागाचा । कृकरी उचकी हास्यनाद रुदनाचा ॥ धनंजय व्यापार शिंकेचा । बोलिला असें ॥ ७० ॥ अंगमोडा व्यापार कूर्मप्रचयो । ऐसें बोलिले असती दशवायु । हा समग्र बोलाचासमचयो । पिंड ज्ञान बोलिजे ॥ ७१ ॥

दुसरें मत । जांभई नागाची ढेकुर कूर्माचा । कृकरउचकी नाद रुदनाचा । देवदत्तीं व्यापार शिंकेचा । बोलिला असें ॥ ७२ ॥

## ॥ मत तिसरें ॥

जांभई देवदत्ताची । शिंक धनंजयाची । कृकले हस्य रुदनाची । स्थिती बोलिली असे ॥ ७३ ॥ नाग पाचान गविसी । कूर्म उलमळी नेत्रासी । दशपवनाची करणी ऐसी । जाणिजे पैं ॥ ७४ ॥ कृकल आकाशाचा । नाग वायुचा कूर्म तेजाचा । देवदत्त आपाचा । पृथ्वीचा धनंजय ॥ ७५ ॥

ऐसी हे प्राण सांखळी । वर्तत असे जीव देहाचे मेळीं । आणि प्राणे विण कवणें काळीं । जीव भाव न दिसे ॥ ७६ ॥ ऐसिया रचिलेया प्रपंचा स्थूळा सांगितलेया शाखा तत्त्वें ( साक्षीत्वें ) कळा । या संसार प्रपंच वृक्षाचा निर्वाळा । प्रणव बीजा पासोनी ॥७७॥ असो हें व्याख्यान पिंड निष्पत्तीचें । म्या देखणें सांगितलें अवरीचें । परमग-

वद्वचनविनासाचें। कांहीं मानूंच नये ॥ ७८ ॥ कांजें देवें निरोपिला तत्त्वयोगु। छत्तिसा विभागे क्षेत्र संयोगु । हें जाणे तो क्षेत्रज्ञ बोलिजे चांगु । येर मूढ मतीचा ॥७९॥

॥ श्लोक ॥

भूमिरापोऽनलो वायुः खं मनो बुद्धिरेवच ॥
अहंकार इतीयं मे भिन्ना प्रकृतिरष्टधा ॥ ११ ॥
महाभूतान्यहंकारो बुद्धिरव्यक्तमेव च ॥
इंद्रियाणि दशैकं च पंच चेंद्रियगोचराः ॥ १२ ॥
इच्छा द्वेषः सुखं दुःखं संघातश्चेतना धृतिः ॥
एतत्क्षेत्रं समासेन सविकारमुदाहृतं ॥ १३ ॥

पृथ्वी तेज वायु जीवन । आकाश बुद्धि अहंकार मन । हे भिन्न प्रकृति समान । आष्टधा बोलिली ॥ ८० ॥ येचि पंच महाभूतें जाण । चित्त अहंकार बुद्धी मन । दश इंद्रिये विस्तारून । प्रथमांचि सांगितली ॥ ८१ ॥ दश इंद्रियांचे विषय दश । आणि इच्छा सुख द्वेश । संघात चेतनाधृती हे छत्तीस । विभाग जाण ॥ ८२ ॥ ऐसे विकारे सहीत । संक्षेपें सांगितलें क्षेत्र । याचा विस्तारु समस्त । जाणावा गुरुमुखें ॥ ८३ ॥

॥ श्लोक ॥

गत्युक्त्युत्सर्गशिल्पादिकर्मायतनसिद्धयः ॥ १४ ॥

पादाची गती वाचेची उक्ती चांग। गुदशिष्णा मळ मूल उत्सर्गें भोग । हाताचें ग्रहण त्याग । एवं कर्मेंद्रियाचे विषय ॥ ८४ ॥

॥ श्लोक ॥

अधःशून्यं मध्यशून्यमंत्यशून्यमतीतकं ॥
पंचमं शुद्धचैतन्यमशून्यमपि तत्स्मृतम् ॥ १५ ॥

अधः शून्य आणि मध्य शून्य । उर्ध्व शून्य आणि चतुर्थ शून्य । शुद्ध चैतन्य तें पांचवें शून्यें । तेंनिः शुन्य शून्य बोलिजे ॥ ८५ ॥ अधः शून्य बोलिजे अकारू । मध्य शून्य बोलिजे उकारू । उर्ध्व शून्य म्हाणिजे मकारू । ॐकार चौथें शून्य ॥ ८६ ॥ ये महाशून्य बोलिलीं चतुर्विध । आणिके चार पिंडींचीं जाण प्रसिद्ध । पिंडींचे तेतूं आईके चित्तें सावध । गुरु पुत्रा पैं ॥ ८७ ॥

॥ श्लोक ॥

अधःशून्यं मनोज्ञेयमूर्ध्वशून्यं तु मारुतः ॥
मध्यशून्यं तु जीवात्मा ब्रह्मशून्यं चतुर्थकं॥१६॥

अधः शून्य जाणिजे मन चंचळ । उर्ध्वशून्य पवन ते सर्व बळ । मध्यशून्य जीव चौथें केवळ । अब्रह्म जाणा ॥ ८८ ॥ या चहुं शून्याहुनि परौतें । शुद्ध ब्रह्म स्वरूप जाणिजे निरूतें । तेंथ शून्य हा शब्दाचि न वर्ते । अनंत म्हणोनियां ॥ ८९ ॥

॥ प्र० ९ तार्कीकमत. ॥

आणिक एक तार्कीकांचें मत । ॐकारावर तीन शून्य बोलत । परी तीं जाणावीं जीवकृत । प्रमाण नव्हे ॥ ९० ॥ हे तत्व मस्यादि महावाक्यें । जाणितल्या जीवेश्वरा ऐक्य ।

प्रणव बीज गुण त्रिपंचके । तें पंची कर्ण बोलिजे ॥९१॥ म्हणती ब्रह्मसागरीं तरंग उमटले । ते निज स्वरूपातें विसरले । अविद्या संगें जीवत्व पातले । देहादिकीं ॥ ९२ ॥ जैं होय ज्ञानसूर्याचा प्रकाशु । तैंचि बोलिजे अविद्या तमाचा नाशू। शुद्धांश जालेया ब्रम्हीं संरसू । तो ऐक्य भाव बोलिजे ॥ ९३ ॥ परी येथें आक्षेप असे आईका । रजकदाचित्त इच्छा होय व्यापका । तरी मागुतेया जीव लोका येणें लागेकीं ॥ ९४ ॥ हे केवी घडे ऐसे म्हाणिजे तरी पूर्वीची उपन्नली कवणे काजे। तिये इच्छे ते नेम करी दुजे। कवण असें ॥ ९५ ॥ काजे जो मोक्ष पाविजे ज्ञानबळें । तें ब्रह्म प्रपंची मैळे। तरीं यातेंचि ठेवावें वेगळें। कवणें ठाईं ॥९६ ॥

## श्रुती

### शुद्धोऽहं बुद्धोऽहं नित्यमुक्तोऽहं स्वभावरहितोऽहमिति ॥

ब्रह्म शुद्ध बुद्ध नित्यमुक्त आणि गहन । जीव अविद्यायुक्त सर्व मळीं मळीण । तर जीव ब्रम्ह सलक्षण । कवणें गुणेंघडें ॥ ९७ ॥ आणिक एक आक्षेप अवधारा । शुद्ध ब्रम्ह अविद्ये केथारा । बुद्ध वस्तु तरके असे संसार । अज्ञान बीज ॥ ९८ ॥ ह्मणोनिही अवघी फसवण । जीवासी बाउगीच नागवण। काईसा उपदेश काईसें आचरण । गुरू शिष्याचें ॥ ९९ ॥ सायासे जोडावा एकादा गुरू। मग पुसावा तरणो पाय विचारु । तेणें ही न पारुखे संसारु । तरी हे कुडें मत ॥ १०० ॥ हेन देखीजे आक्षेप अडणी । तरी कांरिगावें उपदेश अडचणी । परी पडिले

असती अभिमानी । नसंडिती वादु ॥१०१॥ जरी जीवासि संसार लटीका। तरी उपाव कैसा साच निका । गुरुशिष्या संवाद ज्ञान टीका । काई करावें ॥ १०२ ॥ असोहे आक्षेप पुर्वेणी । आतां कांहीं बोलूं अपूर्व वाणी । जीव ब्रह्म अनादि पदार्थ दोन्ही । वस्तु विवेक ॥१०३॥

॥ प्र० १० जीव ब्रह्म अनादी आणि भिन्न ॥

जीवो ब्रह्म तथा विद्या संबन्धः सवि भागकः ॥
चिद चिद ग्रन्थ्यहंकारः षडस्माकमनादयः ॥१७॥

यथार्थ निर्णय आईका आतां। ब्रम्हतें जीव नव्हे सर्वथा। तयासी संसारबाधा बोलता । दूषण असे ॥ १०४ ॥ जीव ब्रम्ह अविद्या आणि चैतन्य । चित्ग्रंथी अहंकार साही अनादि भिन्न । संबंध असोनि विभाग जाण । ऐसे वेदांत सिध्द्धांतीं ॥ १०५ ॥

॥ श्लोक ॥

आत्मानमन्यं च स वेद विद्वान् ॥
न पिप्पलादौ नतु पिप्पलादः ॥
योऽविद्यया युक् सुत नित्यबद्धः ॥
विद्यामयोन्यः सतु नित्यमुक्तः ॥ १८ ॥

जीव अज्ञान अविद्यायुक्त समळ । ईश्वर शुद्ध बुद्ध नित्य मुक्त केवळ । आनंद पूर्ण ज्ञान देऊनि करी निर्मळ जीवात्मयातें ॥ १०६ ॥ जीवहा पदार्थ आनादिचा ।

अविद्या वर्तमान मुळींचा । जैसा कलंक लोह धातूचा स्वयंभू असे ॥ १०७ ॥ जरी होय परेशाचा संयोगु । तरी निवर्ते गंधिकाळिमा डागु । तैसा जीव लाधलेया ज्ञानयोगु । ब्रम्हानंदासि योग्य होय ॥ १०८ ॥

जैसे भिंगुरटीचें कारण । आपण स्वरूपें असतां भिन्न । कीटकीये केले समलक्षण । आपुलेनि गुणें ॥ १०९ ॥ तैसा परमेश्वर निराकार निर्गुण । परोपकारें अवतरें आपण । ज्ञान देऊनि करी जीवोद्धारण । परी स्वरूपें भिन्न असें ॥ ११० ॥ जैसें नीर क्षीर मिसळलें । तें क्षीर ऐसें नांव पावले । पर राजहंसें वेगळें देखिलें । स्वरूप दोहींचें ॥ १११ ॥ तैसें ज्ञानें जीव ब्रह्मातें पावे । तया ब्रह्मींचे गुण येती आघवे । परतो वस्तुत्वें ब्रह्म नव्हे । तेथ पावोनि उरी ॥ ११२ ॥ असो हें साध्य प्रकरण व्युत्पत्ती । सांगो साधन राहित पदार्थ स्थिती । जीव बांधले असती प्रकृतीं । निरंतर देखा ॥ ११३ ॥

## ॥ प्र० ११ पुरुष लक्षण ब्रह्मस्वरूप निर्वच ॥

" गीतासु "

**प्रकृतिं पुरुषं चैव विद्ध्यनादी उभावपि ॥**
**विकारांश्च गुणांश्चैव विद्धि प्रकृतिसंभवान् ॥१९॥**

प्रकृती पुरुषाचें लक्षण । हे उभय अनादीचे जाण । प्रकृती तें संभव स्थान । विकार गुणाचें ॥ ११४ ॥ प्रकृतीते माया स्वरूप नित्य । पुरुष शब्दें जीवपदार्थ

सत्य । हें ज्ञान जाणावें दैवकृत । अध्याय तेरावा ॥११॥

॥ गीतायां ॥

**सर्वभूतानि कौन्तेय प्रकृतिं यान्ति मामिकां ॥**
**कल्पक्षये पुनस्तानि कल्पादौ विसृजाम्यहं ॥२०॥**

कल्पादौ माझी प्रकृती इच्छा कुंतीनंदना ॥ माया जीवातें सृजी करुनि फळ रचना ॥ तेचि कल्पक्षई मागुतें पावती पूर्व स्थाना । माझीये मायेतें ॥ ११६ ॥

" गीतासु "

**पुरुषः प्रकृतिस्थो हि भुंक्ते प्रकृतिजान्गुणान् ॥**
**कारणं गुणसंगोस्य सदसद्योनिजन्मसु ॥ २१ ॥**

ऐसे यातायांत नित्य भ्रमणी । भजति प्रकृती जानिता गुणी । भोगिती संतासंत योनि सुख दुःखातें ॥ ११७ ॥ असो हे जीव स्वरूपज्ञान । सांगो ब्रम्हस्वरूप निर्वचन । जें सर्व पदार्थीते व्यापून । अतीत असें ॥ ११८ ॥ तरी जें शुद्ध बुद्ध नित्य मुक्त । सर्वज्ञ सर्वांसी अव्यक्त । आणि तयाची सरी विषयभोक्त । जीव केवीं पावे ॥११९॥ जैसें ढेकुणा नांवें बाणीया । तो दुःख दे सकळ प्राणिया ते विचित्रा केणीया ( सामान ) । काई ग्राहीक होय ॥ १२० ॥ नातरी शूनिया नांवे मोगरा । तो नेवोनये देवद्वारा । तेणें माळीणीचा हारा । काई साजरा दिसे भांगी नांव तुळस पत्री । ऐसे बोलती आगम मंत्री । परि तियेते नसेविती श्रोत्री । ब्राम्हण जे ॥ १२१ ॥ मद्यानाम

शिवरसु । ऐसा शाक्तियाचा उपदेशु । परी तयाचा न धरिती विश्वासु । शुची मंत जे ॥ १२३ ॥ हळदी नावे भांडार । तयाचे करू नयेती आळंकार । तयासी धनवंत कुबेर । केवीं उपमी जें ॥ १२४ ॥ शंखाचे करुनि हार । जोगिनी मिरवती साविकार । परी तयातें देखूनि राजकुमर । भाळती ना ॥ १२५ ॥

### प्र० अद्वैत निषेध षड्गुण ईश्वर वर्णन.

तैसी अद्वैत शब्दरचना । जिवासी ठेविती ब्रह्माची नामना । जीव नित्य भोगित असे यातना । गर्भवासु ॥ १२६ ॥ जो सदा विषयीं रत । नाना निरयीं पचत । तयासी केवीं उपमीजत । परब्रह्म तें ॥ १२७ ॥ जरी उपदेश गुरूवचनें । सोहंप्रतीति तूंचि ब्रह्म म्हणे । परी साम्य आपुला ठाई तिये लक्षणें । ओळखावी कीं ॥ १२८ ॥ अहो ब्रह्म स्वरूपाची आगाध दैवी । जरी अंशें एकें वर्तती जीवीं । तरीं दारुण दुःखार्मी नानाभवीं । हा का पचिजता ॥ १२९ ॥

### श्लोक.

**समश्चैव स्वतंत्रश्च निरपेक्षश्च निर्गुणः**
**सर्वज्ञस्तृप्तकामश्च षड्गुणाएतईश्वरे ॥ २२ ॥**

सम आणि स्वतंत्रपण । निरपेक्ष आणि निर्गुण । तृप्तकाम आणि सर्वज्ञ । ऐसा षड्गुण ईश्वर ॥ १३० ॥ ईश्वरीं षड्गुण समृद्धि सदा ॥ आणि वियोग नाहीं

परमानंदा ॥ तया अनंतासी मर्यादा । बोलेंचि नये ॥ १३१ ॥ जो सृष्टि संहारीं समर्थु ॥ जीवोद्धरणी प्रशक्तु ॥ तोप्रपंची अविभक्तु ॥ केवीं होय ॥ १३२ ॥

"गीतायां"

यस्मात् क्षरमतीतोऽहमक्षरादपि चोत्तमः ॥
अतोस्मि लोके वेदेच प्रथितः पुरुषोत्तमः ॥ २३ ॥

जोक्षरा अतीत ॥ पुरुषोत्तम नाम विख्यात ॥ ऐसा वेदपुराणीं पढिजत ॥ पुराण पुरुष ॥ १३३ ॥ क्षरतेचिदांश क्षरला श्रुतीं॥अक्षर (पुराण) ब्रम्ह कूटस्थानी मुक्ती॥या दोही पुरुषाच्या व्यावृती ॥ तो पुरुषोत्तम ॥ १३४ ॥ ऐसा पदार्थ भेद असतां ॥ एक ऐसें केवीं आलें चिता ॥ पर सोहंभावें भरले अद्वैता ॥ नसंडिती बाद ॥ १३५ ॥ परी अभि-मानाचेनिसळे ॥ आक्षेप न देखती आंधळे । ते परमार्थो कवणाये वेळे । पात्रनव्हती ॥ १३६ ॥ आसोहें अभेद खंडण ।. बोलों गुणातीत तत्वार्थ ज्ञान ॥ ते जिये पुरुषीं वर्तमान ॥ ते लक्षण आईका ॥ १३७ ॥

गीतायां

अमानित्वमदंभित्वमहिंसाक्षांतिरार्जवं ॥
आचार्योपासनं शौचं स्थैर्यमात्मविनिग्रहः ॥२४॥

इंद्रियार्थेषु वैराग्यमनहंकार एवच ॥
जन्ममृत्युजराव्याधिदुःखदोषानुदर्शनं ॥ २५ ॥

असक्तिरनभिष्वंगः पुत्रदारगृहादिषु ॥
नित्यं च समचित्तत्वमिष्टानिष्टोपपत्तिषु ॥ २६ ॥

मयि चानन्ययोगेन भक्तिरव्यभिचारिणी ॥
विविक्तदेशसेवित्वमरतिर्जनसंसदि ॥ २७॥

अध्यात्मज्ञाननित्यत्वं तत्वज्ञानार्थदर्शनं ॥
एतज्ज्ञानमिति प्रोक्तमज्ञानं यदतोऽन्यथा ॥ २८ ॥

अमानि त्वादि चिन्हीं ॥ ओळखावा तत्त्व ज्ञानी । याचेनि अन्य थर्वे काहाणी ॥ त्रिफळ बोला ॥ १३८ ॥ इंद्रियार्थी विराम नाहीं अहंकार ॥ जन्म मृत्य जराव्याधी इत्यादि प्रकार ॥ नाना दुःख दोषाचे निरंतर ॥ अवलोकन तया ॥ १३९ ॥ स्त्री पुत्र गृहा दिकाचे ठाईं ॥ लागले पणें ममता नाहीं ॥ इष्टा निष्टाचे विषयीं ॥ सम चित्त सदा ॥ १४० ॥ माझे ठाई अनन्य भक्ती ॥ व्यभिचार नाहीं कव्हणें युक्ती ॥ ईश्वरोक्त निर्मळ देश सेवन आति । अन्य जनची ॥ १४१ ॥ अध्यात्म ज्ञान नित्यता । तत्व ज्ञानार्थ दर्शन होय पात्रता । यातें ज्ञान बोलिजे पार्था । अज्ञान विपर्यायें ॥ १४२ ॥ असो हें पाचां पुरुषांचें लक्षण । सांगेन दर्शन भेद व्याख्यान । जे श्रुती पंथ मूळ प्रवर्तन । बोलिला असे ॥ १४३ ॥

॥ प्र० १३ शास्त्र आचार्ये वाद षड्प्रमाण कथन ॥

" श्रुति "

भेदाभेदौ अनीश्वरवादश्च इत्येवं सिद्धान्तास्त्रयः॥२९॥

भेद अभेद कर्मवाद। हा सिद्धांत तयाचा भेद। ह्मणोनि दर्शनासी विसंवाद। पडिला असे ॥ १४४ ॥

वेदान्तं चैव सांख्यं च न्यायं वैशेषिकं तथा ॥
भाट्टं प्रभाकरं चैव षडेतद्द (वंद) र्शनानिच ॥२०॥
चिंतामाणिः पक्षभेदो नैयायिकमतेऽस्ति वै ॥
चार्वाकसांख्ये वेदान्ते मीमांसाभाट्टयोस्तथा ॥२१॥

वेदांत आणि सांख्य ॥ न्याय आणि वैशेषिक ॥ भाट्य प्रभाकर हे षट्क ॥ दर्शनांचें ॥ १४५ ॥ सांख्य आणि वेदांत मतीं ॥ सोहं प्रातीति धरूनि चितीं ॥ परिणाम विवर्त सिद्धांतीं ॥ अद्वैत प्रतिष्ठिलें ॥ १४६ ॥ न्याय आणि वैशेषिक ॥ म्हणति जीवेश्वर नव्हती। एक हा अनादिचा वस्तु विवेक । बोलिला असे ॥ १४७ ॥ भाट्य आणि प्रभाकर ॥ म्हणती कर्म चि तारक ईश्वर ॥ हा दो द्वो दर्शनाचा निर्द्धार ॥ बोलिला असे ॥ १४८ ॥ सांख्याचाकर्ता मुनी कपिल सिद्ध॥ तो म्हणे ब्रह्म परिणामोनि जालें बुद्ध ॥ इच्छा वसे प्रपंचा कार नानाविध ॥ भासत असे ॥ १४९ ॥ वेदांतभाष्य शास्त्र शंकराचार्यें केलें ॥ तो म्हणें ब्रह्म नाहीं परिणामलें ॥ अविद्या रूपें प्रतिबिंबलें ॥ दर्पणीं रूप जैसें ॥१५०॥ हा वृथा भास माया मृगजळ ॥ तेथ तरंगवत् जीवजात सकळ ॥ अथवा दिसे जैसे अभाळ व्योम पोटीं ॥ १५१ ॥ गौतमु आणि गंगेसी दोन्ही ॥ न्यायिक वैशेषिक दर्शनीं ॥ जीव स्वरूपी भेद प्रतिष्ठुनि ॥ सुभाष्य केलें ॥ १५२ ॥ भाट्य दर्शन भट्टाचार्यें केलें ॥ प्रभाकर प्रभाचार्यें कथिलें ॥ कर्मचि तारक समर्थिले। उभय वर्गीं ॥ १५३ ॥

भट्टाचार्यें केलें स्वपक्ष संस्थापन । प्रभाकरें केलें परपक्ष उच्छेदन । आक्षेप देखूनि दर्शन । भिन्न प्रवर्तलें असे ॥ १५४ ॥ चिंतामणी पक्षभेदे वैशेषिक न्यायिकांचा । मीमांसा भाट्ट प्रभाकरीं साचा । चार्वाक वेदांत सांख्य वाचा । बोलिली वाद निरसुनी ॥ १५५ ॥ ऐसेंही बोलिजती साहीं दर्शनें । यातेंचि म्हणिजती षड्‍ प्रमाणें । याची विभक्ती जो जाणें । तो ज्ञाता बोलिजे ॥१५६॥ हें त्रिगुणात्मक ज्ञान । वेदयाचें जन्मस्थान । येणें न पारुखे भ्रमण । मायिक म्हणोनि ॥ १५७ ॥

" गीतायां "

त्रैगुण्यविषया वेदानिस्त्रैगुण्यो भवार्जुन ॥
निर्द्वंद्वो नित्यसत्वस्थो निर्योगक्षेम आत्मवान् ॥३२॥

सत्त्वरजतमात्मक । वेदवादअसती अनेक । म्हणोनि निर्गुण होऊनि वेदादिक । धर्मसांडी ॥ १५८ ॥ द्वंदादिकीं रहीत । जो ईश्वराज्ञा पाळीत । सदासुखिया सत्ववंत । न करी चिंता योग क्षेम ॥ १५९ ॥

" तथाच भागवते "

एवं पृष्टो महादेवः स्वयंभूर्भूतभावनः
ध्यायमानः प्रश्नबीजं नाभ्यपद्यतकर्मधीः ॥ ३३ ॥
प्रश्नपारं तितीर्षुश्च सदेवो मामचिंतयत् ॥
तस्याहं हंसरूपेण सकाशमगमंतदा ॥ ३४ ॥

ब्रम्हयापासूनी वेदविस्तारू ॥ परीतो नेणे वस्तु निरधारू

म्हणोनि नव्हेचि परिहारू ॥ प्रश्नोत्तराचा ॥ १६० ॥ याचि कारणें सनकादिकीं ॥ प्रश्न पुसिला अवसरी एकीं ॥ तव तो बुडाला महा उदकीं ॥ संदेहाचें ॥ १६१ ॥ तयाचें होवावयातरण ॥ ब्रह्मा जालाध्याये मान ॥ मग हंसरूपें अवतरण । देवें केलें ॥ १६२ ॥ तो ज्ञान योग गोप्या अति सपुर । लाधल्यातरिजे भवसागर । जैं जीवासी कृपा करील । श्रीसर्वेश्वर तैंचि जोडेतो ॥ १६३ ॥ प्र० अगम भेद षट्चक्र माळिका । असो हा शास्त्र निर्धार ऐका । तो बोलिला असे मती प्रमाणिका । आतां सांगेन षट्चक्र माळिका । आगम भेद मतें ॥ १६४ ॥

" अजपायां "

आधारे लिंगनाभौ प्रगटितहृदये तालुमूले ललाटे ।
द्वे पत्रे षोडशारे द्विदशदलयुते द्वादशार्धे चतुष्के ॥
वासान्ते बालमध्ये डफकठसहिते कण्ठदेशेस्वराणां॥
अस्त्वंन्ते हंक्षतत्वं सकलदलगतं योगमार्गे प्रसिद्धं
॥ ३५ ॥

" पाठान्तरे "

हंक्षतत्वार्थयुक्तं सकलदलयुतं वर्णरूपं नमामि ।
तावत्प्रमोदते स्वर्गे यावत्पुण्यं समाप्यते ॥ क्षीणपु-
ण्यः पतत्यर्वागनिच्छन् कालचोदितः ॥ ३६ ॥

आधार चक्र गुदस्थानीं रक्तता । सिद्धशक्ती गणेश देवता । ईंद्र ऋषी चतुर्दळ अवस्था । जप सहा शतें

॥ १६५ ॥ स्वाधिष्ठान लिंगस्थानीं पीत वर्ण । अत्रऋषी ब्रह्मदेव आपण । षड्दळीं सावित्री शक्ती अवस्था सरण पूजासाहासहस्र ॥ १६६ ॥ मनपूर चक्रनाभिस्थानीं वर्ण निळा । विष्णूदेवता आणि शक्ती कमळा ॥ वायो ऋषी-माजी दश दळा ॥ जपुसाहासहस्र ॥ १६७ ॥ अनुहात-चक्र गौर वर्ण हृदयस्थानीं । उमाशक्ती देवता पिनाक पाणी । सूर्य ऋषी शोभाद्वादशदळा मर्णी । जपुसहस्र साहा ॥१६८॥ विशुद्धि चक्र श्वेत शुभ वर्ण । कंठस्थानीं तेथें जीव देवता अविद्या शक्ती जाण । चंद्र ऋषी षोडशदळींसरण । जपुसहस्र एकु अग्नीचक्रज्योति पीतवर्ण भ्रवांतरीं । ज्ञानचक्र मायाशक्ती हंसऋषी अवधारी । परम-हस देवता तया द्विपत्रीं । जपु एक सहस्र ॥ १७० ॥ सहस्रदळ ब्रह्मरंध्रीं निरधारिता । गुरू देवऋषी परमात्मा देवता । ज्ञानशक्ती तेथ ऊर्ध्वद्वारें संचरता । पवन कुंठे ॥ १७१ ॥ सहस्र दळ तें अहंकाराचें मूळ । अनेक वर्ण नानाध्वनी बहळ । सहस्र एक जपु सोहं बीज केवळ । तें गुरुस्थान म्हणिजे ॥ १७२ ॥ 'बं' पासूनि चारी 'सं' ये अक्षरें जाणावीं आधारीं । 'बं' पासूनि 'लं' भीतरीं । हे स्वाधिष्ठानीं ॥ १७३ ॥ 'डं' पासूनि 'फं' पर्यंत जाणा । मणिपुरीं अक्षरांची गणना । 'कं' पासूनि 'ठं' अक्षर ना-मना । अनुहतचक्रीं ॥ १७४ ॥ ॐ ( अं पासून अः पर्यंत पांच वेगळी करूनी । ये अक्षरें बोलावी कंठस्थानीं । द्विदळीं हं क्षं ये दोन्ही । उरलीं दोन ते बीज ॥ १७५ ॥ हे एकंदर वाचन बावन अक्षरीं बीज । तयातें सोहं शब्द हा मंत्र निज । एकविससहस्र सहा शतें जप सहज ।

श्वासोच्छ्वासीं ॥ १७६ ॥ हे अजपा माळ षट् चक्रांची । साधिलिया प्राप्ती बोलिजे पिंडाची । आतां चक्रें सांगो ब्रह्मांडींची । दुसरेंनि मतें ॥ १७७ ॥ त्रिकुट श्रीहट्ट आणि गोल्हाट । पादुका तळीं औठपीठ । भ्रमरगुंफा ब्रह्मरंध्र शेवट । तेंचि स्थान आरम्याचें ॥ १७८ ॥ ऐसी पवन साधनें प्रवर्तुनी । काळवंचना करिती पिंडज्ञानी । धरुनि भाव अंतःकरणीं । अमर व्हावयाचा ॥ १७९ ॥ आतां पवन कार्य अवधारी । इडापिंगळा सुषुम्ना माझारी । याचें भिन्न सामर्थ्य दिसे शरीरीं । तें पवन सिद्ध बोलिजे ॥ १८० ॥ वामे इडा दक्षिणे पिंगळा । मध्यें सुषुम्ना त्रिवेणीचा मेळा । तेथ अमृत वर्षे सतरावी कळा । ते अमर काया ॥ १८१ ॥ ऐसें हें पवन साधना । विस्तारें सांगेन जाणा । जेगुरु उपदेशें शिष्यजना । सिद्ध होय ॥ १८२ ॥ आईके सप्तपाताळाची चवडी । कूर्मावरी फुडी । तैसीच एकीघडी । वराहाच्चिये दाढेवरी ॥ १८३ ॥ सप्तपाताळाचें ज्ञान । आईकाचित्त देऊन । परी पाताळीं तीन जाण । सांगितले असती ॥ १८४ ॥ परी वेदांताचें राखा वया गहीवर । आणि ज्ञान असे निराकार ! साकारी स्वच्छ शरीर । असें देखा ॥ १८५ ॥ महीतळ पादुका जाणा । कूर्मदेवता असे आपण । गुल्फद्वय जाण । आतळैपें ॥ १८६ ॥ परी तेथें देवता वराहो । जवळी असे कूर्म देव । ऐसा जाणावा भाव । एकाग्र मनें ॥ १८७ ॥ वितळ जंघन देश । सुतळ गुडघे प्रदेश । रसातळ गुद प्रदेश । तळातळ उर्ध्व जाणा ॥ १८८ ॥

माहातळ कटि देशु । ऐसा पाताळाचा बोलती सौरसु । ऐसें आसन घालि जसु । मृत्यु लोकीं ॥ १८९ ॥ पाताळाची करुनि घडी । मंही तळ आणि सूतळमोडी । भूतळावरी देउनि फुडी । दोहीकडे ॥ १९० ॥ म्हणे हेंतु तुज वाटतें गुढ । तरी पर्येसी प्रगटदढ । राहोनेदीकोड । कर्ममार्गीयाचा ॥ १९१ ॥ बैसोनि पद्मासनी । गुदस्थानीं टांचदेउनि । दुजी ठेउनी ईंद्रिय भुवनीं । नियमा विया-लागी ॥ १९२ ॥ ऐसी ईंद्रिय नियमिती । भ्रमध्यें लक्ष ठेविती । ऐसी हीं साधनगती । मेंढासनीं ॥ १९३ ॥ मग आसन उकलीजे । भूतळामांडिया म्हणिजे । बामावरी-ठेविजे । दक्षण चरण ॥ १९४ ॥ पुढती वरी वाम देऊनी । जंघनीं कर पुटेंनेपुनि । उदराश्रये करुनी । वायू चालविजे ॥ १९५ ॥ आर्धा [illegible] । [illegible] सांगेन सवर्म । पांघरुनि [illegible] । [illegible] ॥ १९६ ॥ आणिक आइका भाती । [illegible] । ऐसी योग लक्षण गती । निर्धाराची ॥ १९७ ॥ एके [illegible] । दुसरें [illegible] सांडोन । [illegible] । हे [illegible] ॥ १९८ ॥ [illegible] खाती । [illegible] । ऐसी करावी [illegible] । साधकाची ॥ १९९ ॥ [illegible] । [illegible] । [illegible] सुषुम्ना समीप । [illegible] । २०० ॥ [illegible]-कीजे । [illegible] । [illegible] ॥ १ ॥ तेथ रेंचकु आसे आपण । ते कुंडालिनीचे उन । आउठ वळन कोंडून । पूर्वकु केले ॥ २ ॥ ऐसे कोळी साधी । कुंभकु भरुनिया आधी । तेथ लाविती समाधी ।

माणिपूरचक्री ॥ ३ ॥ तें माणिपुरकु भले । आपानाते उर्ध्वकेले । पूर्वके घेतले अनिळासीपैं ॥ ४ ॥ आधी सूर्य वळिजे । चंद्र हाळुच घेईजे ॥ रेचकु भरीजे कुंभ स्थळींकेंपै ॥ ५ ॥ निर्बुजो भेदीजे पवन । तयाचे मार्ग बुजोन । ऐसे आणिजे वळण स्वाधिष्ठानींसी ॥ ६ ॥ ऐसी मात्रा चढती कीजे । त्राहाटकु ओडीयाना बंधयातें म्हणिजे । ऐसे माणि पुरी क्रमीजे । अहोराती ॥ ७ ॥ ऐसे माणि पुरीं संतोषु । करावा रात्री दिवसु । हा जाणावा अभ्यासु । पवन मार्ग ॥ ८ ॥ आणिक सांधी जालंधर बंध । कंठ संकोच करावा प्रसिद्ध । ऐसे जाणे सत सिद्ध दोन्ही बंध ॥ ९ ॥ आधीं सिद्ध साधी मूळ बंध । कुंडलिनी करावी ऊर्ध्व । आउठवळणेंसी प्रसिद्ध । निजगृहा ॥ १० ॥ आधार चक्रावरी उचली । स्वाधिष्ठाना खालीं । ते ऊर्ध्व होता खळ बळी । आपण देखा ॥ ११ ॥ जलांदरी उंटीया साधिजे । तर मळीया निळातेजीनीजे । हे प्रसिद्ध बोलिजे अनुभवींही ॥ १२ ॥ मग येईजे अनुहाता । उदर चेपिजे आतां । आणि घटिका बंद्ध त्वरीता । सोडूं नको ॥ १३ ॥ ऐसे अनुहातु शोधिले । प्राणाते ऊर्ध्व केलें । विशुद्ध चक्र भेदिलें । ऐसे परी ॥ १४ ॥ मग पाठी दीजे नाशापुटी । मुखी बोलु नये गोष्टी । ऐसा प्रत्यय पाहेदृष्टी । तात्कालिक ॥ १५ ॥ आधीं लबी कासाधिजे । ताळ मुळीं जिव्हा दिजे । पवन नेईजे अंतर्गत ॥ १६ ॥ ऐसें भेदी अग्नी चक्र । ज्योती प्रकाशी अच्छादिला विचित्र । पवनाचे सूत्र वरुतेचढे ॥ १७ ॥ तेथ नानाध्वनि नाद । नाना परी आनंद । ऐसा असे

भेद । पवन अभ्यासी ॥ १८ ॥ परी म्हणती ऐसें तुनकरी पैल बहु रूपीच्या परी । उदर वृती सर्व प्रकारी । दाखवीत असे ॥ १९ ॥ ऐसी नानापरी व्युत्पत्ती । पवन साधना साधिती । सिद्ध सामर्थ्यदाविती । जनालागीं ॥ २० ॥ एक उष्णकाळीं पिंड तापलेया उन्हें । अर्धः चंद्र उर्ध्व करिती पवनें । तर शीतळता अंतुनि प्राणे । सुखीया होय ॥२१॥ शीत काळीं हिवें पिडलेया त्वचा अधःसूर्य उर्ध्व करी पिंडीचा । ते कही आश्रय न धरी अग्नीचा । कंथा न लगे ॥ २२ ॥ क्षुधा काळीं उदित होय प्राण । तरी सतरावीये विद्येचे करी अदोहन । देहींची निवारे भूक तान्ह । जनाची चाड नाहीं ॥ २३ ॥ परी हें साधन नाहीं कवणा । वाउगाची वाहाती बोलाचा-उगाणा । नानावेष धरूनिया जना । नाडीत असती ॥ २४ ॥ ऐसे नाना मतें ऐकतां । न पारुखे जन्म मरण व्यथा । पिंड नाशवंत तेथींची कथा ॥ कैसीसाच मानावी ॥ २५ ॥

**श्लोक " तथाच अजपायां "**

**त्रिकूटं श्रीहठश्चैवौटपीठ गोल्हाट स्तथा ॥**
**भ्रमरगुंफा पादुकानि ब्रह्मरंध्रंच षट्क्रमात् ॥३७॥**

**प्र० १४ तथाच भागवते**

**तावत्प्रमोदते स्वर्गे यावत्पुण्यं समाप्यते ॥**
**क्षीणपुण्यः पतत्यर्वागानिच्छन्कालचोदितः ॥३८॥**

शतयज्ञ पुण्याचे शेवटी । इंद्रपदीं बैसी जे देवपटीं

पुण्य सामुग्री सरलेया कुंठी । देवपणासी होय ॥ २६ ॥ महाप्रलयाचे काळीं आईका । नाश होय ब्रह्मांड गोळका उरी नाहीं हरिहर ब्रम्हादिका । तेथ पिंड काईसा ॥ २७ ॥ सिद्धीचा संचार जालेया पिंडा । चौदाकल्प आयुष्य या मार्कंडा । तया पाते तैं करी एकी रोम झडे प्रचंडा । रोम हर्षणाची ॥ २८ ॥ जै रोम हर्षणाचे देहपडे । तै वदी हंसाचा निमीष मोडे । आयुष्य सरलेया तया येव्हडे न उरती पैं ॥ २९ ॥ जैवदी हंसाचा होय नाशु । तैबकदालभ्याचे उपडे पिसु । तया ही मरण तैं एक स्वासू । भृचंडीचा पै ॥ ३० ॥ जैं भृचंडीचें आयुष्य सरे । तैं कूर्माचा एक दिवस भरे । ऐसे याची नुरती शरीरें । अमरपण पातल्याही ॥ ३१ ॥ हें जाणीव नाहीं वर्तमानी शब्दे सांगती वडिलांचीं काहाणी । पापभय नाहीं अंतः कर्णीं । तेथ ज्ञान कैचें ॥ ३२ ॥ म्हणतीं आदिरूपीं आदिनाथ । मायारूपी माछिंद्रनाथ । ज्ञान पारखी चौरंगी नाथ । घटनिरंतर श्रीं गोरक्ष ॥ ३३ ॥ म्हणती गोरक्ष घटपिंडाचा रक्ष पाळु । तरी भूत कृपा का नाहीं आळ माळु । आणि मेंढ्या बोकडाचे होती काळु । ते नाथपुत्र कैसे म्हणावे ॥ ३४ ॥ जरी सर्वाशिरी गोरक्ष असे तरी शिरनिवटीता कोठें वसे । पिंड पोखिती मद्य मांसें । ते सिद्ध कैसे म्हणावें ॥ ३५ ॥

॥ तथा श्रुती "अहिंसा परमो धर्मा"॥

जया कृपा नाहीं सर्व भूतीं तेथें कैची बोलावी क्षमा

निवृत्ती । मत्त द्रव्य सेविलेयापडती भ्रांती । तेथ ज्ञान कैचें ॥ ३६ ॥

॥ गीता " त्रिविधं नरकस्येदं द्वारम् " ॥

जे देही होयतमाचाउद्भवु । तेथ कैचा बोलावा ज्ञानप्रभवु। नाहीं पिंड अनुभवु । साधन सुख ॥ ३७ ॥ हे अवघे सांडी पाखांड मत । वा उगाचि भ्रमसी पिंडा आंत । प्रपंच रूप ते तुलेनाशिवंत । नाहीं हीत जीवाचें ॥ ३८ ॥

॥ प्रकर्ण, १५ आगम साधन स्थिती ॥

आणि आईका साधन स्थिती । चहूं ओळीची सांगेन व्युत्पत्ती । आरंभ घट प्रचयो निष्पत्ती । बोलिला आसे ॥ ३९ ॥ आरंभी शारीरी विचार करुनि । मग काम क्रोध अहंकार निवारुनी । चंचळ बिंदु निश्चळ धरुनी । अध उर्ध्व द्वारें ॥ ४० ॥ जैसा भरला घट राहे स्थिर । अहिर्निशीं पिउनी "वारनसुर" । श्वासोच्छ्वासीं वायुचा आहार । तो घट बोलिजे ॥ ४१ ॥ प्रचयो जोगी आणिजे कैसा आर्गी घातले या न जळे सहसा । शस्त्रीं आच्छेदन उदकीं मासा । तैसा तरे ॥ ४२ ॥ क्षणाक्षणा पालटी रूप । ते वेळीं जाणिजे प्रचयो स्वरूप । नाहीं वळीत पळीत संताप । तो प्रचयो जोगी बोलिजे ॥ ४३ ॥ निष्पत्ती जाणिजे कमळा उन्मनी । मानवीं सांडोनि होय देवासी मिळणी । राजा प्रजा हेळ देखे नयनीं । तें निष्पत्ती बोलिजे॥ ४४ ॥ या सिद्धीचा अनुभव जाण याहुनी अष्टमाहासिद्धी गहना । तयाची सांगेन विवंचंना । यथानुक्रमें ॥ ४५ ॥

"तथा सिद्धीप्रकाश ग्रंथे."

अणिमा महिमा मूर्ते लघिमा प्राप्तिरिंद्रियैः ॥
प्राकाश्यं श्रुतदृष्टेषुशक्तिप्रेरणमीशिता ॥ ३९ ॥
पाठांतर अणिमागरिमाचैव प्राकाम्यं प्राप्तिरेवच ॥
लघिमानेकरूपाच प्रकाशाखिलदर्शभृत् ॥ ४० ॥
अणिमा महीमाश्चैव लंघीमा गिरिमा स्तथा ॥
प्राकाम्य प्रवेशंच विशितं विाशितं चाष्टासिध्याः॥४१॥

आणिमा गरिमा परकाया प्रवेशी । लंघिमा बहुरूपता दुरश्रवणी दुरदर्शी । प्रकाशरूपता परियेसी । या आठ माहासिद्धी ॥ ४६ ॥ अणिमातिया अदृश्यहोणें । गरिमा बोलिजे घनवटपणें । परकाया प्रवेशी परदेहीं संचरणें । भलतेयाचा ॥ ४७ ॥ लंघिमाहे आकाशीं उत्पवणें । बहुरूपता बहुरूप धारणें । दुरदर्षी दुरीदर्शनें । बोलिले असे ॥ ४८ ॥ दुराश्रवणी म्हणिजे दुरूनि ऐकिजे । प्रकाशरूपता प्रकाशें आगळी बोलिजें । या अष्ट महासिद्धी जाणिजे । सिद्धपंथ ॥ ४९ ॥ परीहाही नव्हे मोक्षमार्ग । अविनाश नव्हे प्रपंचवर्ग । म्हणोनि ज्ञानिया नकरी संसर्ग । अनित्याचा ॥ ५० ॥ जेणे परमेश्वरेसी होय मिळणी । तो भावजाणे गुणातीत तत्वज्ञानी । एकु परमानंदावाचूनि नधरीकाई ॥५१॥ तथाच भागवते ।

॥ श्लोक ॥

धर्मंतु साक्षाद्भगवत्प्रणीतं ।
नवै विदुस्ते ऋषयो न देवाः ॥

**न सिद्धमुख्या असुरा मनुष्याः ।**
**कुतश्च विद्याधरचारणादयः ॥ ४२ ॥**

सकळ सिद्धावरिष्ट कपिलसिद्ध । तयासी असता जरी तत्वबोध । तर सागर शापीं देखताबाध । हिंसेचापै ॥५२॥ दुर्वास ऋषी सामर्थ्ये आगळा । तयाजरी असती ज्ञानाची कळा । तर वनवासीं द्रुपदबाळा । सत्वटाळूं कांजांतां ॥ ५३ ॥ विश्वामित्रा तत्वार्थ ज्ञान असतें । तर पाप करिता कंटाळता चित्ते । हतिताकां अष्टोतरी शत-पुत्रांतें । वसिष्टाचिया ॥ ५४ ॥ ऐकिजे महासिद्धपाराशर । तेणें दिवसा केला अंधकार । परी विषयवासना आपपर । ओळखेचिना ॥५५॥ ऋषी श्रृंगतो पुत्र विंभाडकाचा । तेणें वर्षाव धरिला मेघाचा । परि दोषनाविचारी भूत पीडेचा । तेणें जाला तपाभंग ॥ ५६ ॥ ऐसेया सिद्धी असती अनेका । सामर्थ्य दाऊनि नाडिती लोकां । भोग सरलेया जाती नरका । ते सिद्धकैसे जाणावे ॥ ५७ ॥ तैसें नव्हे ब्रम्ह विद्या ज्ञानदिवी । जे भूतकृपा प्रकाशवी जीवीं । साधनें करूनि साध्यातें पाववी । परमानंदीं ५८ । ऐसेसिद्ध असती बहुत । अठ्यांयशी सहस्र ऋषी समस्त । तया जरी ज्ञान असते गुणातीत । तरी अग्रपुजे योग्य होतेकी ॥ ५९ ॥ जवळी असतां श्रीकृष्ण परब्रम्ह । कवणा न कळेचि पुरुषोत्तम । एक शुक योगींद्र विमळाश्रमा वांचूनिया ॥ ६० ॥ जऱ्ही आयुष्यजाले युगातरीचें । तरी भ्रांती पडळ न फिटे जिवाचें । विफळ जन्मजाणावे तयाचें । ज्ञानेविण ॥ ६१ ॥ म्हणोनि सिद्धीचे सामर्थ्य भोग । ज्ञानिया मानसीं न सेवीचांग । तत्वज्ञानें होय वस्तूसी

योग। तोमोक्षबोलिजे ॥ ६२ ॥ असोहे सिद्धींचे सामर्थ्य बोल। येथें ज्ञानिया न दिसे नवल। विचारीता दिसे फोल। ज्ञाने विण ॥ ६३ ॥

## ॥ प्र० १५ अष्टदळ चक्र वर्णन ॥

आतां आणीक एक मत अवधारी। अष्टदळ कमळ हृदय सरोवरीं। तेथे मन मधुकर भ्रमणकरी। निरंतर जाणा ॥ ६४ ॥

॥ श्लोक ॥

हृदिस्थितं पंकजमष्टपत्रं।
सकर्णिकं केसरपद्मनालं॥
अंगुष्ठमात्रं मुनयो वदन्ति।
ध्यायान्ति विष्णुं पुरुषं पुराणं ॥ ४१ ॥

पूर्व दळ श्वेत वर्ण जाणा। तेथें जऱ्ही प्रवेशु होय मना। तरी धैर्य औदार्य पुण्यवासना। उपजेपैं ॥ ६५ ॥ अग्नि दळीं वर्ण बोलिजेराता। तेथें जऱ्ही मनाची होय स्थिरता। तरी आलस्य उद्वेग चिंता। शोक ऊपजे ॥६६॥ दक्षणदळीं वर्ण बोलिजे काळा। तेथें मन संचरेजिये वेळा। तरी क्रोध दुष्टवासनेवेगळा। नव्हेचिपैं ॥६७॥ नैऋत्यकोनींचे पातें बोलिजे निळें। तेथें जरी मन मधुकार खेळे। तरी वित्त पुत्र स्त्री मोह जाळें। गुंतला ठाके ॥ ६८ ॥ पश्चिम दळीं कपील बोलिजत। तेथें मन जरी संचरत। तरी क्रीडा विनोद आल्हाद भरित। सुखिया होय ॥ ६९ ॥ वायू कोनींचें पातें श्यामवर्ण जाणावें। तेथें जरी मन

स्थिरावे । तरी तीर्थांसी गमन उपजे जावें । साधू दर्शनासी ॥ ७० ॥ उत्तरे पाकुळिका पीतवर्ण । तेथें जरी संचारकरी मन । तरी अष्ट भोग सुखी रमणें करूं उपजे ॥ ७१ ॥ ईशान्य पाकुळिका बोलिजे गौरोतम । तेथें जऱ्ही होय मनासी विश्राम । तरी श्रवणकीर्तन देव धर्म । शांती उपजे ॥ ७२ ॥ अहो मना प्रवेश झालेया संधी । आत्मा पीडे रोग व्याधी । मध्य स्थिरावले या निद्रा समाधी । विश्रांती पावे ॥ ७३ ॥ ऐसा घटिका येकीचेनि मानें । भ्रमे काळिका अनुसंधानें । ऐसें अष्टदळ कमळ ज्ञानें । बोधिले एक ॥ ७४ ॥ ऐसा हा मनमार्ग विचारिता । संदेहनिवृत्ती नव्हे ऐकतां । काजे जीव सहज सुखदुःखें भोगिता । तर कर्म तें काय कीजे ॥ ७५ ॥ म्हणोनि हें मत सावयाचिकुडें । कां जें जीवासी सदा सुखचि आवडे । तरी मनाचेनिसंगें दुःख भोगाकडे । केवी जाये ॥ ७६ ॥ म्हणोनि हें मत वायाचि कुडे । कुतर्क वादीं पडिले बापुडे । आधीं गुरूवांचून मार्ग न जोडे । अन्यत्र उपायी ॥ ७७ ॥ जरी पाकोळीका संगें पालटू मनीं । तरी इंद्रिय नियमु कां करिती ज्ञानी । आणि संगरहित होउनी स्मरणीं । मुक्ती पावले कीं ॥ ७८ ॥

॥ प्र० १६ कुतर्कीक मत ॥

आतां कुतर्कीं याचा पक्ष । शास्त्राचारें न मानिती मोक्ष । म्हणती वस्तु देखिजे प्रत्यक्ष येहि डोळा ॥ ७९ ॥

॥ तथाच श्रुतिः ॥

न चक्षुषा गृह्यते वा न वाचा॥
न वै देवा न तपसा कर्मणावा ॥ १/३ ॥ ”

## तथाच श्लोक

### अखंडमंडलाकारें ।

सकळ सुरांचे डोळें । तूतें पाहतां झाले आंधळे । ते चर्मचक्षु बावळे । देखती कैसे ॥ ८० ॥ चाचरी भूचरी अगोचरी । चौथी मुद्रा बोलिजे खेचरी । दृष्टिद्वारें लक्षिता निर्धारी । मानिती मोक्ष ते ॥ ८१ ॥ चाचरी तें आडवी दृष्टी पाहणें । भूचरी नासाग्री दृष्टी लावणें । खेंचरी आकाशीं अवलोकणें । तिमिरात ॥ ८२ ॥ अगोचरी म्हणजे नेत्रांची मिळणी । अंतरीं अवलोकिती बैसूनि आसनीं । म्हणती वस्तुदृष्ट तत्वज्ञानी । आपण यातें ॥ ८३ ॥ परी हे अवघेचि खंडज्ञान । जव देह असे वर्तमान देह नासलेयानाही दर्शन । डोळियांचें ॥ ८४ ॥ अथवा देह वर्तताची दृष्टी नासे । तरी कवणोंचि पदार्थ न दिसे । अहो हातीं धरूनि वागविती मानसें । आंधळे म्हणोनी ॥८५॥

### ॥ प्र० १७ वस्तुसार निरोपण ॥

जे वस्तु सर्वाहुनी सार । पाहाता वेदासी आगोचर ते देखिलिया नाहीं व्यापार । देह धर्माचे ॥ ८६ ॥ तया नाहीं काम क्रोध द्वेश राग । मदमत्सर विषय स्त्रीसंग । तया देखण्यासी नाहीं भंग । घट पट्टादिकीं ॥ ८७ ॥ तरी वस्तु देखिजे येही डोळा । लाहीजे ब्रह्मानंदाचा सोहळा । तरी विषयसुख अमंगळा । का सेवित असती ॥ ८८ ॥ जैसें परिसाचें झालिया स्पर्शन । जरी न फिटे

काळिमा मोलहीन । तरी काई मानावें साच पण । परीस संयोगाचें ॥ ८९ ॥ म्हणोनि हें बोलतां दूषण असें । जें कांहीं इहीं डोळां परवस्तु दिसे । तया सूर्यादिकाचेनि प्रकाशें । काई काज ॥ ९० ॥ परी हें अवघेचि मृगजळ । वाउगेचि शब्दाचे पाल्हाळ । जे देखे परवस्तु केवळ । तया अनंत डोळे ॥ ९१ ॥ तरीच देखणे-याचा अर्थु घडे । जरी सर्व दैन्य दारिद्र विघडे । परी कुतर्की झांकिवले बापुडे । जीव अनाथ हे ॥ ९२ ॥ म्हणोनि आधीं वस्तु शास्त्रें जाणावीं । मग आचार कष्टी करून पावावी । तेथींच्या परम पुरुषाची दैवी । तोही तैसाचि होय ! ॥ ९३ ॥ जैसी कीटकी असे तृणजळका । तिया पालटु भिंगरुटी जवळिका । तैसें देखिलिया ब्रह्मव्यापका । मग जीवदशा कैची ॥ ९४ ॥ अहो अंजन सुदलिया पायाळा । भूमिका फोडूनि निधान दिसे डोळां । तैशी वस्तु देखिलेया कवणीय वेळां । व्यवधान नाहीं ॥ ९५ ॥ अथवा वस्तूचें झालिया दर्शन । जरी वस्तूचें नये ती कवणी गुण । तरी कायसी लोकीं मिरवण । देखणेयाची ॥ ९६ ॥ असो हें अंध अल्प ज्ञान । येथून सांगो विस्तारून । जें देखणें स्थापिती मूढ जन । सूष्ट भावें ॥ ९७ ॥ ते अध्यात्मीं ब्रह्मज्ञानी म्हणती । चतुर्विध उपदेशीं प्रतीती । तेचि सिद्धांतीं निश्चळ मती । तेचि ऐसे ॥ ९८ ॥ एक सर्व एक चिन्ह म्हणती । एक सोहं मंत्र विमर्षिती । एका नेत्रांतरीं प्रतीती । एका शास्त्रादि नाना देखणें ॥ ९९ ॥ पाहतां चहूं मुद्रांचें धारण । एकां

तीमिर ज्योती एका खं ध्यान । एका गगनांतरीं तेजावलोकन। सर्व काळ ॥ ३०० ॥ एका सूर्य भासले या भासु । एका नेत्रांतरें ज्योति विश्वासु । एका गगनीं जीवसृष्टी प्रकाशु । एका शेषशयन पवनकाळा ॥ १ ॥ एका चक्रमंडळें प्रकाशती । सर्पकांती सारिखे देखती । एका धनुष्याकृतिभासती । विमानें जैसे ॥ २ ॥ एका छाया पुरुष देखणें । वृथा भास एकाचे मानें । एका प्रत्यक्ष प्रमाणें, नेत्र भेदें ॥ ३ ॥ एका ब्रह्मांडीं पवन ध्वनी । तेथें एका लयज्योतिस्थानी । एक असती पुष्प नयनीं । देखती जाणा ॥ ४ ॥ एका मत्स्य नयन सदृश । एका अग्नी स्फुलिंग प्रकाश । एका मोतियाचा घोस । तैसे दिसे ॥ ५ ॥ एका ढीवर जाळवत । एका रौप्यता रसंमत । एका असती दिसत । आरक्त मंडळ ॥ ६ ॥ एका चलद्रूपीं स्थिरावले । एक निश्चळ म्हणोनि वेधले । एका शुभ्र वर्णी रातले । एक पीत वर्णी ॥ ७ ॥ एका एकत्व बोध मिळणी । स्थापिती वेगळाले अभिमानी । या वृत्ती जाणावीं या निर्धारूनि । मनचेष्टेच्या ॥ ८ ॥ हे पंचभूतात्मकज्ञान । परी नव्हेचि कैवल्य दर्शन । आतां असो हें खंडन । देखणे भ्रांतीरूप ॥ ९ ॥

### श्लोक "गीतायां"

**न तद्भासयते सूर्यो न शशांको न पावकः ॥**
**यद्गत्वा न निवर्तन्ते तद्धाम परमं मम ॥ ४१ ॥**

चंद्रार्क आणि अग्नी । प्रकाशूं नशकती कवणी । ते देखिलिया नयनीं काईसाच मानावे ॥ १० ॥ जयातें

पावलेया पतन नाहीं । मत्स्वरूपा जाणावें सही । आणिक देखणें कांहीं । नसे तेथें ॥ ११ ॥

## ॥ प्र० १८ दशदेहवर्णन ॥

म्हणोनि असे हें झांवळें—अल्पज्ञान । आतां सांगो दशदेह कथन । कवण झाले कवणासी कारण । उरले ते काई ॥ १२ ॥ ॐपर वस्तुते बोलिजे उत्तम तियापासूनि अलक्षासी स्वभावें जन्म । अलक्ष रचिलें देखापर ब्रह्म । पर ब्रह्मोंशिवुं ॥ १३ ॥ शिवें केला शक्तीचा ठाकारू । शक्ती निर्मीला पुरूषाचा आकारू । पुरूषें केला सदाशिवाचा वितारू । ॐकारेश्वरू तेणें ॥ १४ ॥ ॐकारेश्वरें रुद्ररचिला । रुद्रेंविष्णु असे सृजिला । विष्णुनें ब्रह्मा असे निर्मिला । तेणें पिंड ब्रह्मांड रचिलें ॥ १५ ॥ ब्रह्मा ॐकारेश्वराचा अंश तृतीय । विष्णु अंश बोलिजे द्वितीय । रुद्र प्रथम अंश होय ॐकारेश्वराचा ॥ १६ ॥ म्हणोनि ब्रह्मा विष्णु शूळपाणी । ॐकारेश्वरा पोटी असती सामाउनी । आतां पुढील सांगो विस्तारूनी । अंशविभाग ॥ १७ ॥ शक्तीचा तृतीय अंश ॐकारेश्वरू । सदाशिव द्वीतीय अंशाचा विस्तारू । प्रथम पुरुष साचारु । शक्तीचापैं ॥ १८ ॥ ॐकारेश्वर सदाशिव पुरुषु । शक्तीचे पोटीं सामावले जाणिजसु । आतां आईक पुढील उपदेशु । शक्ती त्रया चापै ॥ १९ ॥

## ॥ प्र० १९ शक्तीत्रयवर्णन ॥

शक्ती अलक्षाचा । तृतीय अंश जाणा । सिद्ध द्वितीय

अंशाची रचना पर ब्रह्म प्रथम अंश विवंचना । अलक्षा-
पासूनी ॥ २० ॥ म्हणोनि शक्ती शिव पर ब्रह्म तिन्ही ।
अलक्षा पोटीं असती उप संहारूनी । म्हणोनि अलक्ष पर
ब्रह्मा होउनी । कोटी गुणें आगळा ॥ २१ ॥ अलक्ष
पोटीं पर ब्रह्म असे । पर ब्रह्मा पोटीं शिव दिसे । शिवा
पोटीं शक्ति एक हिसे । असे सामावली ॥ २२ ॥ शक्ती
पोटीं पुरुष संचरला । पुरुषा पोटीं सदाशिव देखिला ।
सदाशिवें ॐकारेश्वर सामाविला उदरामाजी ॥ २३ ॥
ॐकारेश्वरा पोटीं रुद्र जाणा । रुद्रा पोटीं विष्णुची रचना ।
विष्णुनाभिकमळी चतुरानना । जन्म ब्रह्म यासी ॥ २४ ॥
ब्रह्मा पोटीं ब्रह्मांड गोळकु । ब्रम्हांड गोळका पोटीं हा
जीव लोकु । ऐसा एकाहुनि एक आधीकु कोटी गुणें
आगळा ॥ २५ ॥ या परी उंच पोटीं निंचसामावले ।
म्हणोनि उंच कोटी गुणें आगळे बोलिले । हे समस्त असे
विस्तारिलें । प्रपंच रूप ॥ २६ ॥

## ॥ प्र० २० इंद्रिय विकार वर्णन ॥

इंद्रिय विकार ब्रह्मयाचा । मन विकार बोलिजे विष्णुचा ।
बुद्धी विकार जाणा रुद्राचा । बोलत असती ॥ २७ ॥
चित्त विकार ॐकारेश्वरी । अहंकार विकार सदाशिवाचा
शरीरीं । हेतु विकार पुरुषाचा अवधारी । बोलत असती
॥ २८ ॥ उल्लेख विकार शक्तीचा जाणे । ऊर्ध्व उल्लेख
शिवाचा बोलणें । आणि अधः उल्लेख म्हणणे । पर
ब्रह्माचा ॥ २९ ॥ अर्थ उल्लेख अलक्षाचा जाणनिर्धारे ।
पुढें याचा प्रासुसांगिजेल विस्तारें । कवण प्रासिलेयाकाई
उरे तें आईकावा ॥ ३० ॥

## ॥ प्र० २१ इंद्रीय ग्रास वर्णन ॥

इंद्रिये ग्रासीं ब्रम्हयाचा ग्रासु । मन ग्रासीं विष्णुचा जाणिजसु । बुद्धी ग्रासी रुद्रासी नाशू । बोलिला असे ॥ ३१ ॥ चित्त ग्रासीं ॐकारेश्वराचा अभावो । अहंकार ग्रासीं बोलिजे सदाशिव । हेतु ग्रासीं पुरुषा सावेव । देखीजेणातो ॥ ३२ ॥ उलेख ग्रासीं ग्रासु शक्तीचा । उर्ध उलेख ग्रासीं अभाव शिवाचा । उर्ध्व उलेखी पर ब्रम्हाचा । ग्रासु बोलिजे ॥ ३३ ॥ उर्ध्व उलेख ग्रासीं अलक्ष नुरे । अलक्ष ग्रासींलेया कवणीं नाहीं दुसरें । एकला परमात्मा स्वरूपी उरे । निराकार तो ॥ ३४ ॥ आगोचर वस्तु तें अलक्ष नेणें । पर ब्रम्हासी अलक्षन अनुमाने । शिवासी पर ब्रम्ह कवणें खुणें । लक्षे विना ॥ ३५ ॥ महाशक्ति नेणें शिवातें । आणि पुरुष नेणें शक्तीतें । सदाशिव पुरुषातें । जाणेचिना ॥ ३६ ॥ सदाशिवाचे अज्ञान ॐकारेश्वरा । ॐकारेश्वराचें अज्ञान बोलिजे रुद्रा । रुद्राचे अज्ञान विष्णुसी अवधारा । विष्णु तें ब्रम्हा नेणें ॥ ३७ ॥ कार्मीक आचरण ब्रम्हयाचें । कर्म वृत्त बोलिजे विष्णुचें ध्यान जाणिजे रुद्राचें । बोलत असती ॥ ३८ ॥ लय-बोलिजे ओंकारेश्वरी । लक्ष सदाशिवाचे शरीरीं । समाधी पुरुषाचीं अवधारीं । चित्त देउनी ॥ ३९ ॥

## ॥ प्र० २२ लिङ्गदेह वर्णन ॥

स्थूळ देह ब्रम्हयाचे जाणिजे । लिंग देह विष्णूचे म्हणिजे । कारण देह रुद्राचे बोलिजे निर्धारेसी ॥ ४० ॥ महा-कारण देह ओंकारे श्वराचें । आणि ज्ञान देह बोलती सदा-

शिवाचे । ज्योतिदेह पुरुषांचें । बोलत असती ॥४१॥ अधः-शून्य शक्तीचें जाणिजे । मध्य शून्य सदाशिवाचे बोलिजे । ऊर्ध्व शून्य परब्रम्ह म्हणीजे । अलक्षाचें अतीत चवथे ॥ ४२ ॥ या चहुं शून्या अतः पर । परमात्मा पर वस्तु अगोचर । तो देहा वेगळा निराकार । बोलत असती ॥ ४३ ॥ आतां ब्रम्ह याचें जाणिजे त्रिकुठ । आणि विष्णुचें बोलिजे श्रीहट्ट । रुद्राचे गोल्हाट । बोलत असती ॥४४॥ आउठ पीठ ॐकारेश्वराचे आसन । भ्रमर गुंफा सदाशिववाचें स्थान । ब्रम्हरंध्रि पुरुषाचें आसन । स्थीर असे ॥४५॥ पृथ्वी ब्रम्हयाचें आप विष्णूचें । वायु ॐकारश्वराचे तेज रुद्राचे । आणि आकाशतें सदा-शिवाचें । बोलत आसती ॥ ४६ ॥ ऋग्वेदतो ब्रह्मयाचा । यजुर्वेदतो विष्णुचा । सामवेदतो रुद्राचा । बोलत असती ॥ ४७ ॥ अथर्वण वेदतो ॐकारेश्वराचा । सुसाम वेदतो सदाशिवाचा । आतां सांगोपाचहीवाचा । तेणें चिमतें ॥ ४८ ॥

## ॥ प्र० २३ पंचवाचा अवस्था वर्णन ॥

अतः परा सदाशिवाची वदती । परा ॐकारेश्वराची बोलती । पश्यंती रुद्राची म्हणती । मध्यमा ती विष्णूची ॥ ४९ ॥ वैखरी ब्रम्हयाची जाण । आता अवस्था सांगेन । जागृती ब्रम्हा स्वप्न विष्णू आपण । अवस्था बोलती ॥ ५० ॥ सुषुप्ति अवस्था रुद्राची । तुर्या ॐ-कारेश्वराची । उन्मनीसदाशिवाची । बोलत असती ॥५१॥ असो हे कथन दशदेहाचें । येणें भ्रांती पडळ न फिटे

जीवाचें । कवणें रचिलें काईसे याचें । दुजे काई होतें ॥ ५२ ॥ वस्तु तें शुद्ध आणि निर्गुण । तेथें कैचें प्रपंचाचे करण । या आक्षेपाचें निवारण । कवण करी ॥ ५३ ॥ म्हणाल परमात्मा स्वरूपें विकारला । दश देही असे संचरला । प्रपंची मळीण दशा पावला । ते इच्छावसे ॥ ५४ ॥ तरी तो दशदेहातीत । ऐसें हें आतांचि बोलिलें मत । प्रपंची तो संचरत । हे केवी घडे ॥५५॥ आणिक एक अक्षेप असे जाण । नीचासी जर नसे उंचाचे ज्ञान । तर दशदेहाचें कथन । कवणें केलें ॥५६॥ जेणें नाहीं देखिलें आपणयातें । ते केवीं ज्ञान करेल आपण या वरुते । नीचातें उंचासी बहुतेमते । हीन असे जाण ॥ ५७ ॥ जैसे एकादे अक्षेम आंधळें । आपुलें अंगन देखे कवणें वेळे । तें आकाशाचीं फुलें । केवी दावी ॥५८॥ याचा करावा परिहार । विचारूनि सांगावें उत्तर । सांडून जाणीव अहंकार । पुसावें प्रबुद्धासी ॥ ५९ ॥ जरी ब्रम्ह्ययानें पिंड ब्रम्हांड राचिलें । तर सकळ जीवा कोठोनि आणिलें । लोकीं काईसे याचे निर्मिले । हे सांग पातु ॥ ६० ॥ हे अवघें जाणि जे आल्पमत । विचारिता दिसे जीव कृत । म्हणोनि नव्हे परसिद्धांत । प्रमाण शून्य ॥ ६१ ॥ वेदशास्त्री पुराणीं । ऋषी मती नाहीं मांडणी म्हणोनि योगमत जाणावे निर्धारूनी । नाहीं साक्षगाही ॥६२॥

**॥ गीतायां श्लोक ॥**

**नाहं प्रकाशः सर्वस्य योगमायासमावृतः ॥**
**मूढोयं नाभिजानाति लोको मामाजमव्ययं ॥४२॥**

मीयोग माया समावृत न प्रकाशे सर्वां । मूळ सकळ लोक जाणावे पांडवा । मज अज अव्ययातें नेणुनि मिर्वांती जाणावा । हे भगवद्वाक्य ॥ ६३ ॥ आतां असो हे दश देह खंडण । आतां सांगो अनिळ पुराण । तेथें सृष्टी रचना । बोलिली असे ॥ ६४ ॥

## प्र० २४ अनिलपुराण भृष्टिरचना ॥

### तथाच अनिलपुराणे ।

**अर्बुजं निर्बुजं धुंधुं नास्ति साशब्दमोंकारं (१०) ॥**
**नास्ति जलस्थल मेरु मांदारं नास्ति गिरिपर्वतं(१)॥**

अर्बुज निर्बुज धुंधुं कार । नाहीं साधने शब्दें ॐकार । नाहीं जळ स्थळ मेरु मांदार । गिरी पर्वत तेही नाहीं ॥ ६५ ॥ नाहीं सत्य वैकुंठ कैलास । नाहीं पंच तत्व प्रकाश । नाहीं मन बुद्धीचा सवरस । नाहीं अहंकार ॥. ६६ ॥ नाहीं चित्चैतन्य हेतु विकार । नाहीं वर्ण विवर्ण सम या चार । नाहीं धर्म वेद ॥ शास्त्र प्रकार । नाहीं तीर्थ कर्म ॥ ६७ ॥ तैं नाहीं पुरुष ना छाया । नहोतप्रपंचना माया । न होत हंसु नव्हती काया । होता अंधःकारु ॥ ६८ ॥ सोहं सोहं तेथ निराकारू । वर्तत असे परमेश्वरू । तेणें रचावयास चराचरु । साकारू आदरिला ॥ ६९ ॥ प्रथम निःशून्य राचिलें । तया-पासूनि शून्य विकासलें । तया पासाव प्रसवलें । निरालंब ॥ ७० ॥ तया पासूनि अगोचर जाण । अगोचरा पासाव अलक्षु झाला निर्माण । अलक्ष झाला निरंजनासी कारण ।

तें पर ब्रम्हासी ॥ ७१ ॥ तेथुनि झाला आधार उद्भव । आधारापासोनि बोलिजे शिव । शिवा पासूनि शक्तीचा प्रसव । शक्ती पासूनि पुरुष ॥ ७२ ॥ पुरुषा पासोनि सदाशिव जाणा । सदाशिवा पासा व वायु स्वरूप रचना । तया पासूनि झाले निर्माण ॐकारेश्वर ॥ ७३ ॥ तेथुन झालें अमृत तेज । त्या पासून रुद्र सहज । तया पासूनि विष्णुतो बीज । अनादिचें ॥ ७४ ॥ विष्णु पासूनि ब्रम्हानाभिकमळीके। येथोनि झाली आठराही स्थानकें । विष्णु तोचि अनिळ तेणें कौतुकें । अनादि रचिला ॥ ७५ ॥ अनिळें रचिलें अनादिचें शरीर । त्याचा बतीस कोडी योजने विस्तार । सत्प पाताळें पाय मस्त क थोर । एक वीसस्वर्गे ॥ ७६ ॥ तया देहीं षट्र चक्राची माळ सातवें मस्तकीं सहस्रदळ । तेथेंचि बोलती सोहंकाराचें मुळ । सोहं शब्द तेथें ॥ ७७ ॥ त्रिकूटावर रचिलें श्रीहट्ट । औठ पीठ आणि गोल्हाट । पादुका भ्रमर गुंफाशेवट । ब्रह्मरंध्र बोलती ॥ ७८ ॥ मणि पुरातळ वटीं कुंडलिनी । पाठीसी विशाळ एक वीस मणी । ईडा-पिंगळा सुषुम्ना आदि करूनी । नाडी सप्तधातु ॥ ७९ ॥ सर्व इंद्रिये तत्वें पांच जाण । पंच विस अंश त्रीगुण । प्रपंचा भीतरी हंस संचरून । कवचलेईलातो ॥ ८० ॥ ऐसी करूनि सर्व आकार रचना । आणीक इच्छा झाली ह्या शरीर दहना । तव अनादि बोलता झाला वचना । अनिळाप्रती ॥ ८१ ॥ आहो तुम्ही आमचा केला आकारू । सर्वेचि आदरिले दहन करू । मग सांगता झाला विचारू । आनिळतो ॥ ८२ ॥ आम्ही तूमचें तें राचिलें

आईका । विस्तार करावयातिहींलोका । आणि चराचर ब्रम्हांड गोळका । बीज होवावया ॥ ८३ ॥ अकल्पित शिव कल्पना तेचि शक्ती । अतीत पुरूष तयाची करी भक्ती । पाप पुण्य ज्ञान अज्ञान मुक्ती । मज पासुनि ॥ ८४ ॥ ऐसा देउनिया उपदेश । मग बाहेर काढिला हंसु । केला दहनें नाशु । या कलेवराचा ॥ ८५ ॥ तेथुनी नाना जाती जन्म लिया । षट्‌ चक्रा चिया देवता बाहिरी प्रकट लिया । नेत्रा पासूनि कळा उद्धवलिया । रविशिर्शा ॥ ८६ ॥ मेदमांसत्वचा सकळ । तयाचें झाले पृथ्वीचें मुळ । अष्टांगी चीया असती अष्टकुळाचळ पर्वत झाले ॥ ८७ ॥ आणीक आउठ कोटी रोमावळी । तयाची आठराभार वनस्थळीं । मस्तकींचे केस गगन मंडळीं । तारा झाले ॥ ८८ ॥ खेदा पासाव जळ समुद्र झाला ।। कफापासोन मधुदधी महोदधि ? रचला । नाभी पासूनि रत्नाकरू उद्भवला । मुखापासाव समुद्र देखा ॥ ८९ ॥ लाळे पासूनि जार समुद्र जाणा । मूत्रा पासूनि क्षार समुद्राची रचना । आणि घृत्य समुद्र नैना । सात-वाक्षार ॥ ९० ॥ इडा पिंगळा सुषुम्ना । तयाची बोलिजती गंगा सरस्वती यमुना । नव्याणव नौसहस्र नदी जाणा । नव नाडी पासूनि ॥ ९१ ॥ झोटिंग सवाय लक्ष अश्रमा पासोनि । ब्रम्ह चौसष्टा पासोनि चौसटी योगिनी । तेहे तीस कोटी देव तृष्णे पासूनि । कल्पने पासूनि पैगंबर ॥ ९२ ॥ ललाटी झालें ऋषी । मस्तकी झाला गौरक्षी । ब्राम्हण झाले मुखी । भुजी क्षत्रिय जन्मले ॥ ९३ ॥ वैश्य झाले वक्षस्थळीं । शूद्र जन्मले पायातळीं

एक वीसस्वर्ग बोलिजेतां मंन कमळी । पाठी चिये वासे ॥ ९४ ॥ डोळेया पासाव जन्मले अडंज । लाळे पासुनि जारज । स्वेदापासुनि स्वेदज । उद्भिज रोमे पासूनि ॥९५॥ आतां आसो हे बहु व्युत्पत्ती । वाणी करूं आकळती । काजे श्रोते कांटाळती । ऐकोनियां ॥ ९६ ॥ जयाचें आरंभींचें आचरण कुडें । तें काई खरें होईल पुढें । म्हणोनि श्रोत या सांकडे । घालों नये ॥ ९७ ॥ जैसे कवणी एक फळ निकें देखिलें । सेवावया हातीं घेतलें । मुखीं घालितां दुष्ट लागले । तयाचा आंतु निका नव्हे ॥ ९८ ॥ जेथ सांगितला वस्तु निर्धार । तेथें नाहीं बोलिला दुसऱ्याचा संचार । तरी खालुता विस्तार । रचिला कासयाचा ॥ ९९ ॥ जरी तेथें दुसरे नव्हतें कवणी । तरी आधारू बोलावा कवणाचा नयनी । ना वस्तूचे आधारी तर हे काहानी । ऐकोंचि नये ॥ ४०० ॥ जरी तेथें नाहीं दुसऱ्याचावासु । तर कास याचा रचिला हंसु । ना आपणचि तरी उपदेशु । कवणासी दिधला ॥ १ ॥ म्हणसी आपणचि सर्वा ठाईं झाला । तर सर्वातीत कां बोलिला । पापपुण्य धर्माधर्मीं कां राचिला । कवणा लागीं ॥ २ ॥ अणीक एक आक्षेप असे अवधारी जरी पृथ्वी झाली दहना उपरी । तरी कलेवर जाळिलें कांसयावरी । अग्नी कैचा ॥ ३ ॥ पाठीचे एक वीसमणिगणना । तयाची जरी झाली स्वर्गरचना । तर एकविस स्वर्ग मुगुट हे मना । केवीं आले ॥ ३ ॥ आणीक एक ऐका नवल । येवढें ते चराचर जैनव्हतें पृथ्वी ढवल । तर सप्त पाताळ पाय बोल । केवी साच ॥ ५ ॥ गंगा

जन्मली विष्णूपदीं वैकुंठीं । ते रुद्रे कार्या हेतु धरिली मुगुटी । ते नाडी पासूनि जन्मली हे कुटी । बोल तयासी ॥ ६ ॥ आणि गोरक्ष जन्मला शूद्र कुळीं । तो मछिंद्राचा शिष्य नाथ ओळी । तो जन्मला शिर कमळीं । हें असत्य ॥ ७ ॥ नवलक्ष तारांगणें । तयामाजी सप्तऋषी श्रेष्ट जाणे । तयांचीं जन्मजाती सामर्थ्य आख्यानें बोलताती ॥ ८ ॥ ते ललाटी जन्मले । हें असत्य बोलिले । आणि ध्रुव आख्यान झाले । असे विचित्र ॥ ९ ॥ तो उत्तान चरण पुत्रु । आढळ बोलिजे ध्रुव । तो तारा म्हणती लेया विचारू । घडेचिना ॥ १० ॥ शुक्र बृहस्पती । दैत्यदेवगुरू बोलिजती । तयाची उत्पत्ती । आनारिसी असे ॥ ११ ॥ औटकोटी रोमावळी । तया केवीं होतीं आठराभार वनस्थळीं ॥ मस्तकिंचे केस आऊठाचे आगळी । गणना कैसी ॥ १२ ॥ समुद्राची नांवें । विपरिताचि बोलिले अघवे । श्रोतीं विचारूनि पाहावे । हें असत्य म्हणौनि ॥ १३ ॥ लवन इक्षु सुरा सर्पी क्षीरोदक वर्णावा ॥ हा सप्त समुद्र मेळावा । भागवती जाणावा । पंचमस्कंदी ॥ १४ ॥ आतां पुरे करूं आक्षेपांची दाटी । किती धावावें पळत्यापाठीं । आतां सांगो कश्यप सृष्टी । तयाचे निमते ॥ १५ ॥

## ॥ प्र० २५ कश्यप श्रुष्टी रचना वर्णन ॥

आणिक आईका बोलणें । कश्यप सृजिला नारायणें (चतुराननें) । तयाचिया तेरा राण्या तेथूनि जाणणें । विस्तार हा ॥ १६ ॥ दिती पासूनि दैत्य । अदिती

पासून दैव समस्त । कद्द पासूनि सर्प विख्यात । पक्षि विनते पासुनि ॥ १७ ॥ ब्रम्हयार्नाचा चंद्र झाला । सेने पासूनी वनस्पतीचा उद्भव सांगितला । आठ्यांशी सहश्रऋषी उद्भवला । सेवके पासूनि ॥ १८ ॥ चाऱ्ही-खाणी चाऱ्हीवाणी । झालिया षड निद्रे पासूनि । कनक रेखे पोटी जाणे । अष्टधातु ॥ १९ ॥ मांद्रिकेचे अष्ट-कुळाचळ पर्वत । काळींदीनें दिशा गजमदोन्मत । प्रभे पासुनि समस्त । अश्वजाती ॥ ४२० ॥ अभिवंदे पासूनि उपजलिया विचित्राभूतयोनी । खेचरे झेटिंगें ऐसी बोलणी । भु गोळी कीं ॥ २१ ॥ ऐसे देवदैत्य अदि करूनि सृजिलिया चाऱ्ही खाणी । ऐसी कथा रसाळ करूनि । सांगती अज्ञाना प्रतीं ॥ २२ ॥ परी हें नये तयाचि यानना । जरी कश्यपे केली सर्व रचना । तरी जीव आणि पपंच कवणा । पदार्थाचेपा ॥ २३ ॥ दुसरें जें बीज पेरि जे भूमिके । तें विस्ताराते पावे उदकें । तर मानवप-श्वादिकें । वृक्ष कैसे बोलावे ॥ २४ ॥ चाऱ्ही खाणी चाऱ्ही वाणी । झालिया शङ्क नेत्रे पासूनी । तर येराराणि-यांची मांडणी । वृथा जाणे ॥ २५ ॥ चौखाणी परुती । पांचवी खाणी नसे निरुती । तर आणिक बोललिया उत्पत्ती । ते कवणा खाणीत ॥ २६ ॥ ऐसे विपरित पाल्हाण । विस्तारीलें वाग्जाळ । म्हणोनि संदेह सकळ । निवर्तेकेवीं ॥ २७ ॥ आणि परमेश्वरी सदाकृपा असतां । तोची बोलावा कैसा दुःखदाता । जे अपराधेविण जीव-जाता । नरकीं घालीं ॥ २८ ॥ जरी लाव होय जननी । तरी बाळक पाळावें कवणी । तैसे कर्मेविन नानायोनी ।

भोगवीकैसा ॥ २९ ॥ का जें देव तें सुखरूप केवळ ।
तयाखालुते मनुष्य पुण्यांचें फळ । तयाखालुते नरकबहळ ।
तृणपर्यंत ॥ ४३० ॥ तर परमेश्वर सकळाचा पिता ।
तेथकैसी बोलावी विषमता । एकासि सुख एकासी दुःख-
दाता हें बोलतां दुषण ॥ ३१ ॥

॥ गीतायां ॥

**समोऽहं सर्वभूतेषु न मे द्वेष्योऽस्ति न प्रियः ॥**
**येभजंति तु मांभक्त्या मायिते तेषुचाप्यहं ॥ ४४ ॥**

सकळा भूतीसम नाहीं शत्रु मित्रु । जेभक्ती भजती
त्याचा आत्मा निर्धारू । ते पावती मत्स्वरूपी आधारू
हे भगवत् वाक्य ॥ ३२ ॥ या सतासत्कर्मांची जोडी ।
तो भोगी नरकाची खाणी कोडी । जीव कर्माविण एक
घडी । राहोंचि नेणे ॥ ३३ ॥

**" प्रारब्धकर्मणां भोगादेवक्षयः " " इति श्रुति. "**
**एष पंचनमस्कारः सर्वपापप्रणाशनः ॥**
**मंगलानांच सर्वेषां प्रथमं तु सुमंगलं ॥ ४५ ॥**

प्रारब्ध कर्मा भोगेंक्षयो । ऐसिया श्रुती बोलें पाहाहो
कर्मेंनासावीं या उपदेश उपावो । बोलिला असे ॥ ३४ ॥
कर्माचा व्हावया नासु । आपण अवतरला जगदीशु ।
देउनी ज्ञानभक्ती उपदेशू । मोक्षा पावविले ॥ ३५ ॥
यातव हें मत अती कुडे । कुतर्क अभिमानीं पडिले
बापुडे । आदि गुरुवांचूनि मार्ग न जोडे । परत्र
उपाया ॥ ३६ ॥

॥ श्लोक ॥

सकृद्दग्धानि बीजानि न रोहन्ति यथा पुनः ॥
ज्ञानदग्धैस्तथा क्लेशैर्नात्मा संबध्यते पुनः ॥ ४६ ॥

अग्नी जाळिन्नलें बीनोगवें जैसें । ईश्वरज्ञानें कर्म जाळिन्नलें तैसें । तें पुनरपी जीवदशे । बाधीचिना ॥ ३७ ॥

श्लोक.

उदयति यदि भानुः पश्चिमायां दिशायां ।
प्रचलति यदि मेरुः शीततांयाति वह्नि ॥
विकसति यदि पद्मं पर्वताग्रे शिलायां ।
नचलति तिलमात्रं भाविनी कर्मरेषा ॥ ४७ ॥

॥ प्र० २६ जीवेश्वर मत वर्णन ॥

आणीक आईका जीवेश्वर मत । तयाचें वर्तन वेदशास्त्र बहिष्कृत । बोध जाणिजे अभिदैवत । सुष्टाचार तयाचा ॥ ३८ ॥ तया सर्व भूतीं दया सम आचारू । वाचे अलि हंता हा मंत्रोच्चारू । प्राप्तपुरुष चोविस तीर्थांकरू । बोलत असती ॥ ३९ ॥ ऋषभ देवादी अजितनाथ । संभव अभिनंदन—सुमतीनाथ । पद्म प्रभूस्वामी म्हणत । सुर्याश्वस्वामी ॥ ४० ॥ चंद्रप्रभू सुविघनाथ । सितळेनाथ आणि श्रयासी बोलत । वासपुज्य विमळनाथ आणि-अनंत नाथपैं ॥ ४१ ॥ धर्मनाथ शांतीनाथ । कुरंगनाथ आणि आरनाथ । मळीनाथ मुनीसुरत । आणि नमीनाथपै ॥ ४२ ॥ नेमनाथ पार्श्वनाथ । महावीर ऐसे बोलिजेत । चोवीस साधनवंत । प्राप्त साध्यें ॥ ४३ ॥

**नमो आलि हंतानु नमो सिद्धानु नमो आर्यानु नमो उभयानु नमो लोय सर्व साहानु । एते पंचनमस्कार शब्दाःपापस्य नाशकाः । मंगलाश्चैवसर्वेषां । पठनान्मंगलंभवेत ॥ १ ॥**

हा नमोकार । केवळ बीज तयाचे ॥ ४४ ॥ तया नाहीं स्वहस्ते पाकपचन । सांप्रदायका गृहीं सिद्ध भोजन । तृषा निवृत्ती ऊष्ण उदकपान । करिती सदा ॥ ४५ ॥ कुंचिया समार्जनी घालिती आसन । नाहीं रात्रीं अन्नभक्षण वर्तन । अहिंसकत्वें कोमल अंतःकरण । जैन मार्गियांचे ॥ ४६ ॥ जेविता कुशब्द पडेल श्रवणीं । म्हणोनि करिती ताटध्वनी । केश कुचैळ देखिलिया नयनी । न जेवीता जाती ॥ ४७ ॥ तया नाहीं नापिक हस्ते वपन । स्वहस्तें करिताती केसलुंचन । येकांतीं बैसून स्वकथा श्रवण । उपदेशियासी ॥ ४८ ॥ वसई प्रतीमास्थावरित । गौरसें न्हान करित । नैवेद्य दाउनी पूजा समर्पित । भावपुर्वक ॥ ४९ ॥ प्रति वर्षी भाद्रपदीया ॥ द्रव्य देती पशू ग्रहणें पारधिया । सोडवीती स्वापद पक्षिया । परउपकारास्तव ॥ ५० ॥ असो हें मत तरी दिसे निकें । पर तेणें द्रव्य पशू घेती अनेकें स्वद्रव्य म्हणोनिया आईके । पातकीय तेथें लिंपिजे ॥ ५१ ॥ अहो द्रव्य पडे हिंसकाचा हातीं ॥ तया पाप करावयास बुद्धी उपजे मागुती । म्हणोनि तयाची बुद्धी करी आरुती मरंवशेनी ॥ ५२ ॥ आपुलिया पोट सर्गा साठीं । व्याधरिगती दरादर कुटीं । प्राणी बांधुत आणिती हातीं ।

श्रावकाच्या ॥ ५३ ॥ पक्षिये सोडितां लावेती तर । ते ओळंबे मुंगीया वधिती निरंतर । तो बहुतचि होय पर उपकार । सोडवी तयासी ॥ ५४ ॥ जैसे बांधले देखून पंचानना । दुःखी झळंबुनी उपजे करुणा । तो सोडविलया बहुताच्या प्राणा । करीघात ॥ ५५ ॥ जैसा कुपात्रीं कीजे परोपकार । तो परिणामीं होय अपकार । म्हणोनि अहिंसा मत निर्धार करू नेणती ॥ ५६ ॥ आपण कवणाशीं न व्हावें दुःखदाता । प्रारब्धीं दुःख भोगितां न करावी चिंता । म्हणोनि जो अलिप्त दोहीं मता । तो ज्ञाता बोलिजे ॥ ५७ ॥ गुरव हिंडती आळो-आळिया । भाकरी सांगती पाळोपाळिया । अन्न निष्पत्ती करिती बळीया । निमित्य होउनियां ॥ ५८ ॥ आणि ऐसा असतां वस्तु निर्धारु । परमेश्वर स्वरूपें निराकारु । तरी पावले ते झाले आकारु । पाषणरूपीं ॥ ५९ ॥ सांडूनि देखा प्राप्तीचें सुख । पूजास्तपर्णीं कां झालें अधो-मुख । तेथ पावले या प्रपंच दुःख । निवर्तेचिना ॥ ६० ॥ मनें वाचा क्रिया निपजे हिंसा । तरी अलि हंतानु हा मंत्र घडे कैसा । ऐसें दृष्ट अभिमान कार्य परियेसा । आचार्याचें ॥ ६१ ॥ अन्यत्र हींसा चुकविती सानी । लुंचन करितां भय न धरिती मनीं । एका एक दुःखदानी । हे विपरीत देखा ॥ ६२ ॥ सर्व पदार्थीं जीव असे ह्मणत । तरी कैसा वर्ण काय स्वरूप गणित । कवणीय फळीं कैसा संचरत । आणि किती आयुष्य ॥ ६३ ॥ आणि परमेश्वर निराकार असता । प्रथम कोण झाला ज्ञान दाता । स्वता ज्ञान जीवा अविद्यावंता । बोलोंचिनये ॥ ६४ ॥

**अनाद्यविद्यायुक्तस्य पुरुषस्यात्मवेदनं ॥**
**स्वतोन संभवेदन्यस्तत्वज्ञोज्ञानदोभवेत् ॥ ४८ ॥**

जीव अविद्या युक्त अज्ञान असे । म्हणोनि परमेश्वर ज्ञान करिती सायासें । शुद्ध झाली या सरिसे । मेळ विती स्वरूपे ॥ ६५ ॥ जरी परमात्मा नव्हे आदि गुरू ( जगद्गुरु ) । तरी कैसेंनि होईल वस्तु निर्धारु । आणि येसनें दुःख रूप आचारु । कवणाचे निबोले ॥ ६६ ॥ एक देव एक आचार्या । तरी चौऱ्यायशीं भेद कांझाले वायां । एक नवचे एका ठायां । पक्षाभि मानें ॥ ६७ ॥ म्हणोनि ऋषभा पुढें जीव कृत उपदेशु । शब्दें दाविती फळ श्रुतीचा विश्वासु । धरुनि आचारत्वाचा वेषु । चाळविती जीवाते ॥ ६८ ॥ जैं वेद उच्छा दिले उक्तीबळें । ते भट्टाचार्या प्रतीवाद केला सळे । जिनोनि क्षेपनिक घातले एके वेळे । कढईमार्जी आठराही ॥ ६९ ॥ आधीं अभिमानें दुष्कृत । पाठीं गौरांजन घेतलें प्रायश्चित्त । ऐसें जाणूनि आपला आणि परघात । केला देखा ॥ ७० ॥ जे हिंसानिपजे पंचसुनी । तिये कारणें कर्मे कीजती प्रतिदिनीं । तरी पात्रें हातीलेया येसनी । प्रायश्चित्त कैसें ॥ ७१ ॥ परस्परें करितां स्वपक्ष प्रतिष्ठा । तमाचढले या आचार्य निकृष्टा । ब्राम्हणा आर्घ्य देतां आपोहिष्टा । म्हणती जीव ध्नत ॥ ७२ ॥

**तस्माअरंगमामवो यस्यक्षयाय जिन्वथा आपो जनयथाचनः ॥ ४९ ॥**

ऐसे भित असती सानी हिंसे । अभिमानी पडले या

हतिती माणुसें । कुडें कपटें बहुवसें अभिभूत मात्रा । दिके ॥ ७३ ॥ म्हणोनि जेथें अभिमान कार्य । ते नव्हेति निर्गुण आचार्य । ऐसियें हिंसक तमरूपकिये । नरकसिद्धी ॥ ७४ ॥ यास्तव हें नव्हें ज्ञानाचें लक्षण । जेथें न निवर्ति मानाभिमान । तेथें कैचे बोलावें मोक्ष साधन । ऐके तयासी ॥ ७५ ॥ आपण या करूं ये कवणी ओखटें । ते क्षमांगिकरीं मानी गोमटें । तोचि सर्व किल्मीषापासून सुटे । अहिंसा धर्मे ॥ ७६ ॥ पद्मावती मुखदेवता । आणि कीं ही उपासती बहुता । जारण मारणादी व्यवस्था । सप्तविधी करणें ॥ ७७ ॥ ते प्रवर्तले म्हणती आत्म हितीं । तर कां नाना उपासना करिती । घातपात भ्रमिती । मोहन उच्चाटण ॥ ७८ ॥ म्हणती ब्रम्हांड दुमदुमित । जीवें भरलें असे समस्त । हिंसेहिंसा चुकवावया बहुत । उपाय करिती ॥ ७९ ॥ अहिंसा धर्म आमचा आचारू । ऐसे बोलती विचारू । तरी उपोषण करितां होय संहारु । अनंता जीवाचा ॥ ८० ॥

**एकरात्रक्षुधार्तोश्च स्वात्मलिंगप्रदाहकः ॥**
**ग्रामाणां दशसाहस्रं ब्रह्महत्या पदेपदे ॥ ५० ॥**

एक रात्रीं उपवासु कीजे । आत्मलिंग जाळिजे । तर दहासहस्र गांवें जाळिली जाणिजे । ब्रम्हहत्या पदेपदे ॥ ८१ ॥ म्हणोनि जीवपडे तें एक पाप । आणि उदउस्थाचें अमुप । घडत असें तें अल्प । देखतीचना ॥ ८२ ॥ मृतासी देती दहन । तेथें आग्नीज्वाळा धूम्रेंकरून । होतासे जीवाचें दहन । असंख्यात ॥ ८३ ॥

ईल हिंसा । म्हणोनि मुखीं वस्त्र संहसा ।
सा । म्हणती हिंसा होय ॥ ८४ ॥ तरी
नन । आणिके हिंसाकरीती दहन । म्हणोनि
न नेणती धर्म ॥ ८५ ॥

। प्र० २७ मत्ततत्वादी ॥

का मत तत्वादी । ते आस्तीक आणि जीव-
ा उपासती जाणि निश्चयो विष्णु पदी ।
॥ ८६ ॥ तयाचें दृढ वृत शुचि कर्म ।
देवता धर्म । स्वाचारे श्रेष्टत्व असे विषम ।
॥ ८७ ॥ तयांचा मध्वाचार्य असे गुरू ।
युदेवाचा अवतारू । तेणें प्रतिष्टिला असे
क्ष सिद्धी लागीं ॥ ८८ ॥ मागिले युगीं
तयाचे करावया निर्दाळण । विष्णु अवतरला
तार भेदें ॥ ८९ ॥ जे असुर असती
ते कालियुगीं जन्मले पाखांड रूपीं । ते निवारण
व्हली इच्छा ॥ ९० ॥ विष्णुनें निरोप
ा । तुम्ही कालियुगीं अवतार घ्यावा ।
डावा । पाखांड रूपि यांचा ॥ ९१ ॥
धरूनि मस्तकीं । वायुदेव अवतरले नर
न सत्यसंप्रदायकी । मानिलें असे ॥ ९२ ॥
वतार प्रथम । द्वितीय अवतार तो भीम ।
मध्वाचार्य नाम । बोलत असती ॥ ९३ ॥
ावतार अन्वये । आणि मानिती विष्णू देव
र्यें । करिती स्वाचार दिक्षापरीचयो ।

सांप्रदायिकांसी ॥ ९४ ॥ ऐसी करुनी संस्कृतवाणी रचना । आणि ती स्वसाख्याचियामना । पर हिं न मिळे शास्त्र प्रमाणा । यथार्थ रहीत ॥ ९५ ॥ पाखांडि याचें करावया निवारण ॥ येक सम गुणातीत ज्ञान । येरीअवघीची झांकवण । रचिली जीवा ॥ ९६ ॥ तर वायुतो स्वर्ग स्थित देवता ॥ तयासीचि ज्ञान नाहीं तत्वता ॥ ऐसी श्रुती वचन आणि गीता । बोलली असे ॥ ९७ ॥

नमे विदुः सुरगणाः प्रभवं न महर्षयः ॥
अहमादिर्हि देवानां महर्षीणांच सर्वशः ॥ ५१ ॥

माझा प्रभव नेणती सुरगण । आणि महर्षी सातेजण । कार्जे मी देवा ऋषींसी आदि कारण । म्हणोनिया जाणे तया ॥ ९८ ॥ तेथ नेणती देवता आणि महर्षी तेथ काईसे ऋषी आणि राजर्षी । तर सुज्ञीं तयाचिया मतासी। काय म्हणौनि मानावे ॥ ९९ ॥

नचक्षुषां गृह्यते वा न वाचा ।
न वै देवा तपसा कर्मणावा ॥ [२] ॥

सकळ देवांसी इंद्र आधिपती । तयासी जर जाणीव असती । तरी शिळाकारी कां वर्षता क्षिती । गोकुळ स्तावरी ॥ ५०० ॥ तैं देवें उचलिला गोवर्धन । राखिला गाई गोवळी याचा प्राण । सांडविला गर्वाभिमान । सुरपती करवीं ॥ ५०१ ॥ आणि ब्रम्हा वत्स चोरोनि गेला । तो नेणो निभ्रांतीं पडला । आपणाचि शरण आला । म्हणे नेणोचि जी चरित्र तुझें ॥ २ ॥ तयासी नाहीं जर

जाणपणं । तर काईसे नं होईल पाखांड निवारण । जेथें देव त्रयासी नाहीं ज्ञान । तेथें वायु केवढा ॥ ३ ॥ सकळ सांप्रदाय असतां वर्तमान । आणि पाखांडाचें होय निवारण । म्हणोनि हेही प्रमाण । मानूनये ॥ ४ ॥ त्रिविध वाचा बोलो न शकती । नेत्र देखावया योग्य नव्हती । देवता तपें कर्मे नेणती । हे श्रुति शास्त्र ॥ ५ ॥ आणि युगीं युगीं अवतरे भगवंत । ऐसा बोलिला असें गीतार्थ । तो जाणावा वृत्तांत । चौथ्या अध्याई ॥ ६ ॥

**श्लोक " गीतायां "**

**॥ प्र० २८ युगायुगी अवतार वर्णन ॥**

**परित्राणाय साधूनां विनाशायच दुष्कृताम् ॥**
**धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगेयुगे ॥ ५२ ॥**

परमार्थिय साधुजन । तयाचें विनाशावया दुष्कृत श्रमण । ज्ञान धर्म स्थापावया परमेश्वर आपण । अवतरे युगायुगीं ॥ ७ ॥ ज्ञान देउनि तारी साधूजन । सामर्थ्ये पापी यांचें ( पातकांचे ) निवारण । करी स्वधर्माची स्थापना । अवत रुनिया प्रतीयुगीं ॥ ८ ॥ वायु अवतरेल कलयुगाचें ठाई ऐसी श्रुती गीता भागवतीं नाहीं । हें भविष्य शुकादिकींही । नाहीं भासिलें ॥ ९ ॥

**॥ करभाजन वाक्य भा०॥**

**एवं युगानुरूपाभ्यां भगवान् युगवर्तिभिः ॥**
**मनुजैरिज्यते राजन् श्रेयसामीश्वरोहरिः ॥ ५३ ॥**

ऐसें वाक्य असे कर भाजनाचें । जें चहुंयुगीं अवतार परमेश्वराचे । तेथें वायुदेव अवतरले साचे । काईसेनी मानावें ॥ ५१० ॥

॥ भागवत ॥

कृतं त्रेता द्वापरंच कलिरित्येषु केशवः ॥
नानावर्णाभिधाकारो नानेव विधिनेज्यते ॥ ५४ ॥

कृते शुक्लोहरिर्ज्ञेयस्त्रेतायां रक्तवर्णवान् ॥
द्वापरे नीलवर्णश्च पीतवर्णः कलौयुगे ॥ ५५ ॥

तथाच भागवते करभाजनोक्ते ॥

कृते शुक्लश्चतुर्बाहुर्जटिलो वल्कलांबरः ।
कृष्णाजिनोपवीताक्षान् बिभ्रद्दण्डकमण्डलुम् ॥५६॥
त्रेतायां रक्तवर्णश्च चतुर्बाहुस्त्रिमेखलः ॥
हिरण्यकेशः पद्माक्षः स्रुक्स्रुवाद्युपलक्षणः ॥ ५७ ॥
द्वापरे भगवान् श्यामः पीतवासा निजायुधः ॥
श्रीवत्सादिभिरंकैश्च लक्षणैरुपलाक्षितः ॥ ५८ ॥
कलौकृष्णं त्विषाकृष्णं सांगोपांगास्त्रपार्षदं ॥
यज्ञैः संकीर्तनप्रायैर्यजन्तिहि सुमेधसः ॥ ५९ ॥

कृत त्रेत द्वापर । कळी सहित युगे चार । होती परमेश्वर अवतार । पूजिती नाना विधीनें ॥ ११ ॥ शुक्ल आणि आरक्त । कृष्ण गौरपीत । चहुयुगी बोलिजत ।

अवतार भेदें ॥ १२ ॥ एकादशी प्रतिमा उपासना । मुक्तीमानिती विष्णू भूवना । परितीयही फळीं गर्भयातना निदानी दिसत असती ॥ १३ ॥ का जयविजय सनकादिकीं शापिलें । तें असुर योनीं जन्म पावले । तेथेंही जन्ममरण नाहीं चूकले । तेथें मोक्ष कैसा बोलावा ॥१४॥ मग महा प्रळयाचे धडाडी । समग्र सृष्टीची होय राखवंडी तेथें चवदा भुवने ब्रम्हांडी । उरी कैची ॥ १५ ॥

कालः सृजति भूतानि कालः संहरते प्रजाः ॥
कालः सुप्तेषु जागर्ति कालोहि दुरतिक्रमः ॥६०॥
कालेन पात्यते ब्रह्मा हरिः कालेन पात्यते ॥
कालेन पात्यते रुद्रः सर्वं कालेन पात्यते ॥ ६१ ॥
काले देवा विनश्यंति कालेचासुरपन्नगाः ॥
नरेंद्राश्च विनश्यंति कालेसर्वे जनाः स्थिताः ॥६२॥

सकळ सृष्टीचे भाव । काळे रचिले सर्व । स्वप्न जागृती इत्यादि अभाव । होईल काळाचे ठाई ॥ १६ ॥ तिही देवा प्रलय नाशु । नरसुर पन्नकाचा ग्रासु । सकळ सृष्टीचा हारासु । होईल काळें करुनि ॥ १७ ॥

## प्र० २९ मोक्ष वर्णन ॥

इदं ज्ञानमुपाश्रित्य मम साधर्म्यमागताः ॥
सर्गेपिनोपजायन्तेप्रलये न व्यथंतिच ॥६३॥ गी०

ऐसें मोक्षाचे लक्षण बोलिले भगवतें । तें ज्ञान अश्राउनी पावले मातें । ते जन्मा न येतीं मागुते । नाहीं

प्रळय व्यथा ॥ १८ ॥ यास्तव जिये फळी दिसें क्षयो । तें पावावया न कीजे उपावो । जैं कृपा करी देवाधिदेवो । तैंचि जाणिजे हें ॥ १९ ॥ म्हणोनि तें मत जाणावें जीवकृत । येथें जाणता न व्हावे अभिरत । आईकीलिया न दिसे हीत । जीवात्मयाचें ॥ ५२० ॥

## ॥ प्र० ३० शिवाचार. ॥

आईका शिवाचा समुळ । जें शिव भक्ताचें मोठें स्थळ । चहुंयुगींचे आचार्य सकळ । मठ शिवालयें ? ॥२१॥ कृत युगीं सुवर्ण लिंग प्रथम । सुवर्णी शिवालय शून्य काया जंगम । भक्त देवांग आचार्या नाम । रेवण सिध्द ॥ २२ ॥ तयांचा मठ उदया चळीं पूर्व दिसे । आग्नेय कळसु काळसी कालिंद्री वसे । मांदार वृक्षा नदी काम धेनु भासे । विभूति विलेपन ॥ २३ ॥ लोह मुद्रा वाघांबरी आसन । आचार खापरी अष्ठ शिखा जाण । प्राण लिंग मल्लिकार्जुन । तत पुरुष ऋषी वक्र ( तत्व ऋषी मठ ) ॥ २४ ॥ ऋग्ववेद नकार अक्षर । गायत्री छंद सूर्य देवतातत्पर । अश्व वहन वायू तत्व लिंगकेदार । पृथ्वी मूळस्थान ॥ २५ ॥ रेवन सिद्धासी बोलती शांती कंथा । विवेक दंड मानिक वर्ण लिंगराता । रातोत्पळीं पुजा कुंकुवर्ण अक्षता । बोलत असती ॥ २६ ॥ ' ॐ **नमः शिवाय** ' हा मंत्र जपती । आरक्त वर्ण कपिला नाव भद्रा म्हणती । आतां सांगो पुढील युग स्थिती । तेणेंचि मतें ॥ २७ ॥ त्रेतीं आचार्य मैराळ सिद्ध । दक्षणे दिशे मठ जाणिजे निबंध । नैऋत्य कळस कळसीं

सरस्वती शुद्ध । गंगा बोलिजे ॥ २८ ॥ पारिजातक वृक्ष भद्र काम धेनु । भासित विलेपन कृष्णाजिन आसन । काच मुद्रा आजात खापर शिखातीन । प्राण लिङ्ग तेथें ॥ २९ ॥ कपिल सिद्ध मल्लि कार्जुन बोलत । अघोर वक्त्र मकार अक्षर ह्मणत । यजुर्वेद अघोर ऋषी वदत । कालाग्नी रुद्र देवता ॥ ५३० ॥ अनुष्टुप छंद कर्म वहन । अग्नी तत्व पृथ्वी मूळस्थान । सेतु बंध रामेश्वर जाण भैराळ सिद्धाचार्या ॥ ३१ ॥ घटाकारतो भक्त भक्ती करिता । भैराळ सिध्धासी बोलती निवृत्ति कंथा । निळ्याचें लिंग विचार दंड धरिता । नीळोत्पळीं पूजा ॥ ३२ ॥ " ॐ **नमः शिवाय** " हा मंत्र जाण । तयाचि कपिला असे कृष्ण वर्ण । तिये नामे सुभगा काम धेनु । तो असे मळीया चळीं ॥ ३३ ॥ द्वापरीं एको रामाचार्य मठ पश्चिम दिशे । वायू कळसी नर्मदा असे । संतान वृक्ष संयोगकामधेनु भासे । भासित विलेपनें ॥ ३४ ॥ कृष्ण कांबळी आसन मुद्रा स्पुटीका । आचार खापर आणि चारी शिखा । प्राण लिंग भोग मल्लीकार्जुन ऐका । छंदो जातिवक्र ॥ ३५ ॥ मकार अक्षर छंदोजा ऋषी सामवेद । ब्रम्हा देवता गायत्री छंद । हंस वहन वर्ण श्वेत शुद्ध । पृथ्वी मुळस्थान ॥ ३६ ॥ सोमेश्वर लिंग वृषभ भक्त पूजावया । अनुसंयो जंगम एको रामाचार्या । प्रणीत कंथा अनुताप दंड तया । हिऱ्याचें लिंग ॥ ३७ ॥ श्वेत पुष्पीं श्वेता क्षीतीं अर्चन । तयाचें श्वेत वस्त्र तो गौर-वर्ण । " ॐ **नमः शिवाय** " हा मंत्र जपन । धवळी कपिला ॥ ३८ ॥ तीये नामे सुलीळा काम धेनू बोल

ती । एको रामयाचा आश्रम मदिराचळ पर्वतीं । ऐका पुढील स्थितीं । तेणेंचि मतें ।। ३९ ।। आतां कलयुगींचा आचार्या । तया नाव पंडित आराधिया । उत्तर दिसे मठ असे तया । कळसु ईशान्ये ।। ५४० ।। कळसीं गंगा तात्पी जाण । कल्प वृक्ष सुबळा काम धेनु । तया आरक्त कामळे या आसन बैसावया ।। ४१ ।। तांब्र मुद्रा पांच शिखा । सार विलेपन विचार खापरी देखा । प्राण लिंग मल्लि कार्जुन । ऐका । वामदेव वक्त्र ।। ४२ ।। एकार अक्षर अथर्वण वेद । वामदेव ऋषी तृत्येक ( चिटोप ) छंद । विष्णू देवता वैकुंठ पद । गरुड वहन ।। ४३ ।। आप तत्व पृथ्वी मूळस्थान प्रभू जंगम लिंग मल्लि कार्जुन । क्षमा कंथा आणि भक्त जसवन । ज्ञान दंड हातीं ।। ४४ ।। वज्र लिंग पीत कमळीं पूजा करण । वस्त्र पूजा पुष्प कनक वर्णे । " शिवाय " हा मंत्र जपणें रात्रं दिवस ।। ४५ ।। कृष्ण कपिला सुमना म्हणती । पंडित आराधे याचा मठ हिम पर्वतीं । आता सांगो पुढील स्थिती गुरु मठाची ।। ४६ ।। पाचवा गुरु मठ शिव भक्त जर्णी । कळसीं गंगा बोलिजे मंदाकिनी । हरी चंदन वृक्ष तिये स्थानीं । बोलत असती ।। ४७ ।। रक्षा विलेपन ईशान्य वग्त्र । ईशान्य ऋषी एकार अक्षर । शिव देवता वहन नंदकेश्वर आकाश तत्व गाईत्री छंद ।। ४८ ।। कृत युगीं लिंग शिवालय सुवर्णाचे । त्रेतीं लिंग शिवालय रुपयाचें । द्वापरी लिंग शिवालय तांब्रधातूचें । कलयुगीं पाषाणाचें जाणा ।। ४९ ।। नदी पासून विभूती ईश्वरार्थ फळ ।

भद्रेपासव ओवा भूती भासीत पावती फळ ।। सुजुगे पासाव विभूती घोरलि भस्म फळ। बोलत असती ।।५५०।। सुलगे ( सुलिळें ) पासाव विभूती फळ पाप क्षाळन। सुमने पासाव विभूत प्रेत पिशाच्च निवारण । येथून जाले कथन। मठ स्थळाचे ।। ५१ ।। ऐसी सांगोनि शब्द रचना। बोधित असती आज्ञान जना । परी हे जाण त्याचिया मना । साच नवाटे ।। ५२ ।। काजें मार्गें लिंग शिवालयें सांगितलीं। तिये सुवर्णादी धातुचीं निर्मिलीं। तर वर्त मानीं तिये काई जाली । सांग पातू ।। ५३ ।। म्हणाल प्रळयीं पावलीं नाशातें । तरी तिया काई सया पुजिली नाशिवंते। आणि पृथ्वी आदि स्थावरें असति वर्ततें। प्रळयो कैचा ।। ५४ ।। आणिक एक ऐका विपरीत मत। एके दिशे मठप्रतिष्ठित । दुसरीये कळघु हें विपरित। कैसी साच मानावी ।। ५५ ।। तत्पी जन्मली विंध्याचे पोटीं। ते लोकीं प्रत्यक्ष देखिली दृष्टी। तयाचा मठ हिमाचळ मुकुटी । हें साच कैसें ।। ५६ ।। चहुं मठीं बोलिले चार वेद । तर किती कांडें श्रुती सिद्धांत भेद। हें जाणे तो बोलिजे वेद विद। येरा बोलोचि नये ।। ५७ ।। चहु वर्णां वरिष्ट बोलिजती ब्रम्हण। तयाचा ठाई असे वेद पठण। ने जरी वदती साक्षीं प्रमाण। तरी साचमानु ।। ५८ ।।

## प्र० ३१ महती साही लिङ्गवर्णन ।।

आतां माहिती बोलती साही लिंगें । तिये कैसी कवणें ठाई असती सांगे । ते व्यापकें महातत्व अभंगे। स्वतः

सिद्ध जाणावें ॥ ५९ ॥ आचार लिंग आणि गुरु लिंग । शिव लिंग आणि जंगम् लिंग । प्रसाद लिंग आणि महा लिंग साहावें । बोलिजे ॥ ५६० ॥ आचार लिंगतें पृथ्वी बोलिजे सहज । गुरू लिंगतें आपविश्वाचें जीवन बीज । शिव लिंगते बोळिलें असे तेज । प्रकाश रूप ॥ ६१ ॥ जंगम् लिंगतो वायु नसेस्थिर । प्रकाश लिंगतें आकाश अतिसपुर । बोलत असती महा लिंगानिः शून्य अगोचर । ऐसी साहा लिंगें ॥ ६२ ॥ ये लिंग स्वयंभु असतीं साही । विचारितां दिसतीं सर्वांचे देहीं । या वेगळे कवणी चरा चर नाहीं । तर भज्य तो कवन ॥ ६३ ॥ स्थावर लिंगतें स्थावरीजे जनीं । स्मशान लिंगतें मेले याचे स्थानीं । नेम लिंगतें कंठि स्थानीं । पुजित अज्ञान ॥ ६४ ॥ ऐसें करूनि उपचार लिंग भक्ती । मुक्ती पावती कैलास रुद्र प्राप्ती । परी त्या ही फळ भोगांतीं । पतन असे ॥ ६५ ॥

### श्लोक गीतासु ।

आब्रह्मभुवनाल्लोकाः पुनरावर्तिनोऽर्जुन ॥
मामुपेत्य तु कौंतेय पुनर्जन्म न विद्यते ॥ ६४ ॥

आणि महा प्रळ्याचे काळीं । चतुर्दश भुवन होय होळी । तेथें कैलास प्राप्ति चंद्र मौळी । उरी कैची ॥६६॥ म्हणौनि जेथ कहींचि नसे पतन । तेचि बोलिजे मोक्षाचें साधन ॥ या कारणें गुणातीत ज्ञान । होवावेंचि लागे ॥ ६७ ॥

## अथ लिंग पुराणे

पातालेचांतरिक्षे दिशिदिशिगगने सर्वशैले समुद्रे ।
भूतौ काष्ठेच लोष्टे क्षितिजलपवने स्थावरे जंगमेच ॥
बीजे सर्वौषधीनामसुरसुरगणे पत्रपुष्पे तृणाग्रे ॥
सर्वव्यापी शिवोहं यदि भजसि भवान् नास्ति
देवो द्वितीयः ॥ ६५ ॥

हे वाक्य जाण शिव पुराणीचें । व्याप करवें बोलिलें असें शिवाचें । ऐसें जाणे तोन करी जीवाचें । अहित कहीं ( हिंसकपण ) ॥ ६८ ॥ यत्र जीव तत्र शिव बोलत । आणि हिंसाकरितां न कांटाळे चित्त । द्रोही बोलिजे पाप रत । विघातकीं ॥ ६९ ॥ नसतां शास्त्राभ्यासकुडा । वादी आडलया करूं म्हणती पवाडा । लाघव दाउनि जन बापुडा । भुलवीत असतीं ॥ ५७० ॥ लिंग फोडलिया जरी सांदे मागुते । तरी तुर्कीलिंगें फोडिलीं बहुतें तरी तें सामर्थ्य काईझालें तेथें । कानवर्तीचि ॥७१॥ जरी मनुष्य मारिलिया मागुतें उठे । तरी शिव भक्तांचें जीवत्व कां कुंठे । शोक जाळें हृदय का फुटे । द्वारीं मेलियाचा ॥ ७२ ॥ आणिक देखा आचार उफराटा । पाणिये धुती जंगमाचा आंगोठा । तेणें तर्पण करूनि मानिती गोमटा । लिंग धारण ॥ ७३ ॥ तरी लिंग तो म्हणती माहा देवो । तयावरी पायवणी हा कैसा भावो । देवापरीस भक्त थोर पाहाहो हा तयासी बोल ॥ ७४ ॥ आणिक आईका विपरीत धर्म । अधि तप मग घराश्रम

हाही कैसा देखावा व्यंति क्रम । सन्यास कर्म ऐसें नव्हे ॥ ७५ ॥ नसतां वस्तुचें यथार्थ ज्ञान । मग पाषाणीं निक्षिपिती मन । करिती उपासना वंदन ध्यान । तम मोहितजे ॥ ७६ ॥ जे अनुसरले प्रकृति वर्गा । ते पात्र झाले अधःपात सर्गा । चुकले परमार्थ मोक्ष मार्गा । जड बुद्धीचे ॥ ७७ ॥ असो येणें विणकाई काज । येथें जाणतेया न वाटे चोज । परी बोलणे सहज । व्यावृत्ती लागीं ॥ ७८ ॥

## प्र० ३२ देववर्ण

**नदेवश्चक्रपाणिश्च न देवः शूलधारकः ।**
**नाविधिः सविताचेंद्रः सदेवोयः सदाक्षयः ॥६६॥**

**॥ तथाच ब्रह्मांडपुराणे ॥ श्लोक.**

**नो ब्रह्मा विष्णुरुद्राः सुरपतिरमरा नो सुरानैव पृथ्वी**
**नापोग्निर्नोच वायुर्नच गगनतलं नो दिशो नैवकालः**
**नो वेदः सामवेदोपिहि न शशिरवी नो विधिर्नो**
**विकल्पः सज्योतिः सत्तमेवं (कं) विजयति ? परमां**
**सच्चिदानंददेवः ॥ ६७ ॥**

विष्णु महादेव दोन्ही । ब्रम्हा इंद्रादि दिनमणी । यासी क्षय असे म्हणोनि । नव्हती देवो ॥ ७९ ॥ जो अक्षयीं सतत । सृष्टी संव्हारी समर्थ । जीवो धरणी प्रशक्त । तोचि देव जाणा ॥ ८० ॥ आणि एक परि-यसा अनुवाद । जगीं वदती हरिहर संवाद । तेथें श्रोते

ऐकुनी आल्हाद । पावते होती ॥ ८१ ॥ तरी हरी म्हणिजे विष्णू वैकुंठनाथ हरु तो कैलासींचा उमाकांत । तया झाला परस्परें एकांत कवणें ठाईं ॥ ८२ ॥ रजे सृजिला ब्रम्हाकरी उत्पत्ती । सत्वेंसृजिला विष्णूतो जीवा जीवन स्थिती । तमे सृजिला रुद्र सर्व जीव जाती । हा संव्हार करी ॥ ८३ ॥ म्हणोनि सत्वरजतम तिन्ही गुण । हे सदाविरोधे वर्तती जाण तया परस्परें संवाद विवेक कथन । कैसें बोलावें ॥ ८४ ॥ आणि ब्रह्मा विष्णू महेश्वरु । पिंडीचि जाणावा त्रिगुण संचारु । कवणां कवण व्यापारू । हें अनुभवें जाणावें ॥ ८५ ॥ रजो गुणें इंद्रियांची चेष्टा । सत्वगुणीं धैर्य धर्म विवेक प्रतिष्टा । तमो गुणे क्रोध द्वेषु निकृष्टा । अपपर नाहीं ॥ ८६ ॥ आणि देवासी असतां त्रिकाळ ज्ञान । प्रत्येक्ष सकळ पदार्थांचें दर्शन । येथेंही वैखरी वाचेचे वर्तन । तर देव कैसे ॥ ८७ ॥ आणि त्रिगुण माया जानितेचि दैवत्रय । उत्पत्ति स्थिती करिती अव्हांतर प्रळये । हेंचि वर्तत असें कार्य । समत्वयोगें ॥ ८८ ॥ महा प्रळयीं एकसारिखें देखा । संव्हार पावती आशेखा ( अशेष ) । हे वेद शास्त्री पुराणी विशेखा । बोलत असती ॥ ८९ ॥ आणि असंख्य ब्रम्हा न जाणती । कोटी विष्णु प्रळया गेलेती अनंत इंद्र एके ध्यानस्थिती जाती । महादेवाचिये ॥९०॥ ते समस्त संव्हारले एक उरला । हा बोलुच दोष बोलिला। आणिक तमोर्मीचे ठाईं नाहीं देखिला । ज्ञान उद्भव कोठें ॥ ९१ ॥ आणि ईश्वरी ज्ञान हे बोलती । वरी हे साच ऐसे म्हणती । जरी निंबा आम्रफळें येतीं । तरी

साच माना ॥ ९२ ॥ म्हणोनि हा जीव कृत चित्र गाथा । पाखांडी घालिती देवाचिया माथा । थोराचेनि नावें आपुली कथा । सरती करिती ॥ ९३ ॥ तैसेचि उमाशंकर संवादु । तो मानवीं कृत्य सबंधु । देवफळीं संदेहाचा बाधु । बोलता दूषण असे ९४ ऐसी नानामतांची मोहर खोटी । प्रवृत्ती पडिली असे जीव सृष्टी । तेथें एकतत्वज्ञानीनानवटीं । निवाडकरी ॥ ९५ ॥

## गीता

नवेदयज्ञाध्ययनैर्नदानैः नचक्रियाभिर्नतपोभिरुग्रैः।
एवंरूपः शक्य अहं नृलोके द्रष्टुंत्वदन्येन कुरुप्रवीर

कुरु वीराहें माझें रूप । त्वाचि देखिलें गोप्याहुनि गोप्य । तेरा वेद शास्त्र यज्ञ दाना अप्राप्य । नेणती कवणी क्रिया तापसी ॥ ९६ ॥

## श्लोक गीतायां ।

वेदेषु यज्ञेषु तपःसु चैव दानेषु यत्पुण्यफलं प्रदिष्टम् ।
अत्येति तत्सर्वमिदं विदित्वा योगी परं स्थान-
मुपैति चाद्यम् ॥ ६९ ॥

ह्मणोनि वेद यज्ञ तप दानीं पुण्य फळ । तें परि त्यजूनि सकळ । माझा योग धरी तर केवळ । पावे परम स्थान ॥ ९७ ॥

## ॥ श्लोक भागवत ॥

तर्कोप्रतिष्ठः श्रुतयोपि भिन्ना

**नैको ऋषिर्यस्य मतं प्रमाणं ॥**
**धर्मस्य तत्वं निहितं गुहायां**
**महाजनो येन गतःस पंथाः। । ७०॥**

श्रुति स्मृती तर्क प्रमाण । ऋषी वाक्य बोलताति भिन्न भिन्न । नकळे धर्म तत्वाचें यथार्थ ज्ञान । ह्मणोनि भ्रमले मूढ ॥ ९८ ॥ वायवसा बोलती । नाना मतें प्रतिष्ठिती । अभिमानें करिती । विपरीत वादु ॥ ९९ ॥ आगम धर्म शाक्तेया पासून । जारण मारण सत्य विधी कारण । नाना विधी अयुक्ता व्यसन । प्रवर्तले ॥ ६०० ॥ बाळा बगळा मुखी शंकरी । विद्या अभ्यासती नाना परी । परां आत्म हितीं संसारी । कवणी प्रर्वतेचिना ॥ १ ॥ हे त्यजून सकळही धर्म । जेहीं सेविलें ज्ञानोत्तम । तेचि महा पुरुष नाम । पावले परपंथीं ॥ २ ॥

## प्र० ३३

आतां असो मतांतर: भेद ज्ञान । सांगो संताचें महिमान । जें आईकि लिया अंतःकर्ण । निर्मळ होय ॥ ३ ॥ जैसें चंदनाचिया संगतीं । वेधती सकळ वनस्पती । तैसी संतसेवा ऊर्ध्व गती । विवरु होय ॥ ४ ॥ तया संताचिया गुणा । अमृत उपमूं नये जाणा । तै सेविलिया अंतःकर्णा । पालटु नव्हे ॥ ५ ॥ जैसे व्याघ्रें केलिया अमृत पान । वाचती तयाचे प्राण । परी तेथ असती दुषण । नाहीं निर्वैरता ॥ ६ ॥ ह्मणोनि तया पस्ये सांधू संग मधुर । तो अमृता पासाव करी अमर ।

पारुखवी सर्व काळ वैर । भूतमात्रीं ॥ ७ ॥ तया साधुची ओळखी काई । दश लक्षणे असती जयाचा ठाईं । तो मोक्षाचा वेवसाई । जाणिजे श्रोता ॥ ८ ॥

अक्रोधवैराग्यजितेंद्रियत्वं ।
क्षमादयासत्यजनाप्रियत्वं ॥
निर्लोभदानंभवमुक्तनित्यं ।
ज्ञानप्रबुद्धे दश लक्षणानि ॥ ७१ ॥

अक्रोध वैराग्य आणि निराशी । जितेंद्रिये होऊनि तापसी । क्षेमा ह्मणिजे पृथ्वी ऐसी । धीरत्व पर्वत तुल्य ॥ ९ ॥ अहिंसकत्वें भूत दयाळु । सरळतां हृदयीं निर्मळु । वाचे सी लागोनेदिमळु । असत्याचा ॥ १० ॥ जन प्रिय निरवैर जनीं । निर्लोभ सत्पात्र दानी । संसार मुक्त कर्म बंधनीं । कहींचि लिप्त नव्हे ॥ ११ ॥ येही दश लक्षणी सहीत । जो निरंतर असे वर्तत । तोचि म्हणावा निर्गुण संत । परोपकारी ॥ १२ ॥ जो अपेक्षा रहित सदा । जीव दोष नातळे कदा । तोचि देह त्यागी परमा नंदा । पात्र होये ॥ १३ ॥ परी जेणें ओळखिजे तो साधु । तो नाहीं शास्त्र श्रवण बोधु । जैसा रत्न परीक्षा गर्भ अंधु । करूं नेणे ॥ १४ ॥

गर्वनो वहते न निंदाति परान् नो भाषते निष्ठुरं ।
उक्तं केनचिदप्रियं च सहते नक्रोधमालंवते ॥
श्रुत्वा काव्यमलक्षणं न कुरुते संतिष्ठते मूकवत् ।
दोषांश्छादयते स्वयं न कुरुते एतत्सतां लक्षणं
॥ ७२ ॥

ऐसें संताचें लक्षण । बोलत असे शास्त्र पुराण । ते जाणावे प्रमाण । यथार्थवंतीं ॥ १५ ॥

**यस्य नास्ति स्वयं प्रज्ञा शास्त्रं तस्य करोति किं ? ।**
**लोचनाभ्यां विहीनस्य दर्पणः किं करिष्यति ? ॥ ७३ ॥**

जयासी स्वयं प्रज्ञा नाहीं । तयासी शास्त्र महिमा नकळे कांहीं । जैसे नेत्र हिना दर्पणी कांहीं । प्रति बिंब न दिसे ॥ १६ ॥

**किंकुलेन विशालेन विद्याहीनस्य देहिनः ॥**
**अकुलीनोपि विद्यावान्दैवतैरपि पूज्यते ॥ ७४ ॥**

विद्या रहिता पुरुषासी । जन्म जाले उत्तमवंशीं । तें जैसे पद्मिणींचा कुशीं । नपुंसक होय ॥ १७ ॥ आहोच्युत तरुचा पालवी देखा । जरी जन्म पावला कावरखा । तरी तो रसना इंद्रिय सुखा । योग्य नव्हे ॥ १८ ॥ तैसे उत्तमें वंशीं जन्म । विद्या रहित विषया राम । ते निर्फळ सर्व अधम । उत्तमा सेव्य नव्हे ॥ १९ ॥

**येषां न विद्या न तपो न दानं ।**
**ज्ञानं न शीलं नगुणोन धर्मः ॥**
**ते मर्त्यलोके भुविभारभूताः ।**
**मनुष्यरूपेण मृगाश्चरंति ॥ ७५ ॥**

तथाचि जन्मला हीन योनीं । तो धर्मालंकृत तत्व ज्ञानी ! तया म्हणिजे महा मुनी । योगेश्वरू ॥ ६२० ॥

तो वंद्य असे समस्त लोकां । पूज्य सुरवरा ब्रम्हादिका । तयाचे हृदयीं जगदीश नायका । सदावसु ॥ ६२१ ॥

**॥ भा० सत्पमस्कं० प्र० ३४ गुणकर्मोत्तमोधमवर्णन ॥**

**विप्रादिषड्गुणयुतादरविंदनाभपादारविंदविमुखा-च्छ्वपचं वरिष्ठं ॥ मन्ये तदर्पितमनोवचने ( नं ) हितार्थ प्राणं पुनाति सकलं नतुभूरिमानः ॥७६॥**

हीनें योनीं जालें जन्म । आणि ओळाखिलें परब्रम्ह । तें षटगुण विप्राहुनी उत्तम । बोलिले असे ॥ २२ ॥ तुम्ही म्हणाल कवण कवण । तर आतां आईका सांगेन ते माहापवित्र साधुजन । तीर्थरूप ॥ २३ ॥ वसिष्ट विश्वामित्र वाल्मिक । गर्गव्यास आणि शुक । हे विद्यापूर्ण परमार्थीक । अकुलीन म्हणावे ॥ २४ ॥ तयाचे पाहातां जन्म स्थान । आणि वर्ण रहित विलक्षण । तयाचे सांगतां आख्यान । विचित्र असे ॥ २५ ॥ येचि प्रसंगीं साध्य निबंध । तेचि पवित्र जें ब्रम्हविद । येर देवताप्रतिष्टेचे वेदविद । परी ऋषी मूळ सांगेन ॥ २६ ॥

**शशकीगर्भसंभूतो गोतमोपि महामुनिः ॥**
**तपसा ब्राह्मणो जातो न जातिस्तवत्र कारणं ॥७७॥**
**कौशिकीगर्भसंभूतः कुसुमास्तीर्ण उच्यते ॥**
**तपसा ब्राह्मणो जातो न जातिस्तत्र कारणं ॥७८॥**
**मर्कटीगर्भसंभूतो मार्कण्डेयो महामुनिः ॥**
**तपसा ब्राह्मणो जातो नजातिस्तत्र कारणं ॥७९॥**

गौतमु जन्मला शशिकीं पोटीं । कुसमस्तीर्ण तो कौशकीच्या पोटीं । ऋष्य श्रृंग मृगीसुत, जन्ममर्कटी । पासूनि मार्कंडयो ॥ २७ ॥

**हरिणीगर्भसंभूतो ऋष्यश्रृंगो महामुनिः ।**
**तपसा ब्राह्मणो जातो न जातिस्तत्र कारणं ॥८०॥**
**उर्वशीगर्भसंभूतो वसिष्ठोपि महामुनिः ॥**
**तपसा ब्राह्मणो जातो न जातिस्तत्र कारणं ॥८१॥**

वसिष्ट माता बोलिजे उर्वशी । तो अनुष्ठिता ब्रम्ह ऋषी । आचार्य होउनी सूर्य वंशीं । वर्तत असे ॥ २८ ॥

**क्षत्रिणीगर्भसंभूतो विश्वामित्रो महामुनिः ॥**
**तपसा ब्राह्मणो जातो न जातिस्तत्र कारणं ॥८२॥**

विश्वामित्र तो महा तापसी । तया जन्म क्षत्रियाचे वंशीं । तो बोलिजे महाराज ऋषी । सामर्थ्ये आगळा ॥२९॥

**कैवर्तीगर्भसंभूतो वेद्व्यासो महामुनिः ॥**
**तपसा ब्राह्मणो जातो न जातिस्तत्र कारणं ॥८३॥**

कैवर्तीचे कुशी । जन्मला व्यासऋषी । तेणें अष्टादश पुराणांसी । विस्तारू केला ॥ ६३० ॥

**भिल्लिणीगर्भसंभूतो वाल्मीकिरपि सन्मुनिः ॥**
**तपसा ब्राह्मणो जातो न जातिस्तत्र कारणं ॥८४॥**

वाल्मीका जन्म भिल्लाचे योनी । तया वास दंडकारण्यी । असत कर्म प्रवर्तूनि । निरंतरअसे ॥ ३१ ॥
तया जाला ऋद्र प्रसन्न । राम न होता कथिलें रामायण । तें जगा जाले पुराण । पठावया ॥ ३२ ॥

**गर्दभीगर्भसंभूतो गर्गाचार्योपि सन्मुनिः ।**
**तपसा ब्राह्मणो जातो न जातिस्तत्र कारणं ॥८५॥**

गर्गाचार्या जन्म गर्धवीं । ते रूप धरून आली पृथ्वी तो भारद्धज वीर्य महा कवी । अदिपर्वीं बोलिले असे ॥ ३३ ॥ तो ज्ञानें तपे आगळा । शोभत असे ब्रम्हण्य कळा । तो बोलिजे श्रेष्ट सकळा । महाकवी ॥ ३४ ॥ तो आचार्यत्व करी सोमवंशी । तेणें कृष्ण नांव ठेविले परियेसी । ते भागवती बोलिले असें । दशपस्कंधी ॥३५॥ जैं अवतरला देवांचा रावो । तैं नंदा जाला पुत्र उत्सावो आफाविला गर्ग महानुभावो । आदरेंसी ॥ ३६ ॥ नंदें केलें अभिवंदन । ऋषीनें दिधले स्वस्ति वचन । मग रचिलें श्रेष्ट आसन । अर्चन हेतु ॥ ३७ ॥ तेथें बैसला गर्ग महामुनी । नंदे पुजा केली अनर्घ्य रत्नीं । मग संतोषला अंतःकर्णी । गर्ग ऋृषी तो ॥ ३८ ॥ नंदे बाळक बाहीं आळंगिलें । गर्गा उसंगिये घातलें । या सि नाव काई म्हणतलें । गर्गेश्वरें ॥ ३९ ॥ जो जाणो-त्रिकाळ ज्ञान । भूत भाविष्य वर्तमान । अवधारिलें नाम रूप वर्ण गुण । लक्षण पुर्वक ॥ ६४० ॥ गर्गें नमस्करिलें चरण कमळ । म्हणे नंदा हें परब्रम्ह केवळ । तुझें जन्मझालें सफळ । तुझेंनि भाग्ये ॥ ४१ ॥

**भागवते गर्गउवाच प्र० ३५ श्रीकृष्णाग्रपूजा ॥**

**बहूनि संति नामानि रूपाणिच सुतस्यते ॥**
**गुणाः कर्माणि रूपाणि तान्यहं वेद नो जनः ॥८६॥**

## भाग० दशमेपूर्वार्धे अ०८ ॥

**आसन् वर्णास्त्रयो ह्यस्य गृण्हतोऽनुयुगं तनूः ॥**
**शुक्लो रक्तस्तथापीत इदानीं कृष्णतां गतः ॥८७॥**

तुझ्या पुत्राचिये क्षिती । बहुतें नामें रूपें असती । तिये कवणीच नेणती । मीच जाणे ॥ ४२ ॥ कृतीं शुक्ल वर्ण सुंदर । त्रेतीं आरक्त वर्ण तनुकार । कलियुगीं पीत वर्ण नागर । आतां कृष्णनाम श्याम रूप ॥ ४३ ॥ यासी तीन वर्ण असतीं । जे सिद्धांती बोलती । जीव उद्धरावया अवतरे क्षिती । तेणें प्रकारें ॥ ४४ ॥ आतां व्यास वीर्य पाराशराचें । जें गरोदर मच्छिंद्रींचें । तेथें मथन केलें शास्त्राचें । बोलिले श्री भागवतीं ॥ ४५ ॥ जन्मेजया पूर्वज निंदा दूषणें । तेणें दोष घडले ब्रह्म हनन । तयाचें होवावया पुरश्चरण । भारत कथिलें ॥ ४६ ॥ शूक व्यासाचा पुत्र परियेसी । तो जैं होता गर्भवासी । तै तेणें योनी सांगितल्या चौऱ्यायशी । जन्म न होता ॥ ४७ ॥ गर्भी असतांचि तया स्मरण । वरी श्रीकृष्णाचे सन्निधान । म्हणोनि वाचा जाली सूक्ष्म ज्ञान । तें ऐकिलें ॥ ४८ ॥ तो ब्रह्मचर्याचा पुतळा । ह्मणोनि अग्र पूजे ऋषी सकळा । महा ज्ञाता तपें आगळा । आधि पूज्य मान ॥ ४९ ॥ शुक देवें म्हणितलें समस्तातें । तुम्ही वडिलें आणि व्यास-देव मे पिते । तर तया विद्यमान आमते । पूजा काईसी ॥ ५० ॥ तव बोलिले व्यास देव आचार्य । शुका आम्ही असो ब्रह्मज्ञानीय । परी नाहीं आत्म निग्रह ब्रह्म-चर्य । म्हणोनि तूं पूज्य ॥ ५१ ॥ तव शुक म्हणे ऐक

ताता । हा श्रीकृष्ण सकळ ज्ञानियांचा पिता । जगद्वंद्य आणि मोक्ष दाता । तया पूजावें ॥ ५२ ॥ जो वेद आगमासी आकळ । आनंद पूर्ण स्वच्छंद लीळ । तेणें मांडिला असे खेळ । मनुष्य वेषें ॥ ५३ ॥ जो अनंत ब्रम्हांड व्यापक । चराचरासी नायक । तयातें हा प्राकृत लोक काई जाणे ॥ ५४ ॥ जो परब्रह्म पुतळा । अनंत गुण अनंत लीळा । सर्वांतु असुनि प्रपंचा वेगळा । नातळे विषया ॥ ५५ ॥ जो सर्वज्ञ बहुरूप नाटकी । न पाविजे साधनीं अन्येकी । तो मनुष्य रूपें मृत्यु लोकीं । वर्तत असे ॥ ५६ ॥ तया पुजावें अग्रपूजे । पाठीं अवघीचि होती काजे । ऐसा निरोप धर्मासि देइजे । झडकरोनि ॥ ५७ ॥ तव शुकाचे बोली सकळी । ऋषी देवीं पिटली टाळी । धर्में अफाविला वनमाळी । अग्रपूजेलागीं ॥ ५८ ॥ तव अग्रपूजा होतिये काळीं। शिशुपाळ देत आला शतगाळी । तयासी देऊनि महा-बळी । यज्ञ सिद्धी–नेला ॥ ५९ ॥ आणि परिक्षितीसी घडलें शापदूषण । तयाचें होवावया पापदहन । शुकें केलें कथामृत श्रवण । श्री भागवतें ॥ ६० ॥ तिये श्रीकृष्णाची लीला चरित्रें । अमृत रूपें महापवित्रें । आइकता मुक्ती झाली सप्त रात्रें । परिक्षितीसी ॥ ६१ ॥ म्हणोनि श्रीकृष्ण चरित्राविण । नाहीं मोक्षदायक आन । ऐसेंचि भागवतीं प्रमाण । बोलिलें असे ॥ ६२ ॥ अंश कळा सकळही अवतार । आणि श्रीकृष्ण तो परात्पर । पूर्ण ब्रह्म हा निर्धार । बोलिला असे ॥ ६३ ॥

प्र० ३६ भक्तमहीमावर्णन

म्हणोनि श्रीकृष्ण भक्ताची थोरी । वाखाणिता कवणी नपवे सरी । हा भाव बोलिला असे गीते माझारी । नवमाध्यायी ॥ ६४ ॥

**गीतायां**

**अपिचेत्सुदुराचारो भजते मामनन्यभाक् ॥**
**साधुरेव स मन्तव्यः सम्यग्व्यवसितोहिसः ॥८८॥**

जरी दुराचारी झाला अतिशयेसी । अनन्य भावें मातें भजे अहिर्निशीं । तो साम्य मोक्षाचा वेवसी । साधूचि म्हणावा ॥ ६५ ॥

**॥ गीतायां ॥**

**क्षिप्रं भवति धर्मात्मा शश्वच्छांतिं निगच्छति ॥**
**कौन्तेय प्रतिजानीहि न मे भक्तः प्रणश्यति ॥८९॥**

तो तात्काळिकीं होय धर्मात्मा । शाश्वत शांतीते पावे ऐसी महिमा । माझेया भक्ता नाश नाहीं नरोत्तमा । ऐसी प्रतिज्ञा करी ॥ ६६ ॥

**गीतायां**

**मां हि पार्थ व्यपाश्रित्य येपिस्युः पापयोनयः ॥**
**स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेपि यांति परांगतिं ॥९०॥**

स्त्री वैश्य आणि शूद्र समस्त । पापयोनींचेही पार्था मातें उपासित । तेही मोक्ष गतीतें पावत संशयो नाहीं ॥

॥ गीतायां ॥

**किं पुनर्ब्राह्मणाः पुण्या भक्ता राजर्षयस्तथा ॥**
**अनित्यमसुखंलोकमिमं प्राप्य भजस्व मां ॥९१॥**

भज भक्त राजर्षी आणि ब्राह्मण । हे पावती येथें आश्चर्य कवण । अनित्य असुखा लोक हे देह पावन । भज माझेचि ठाईं ॥ ६८ ॥

गीतायां

**मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु ॥**
**मामेवैष्यसि युक्त्वैवमात्मानं मत्परायणः ॥ ९२ ॥**

माझा भक्त माझेचि यजनकरी । मन्मयो होउनी मातें चि नमस्कारी । मत्परायण तु आपण यातें युक्त करी । तरी मातेंची पावसी ॥ ६९ ॥

**मधुभारतकस्तूरीनदीनृपतियोगिनः ॥**
**नैतेषां शोधयेन्मूलं सारं गृण्हतु पंडिताः ॥ ९३ ॥**

मधु कस्तुरी आणि भारत । नदी राजा आणि निवृत्त। तयाचें मूळ न शोधिती पंडित । सारग्राहिक ॥ ७० ॥
ऐसें महानुभाव पुण्य पवित्र । तयाचें न पहावें कुळ गोत्र। ते आचार्य तीर्थ भूत । महा पात्र साधू जन ॥ ७१ ॥
जैसी मातंग गृहींची पितळ । ते पावे ओत कर्मीं याची शाळ । प्रतिमा झालेया द्विज कुळ । पूजी भावे ॥७२ ॥
धातुत्वें तरी पालटु नाहीं । वर्ण तोहि पूर्वीलचि पाही । परि देवत्व आलेया कांहीं । बोलुंच नये ॥ ७३ ॥

कुचिळ भूमि केचें जीवन । गंगे मिळाले या सेविती सर्व जन । आणि अग्नी पूजिती ब्राह्मण । आनामिका गृहींचा ॥ ७४ ॥ अग्नीमाजीं पडिलें इंधन । तेंही अग्नी होउनी पावे प्रतिष्ठा पूजन । तेवि अनामिकाचें द्रव्य जाण । संग्रहीती ॥ ७५ ॥ म्हणोनि वस्तु असतां ज्ञान पवित्र । तयाचें न विचारावें कुळगोत्र । ऐसें बहुतीं दृष्टांतीं शास्त्र । बोलत असती ॥ ७६ ॥ तैसा श्रीकृष्ण भक्त हो कां भलेता । प्रज्ञावंत असोनि आचरता । पात्रत्व आले या जाणता । तो आव्हेरू नये ॥ ७७ ॥

**कौशेयं कृमिजं सुवर्णमुपलाद्दूर्वापि गोरोमतः ॥**
**पंकात्तामरसं शशांकमुदधेरिंदीवरं गोमयात् ॥**
**काष्ठाद्वान्हिमहीश्वराद्वरमणिंगोतोपि गोरोचनं ॥**
**प्राकाश्यं स्वगुणोदयं न गुणिनो (?) तस्यास्ति किं जन्मना ॥ ९४ ॥**

जैसे कृमी पासाव पट कुळ । सुवर्ण खाणी बोलिजे उपळ । पृथ्वीरोमा दूर्वा दर्भ आणि कमळ । पंकापासोनि ॥ ७८ ॥ क्षीरसागर जन्म भूमी चंद्रा । गोमेया पासाव इंदीवरा । अथवा काष्ठापासाव उद्भव वैश्वानरा । सर्व यज्ञ-सिद्धी ॥ ७९ ॥ मुक्ताफळा जन्म फणीमौळी । गोमेत गोरोचन तें द्विज भाळीं । आपुले निगुणोदयें प्रकाशली । तेथें जन्माचें काई ॥ ८० ॥ कागा विष्टीं जन्म झालें पिंपळा । तो वंद्य झाला द्विजकुळा । कोश किटकीपासून जन्म पटकुळा । तेंहीन कैसें म्हणावें ॥ ८१ ॥ वैश्या कुमारी गंडकी बाळा । ते माता झाली शाळिग्रामादि

देवा सकळा । ऐसी कथांतर देव द्विजकुळा । अपुज्य म्हणावे ॥ ८२ ॥

॥ श्लोक ॥

**व्याधस्याचरणं ध्रुवस्य च वयो विद्या गजेंद्रस्य का ॥ का जातिर्विदुरस्य यादवपतेरुग्रस्य किं पौरुषं ॥ कुब्जायाः कमनीयरूपमधिकं किं तत्सुदाम्नो धनं ॥ भक्त्या तुष्यति केवलं न हि गुणैर्भक्तिप्रियः श्रीपतिः ॥ ९५ ॥**

कर्माचरणें जरी होय पावन । तरी व्याधाचें काई आचरण । वैश्या पाविजे अढळस्थान । तरी ध्रुव कुमार पाहे कीं ॥ ८३ ॥ विद्याभ्यासें जरी होय मुक्ती । तरी गजेंद्रासी काई विद्या होती । सौंदर्यें जरी होय मुक्ती । तरी कुब्जा काई ॥ ८४ ॥ द्रव्य जरी होय उद्धारण । तरी सुदामे यासी कांहीं होतें धन । सुकुळीया जरी होये उद्धरण । तरी विदुर काई ॥ ८५ ॥ पुरुषार्थें जरी होय नृपति । तरी उग्रसेनासी काई क्षत्रवृत्ती । म्हणोनि भक्ती रहीत गुणी तोख नाहीं श्रीपती । भक्त प्रिय थोर ॥ ८६ ॥

**इंदुं निंदति चक्रवाकयुगलंभासांनिधिं कौशिकः । क्षीरस्वादमरिचिकीं सुकृतिनं पापीजडःपण्डितं ॥ युक्तं सर्वगुणैः खलः कटुवचग्रामः सुरंचासुरः । कोऽप्येवं नहि गोलके प्रतिदिनं सन्मान्यको वर्तते ॥९६॥**

चंद्राचा भाव कैसा परिकर । जो ताप तत्वावें करी विज्वर । परि तयाचा द्वेष करिती निशाचर । कुवेशना लोगीं ॥ ८७ ॥ आणि कोकिळा मंजुळस्वर । कौशिका न साहे निर्धार । अशक्ता षड्रस उपचार । न भावती ॥ ८८ ॥ आणि पापिया ना आवडि सुकृती । आणि मूर्खा न माने पंडित उक्ती । आणि खळु सर्व गणजाती । देखो नसाहे ॥ ८९. ॥ तैसा साधु व्यापारे स्वभावता । तयाचा हेतु जिवोद्धरणी उपकारता । परि तो नावडे दुर्जनापापरता । कर्म जडासी पैं ॥ ९० ॥ जैसी वैश्वानराची इंगळी । दहन करी चंदन वनस्थळी । जैशी दुर्जनाची जिव्हा जाळी । साधुचैतन्यातें ॥ ९१ ॥

**यः पुत्रः पितरंद्वेष्टि द्वेष्टि बंधुजनानपि ॥**
**वासुदेवकथां द्वेष्टितंविद्यात्परवीर्यजं ॥ ९७ ॥**

जयाची कारणें आईका तो नावडे पितृलोका । अंती जाय नरका । जे अवगती बोलिली निंदका । द्वेषी म्हणोनिया ॥ ९२ ॥ तया पितर द्रोह असे सदा । ब्रह्मज्ञानियाची करी निंदा । वासुदेव कथेचे ठाई सदा । तत्पर नव्हे ॥ ९३ ॥ उत्तम नरदेह पाउनी । जयाभरूं संत पैशुन्यी । तो जन्म पावे अंत्यज योनी । श्वान शुकरादी ॥ ९४ ॥

### “ नारदेनोक्तः ” श्लोक

**धातस्ताततवैवदूषणमिदं यन्नाम कस्तूरिका ।**
**कांतारांतरवासिनां तृणभुजां नाभौ कृता मृत्यवे ॥**

**यद्येनां ननु दुर्जनस्य रसनाकंदेऽकरिष्यस्ततो—**
**नायासेन तदाऽभविष्यदुभयं कीर्तिश्च निर्दोषता**
**॥ ९८ ॥**

हेंचि नारद म्हणे ब्रम्हयातें । ताता एक दूषण असे तुमतें कस्तुरी नाम जियेते । ते निर्मिली कोठें ॥ ९५ ॥ जे मृग तृण सेवी सदावसे रानीं । कस्तुरी निर्मिली तयाचे नाभिस्थानीं । तिये निमित्य प्रवर्तले मरणीं । पाप रूपी जे ॥ ९६ ॥ तथापि तियेचि वारींचें । जिव्हा मूळ निंद-कांचें । निर्माणस्थान कस्तुरीचें । निके होय ॥ ९७ ॥ तिये कस्तुरी कारणें । आवच्छेद होता दुर्जनरसने । तरी अवघींच पारुखती दुषणें । आन्यासेंपैं ॥ ९८ ॥ कस्तुरी उपयोगा जाती सकळा । दोन्हीं किर्ता होतीया निर्मळा । ऐसा ब्रह्मसुत कव्हणे एके वेळा । बोलता झाला ॥ ९९॥ परी जयाची जैसी जोडी । तो आपली वासना न सोडी जैसी अनाचारिया बहुत गोडी । सप्तव्यसनाची ॥ ७००॥

**प्रकर्ण ३७ सत्पव्यसन ॥**

**द्यूतंच मद्यं पिशितंच वेश्या ।**
**पापर्द्धिचौर्यं परदारसेवा ॥**
**एतानि सप्तव्यसनानि नित्यं ।**
**घोरातिघोरे नरके पचंति ॥ ९९ ॥**

तियेचि सत्पव्यसनें कवणें । जूं मद्यपानमांस भक्षणें । वेश्यागमन पारधी खेळणें । निरंतर ॥ १ ॥ चोरी आणि परद्वार । हा सत्पव्यसनी दुराचार । तया अंतीं नरक घोरांतघोर । पचत बोलिले असे ॥ २ ॥ हे जरी

न वटे साचार । तरी सांगो आईका साक्षात्कार । जूं खेळिन्नला युधिष्ठीर । तया काय झाले ॥ ३ ॥ यादवी केलें सुरापान । भंगिले श्रीकृष्णाचें वचन । तया थोर घडले पतन । गोत्रवधाचे ॥ ४ ॥ मांस अहारी दशरथ राणा । तो नित्य वधे श्वापदाच्या प्राणा । तेणें पापें श्रावणाचा वध जाणा । घडला पितरा सहित ॥ ५ ॥ वैश्या गमन करी राजा माल्हनु । म्हणवी नवकोटी नारायणु । परिथोर पावला अपमानु । वनिता संगे ॥ ६ ॥ नित्य पुण्य करी पंडुराणा । शतयज्ञा माजी एकयज्ञ उणा । तया ऐसी उपजली वासना । पारधी खेळावयार्ची ॥ ७ ॥ पारधी खेळतां तेणें । दोन्ही रमतां देखिलीं हरणें । ते वधिलीं एकचि बाने । न लगता वेळ ॥ ८ ॥ तव ते ऋषीश्वरें दोन्ही । किंदम आणि किंदमणी । तेणेंही शापिला राजे शिरोमणी । कुरुवंशीचा ॥ ९ ॥ तयासी तोचि मृत्यु घडला । तो स्वर्ग द्वारी पाउटी झाला । हा अभिप्राव असे बोलिला । आदिपर्वीं ॥ १० ॥ चोरी हे प्रगट व्यसन । येणें एकाचे जाती प्राण । एकाचे गेले सर्व धन । राज्यद्वरा ॥ ११ जेथें राज्यकरी रावो मुऱ्हारी । ते महापवित्र द्वारकापुरी । तेथें वर्तली चोरी । व्यसन दोषें १२ जे श्रीमंत रत्न परिकर । प्रसवे सुवर्ण अठरा भार । तें फळरूप नव्हेचि आतुर । व्यसनीयासी ॥ १३ ॥ मणी चोरोनि पळाला सत धाना ? । तोवंचला श्रीकृष्ण सनिधाना । आणि सर्व मुखप्राणा । सुकृता सहित ॥ १४ ॥

अन्यक्षेत्रकृतं पापं पुण्यक्षेत्रे विनश्यति ॥
पुण्यक्षेत्रे कृतं पापं वज्रलेपो भविष्यति ॥ १०० ॥

अन्यत्रीं कीजे पापाचरण । तयाचें तीर्थीं होय पुरश्चरण । तेथही घडलेया दूषण । तयासी प्रायश्चित नाहीं ॥ १५ ॥ अहिल्या सुंदरी पतिव्रता । ते गौतमाची कांता । ईंद्र झाला अभिलाषिता । कपट रूपें ॥ १६ ॥ तो गौतमें शापिला अवधारी । भगे पडली सर्व शरीरीं । ते भगिंद्र नाम लोकांतरी । वर्तत असे ॥ १७ ॥ आईकिजे महापती लंकावीर । ते जेणें बांधोडी घातले सुरवर । तेणें अभिलाषलें अंतोर । रामचंद्राचें ॥ १८ ॥ तयासी तेचि घडलें पतन । पापें झालें लंकेचें दहन । खंडले आयुष्य नासले प्राण । तया राक्षसाचे ॥ १९ ॥ तो न धरिचि पापाचे भेव । तेणें राज्य सुखासी क्षयो । ऐसा सप्त व्यसनी अपाव । बोलिला असे ॥ ७२० ॥ असो हा निर्मळ उपदेशु । आतां कांहीं बोलों भक्तिरसु । जे अनुष्ठिलिया परब्रह्म वासु । निरंतर असे ॥ २१ ॥

## प्र० ३८ भक्ती सोरसवर्णन ॥

ते भक्ति कैसी ऐका । जैसे निर्वाण पैं चातका । तो न सेवी अन्यत्र उदका । मेघावांचूनि ॥ २२ ॥ ना तरी मांयाविण बाळका । कोमाई जीवीतकळिका । तैसा भक्त जगदीश नायका । विण कोमाये ॥ २३ ॥ अथवा उदकीं असे मासोळी । ते नुरे जीवना वेगळी । तैसा भक्त वियोगें तळमळी । देवा कारणें ॥ २४ ॥ जैसा उत्तम ब्राह्मण अनुष्टानीं । तो मातंग देखुनि कांटाळे मनी । तैसा

भक्त निर्गुण तत्वज्ञानी । नातळे कवणा ॥ २५ ॥ पर-
मेश्वर भक्त ते इष्टकारक । परत्र विषयीं मोक्ष दायक ।
समर्थ पणें सर्वांशी व्यापक । होऊनी वर्ते ॥ २६ ॥
म्हणाल आपले या मतीं । करूनि बोलत असे व्युत्पत्ती ।
तर यथार्थ वाक्य भागवतीं बोलिलें असे ॥ २७ ॥

**श्रीभगवानुवाच ॥ श्लोक ॥**

**यथा तरोर्मूलनिषेचनेन ।**
**तृप्यन्ति तत्स्कंधभुजोपशाखाः ॥**
**प्राणोपहाराच्च यथेंद्रियाणां ।**
**तथैव सर्वार्हणमच्युतेज्याः ॥ १०१ ॥**

जैसे वृक्ष मूळा केलें सिंपणें । तृप्ती पावे शाखाफळ पुष्पपानें । अथवा प्राणोपहारी इंद्रिय गुणें । तृप्तीपावे ॥ २८ ॥ तैसे भजन घडलेया अच्युतीं । सकळ देवा भजन तृप्ती । परी तयाजे भजनें नाहीं प्राप्ती । परमेश्वरी ॥ २९ ॥ येरीं भक्ति त्रिगुणात्मका । राजसा तामसा सात्विका । तया नव्हती मोक्ष दायका । पतन रूपा ॥७३०॥

**गीतायां ॥ श्लोक ॥**

**यजन्ते सात्विका देवान् यक्षरक्षांसि राजसाः ॥**
**प्रेतान्भूतगणांश्चान्ये यजन्ते तामसा जनाः ॥१०२॥**

सात्विक बोलिजती देवलोक । राजस यक्ष राक्षसादिक । तामस भूत प्रेतें समूहादिक । पाषाण प्रतीमा ॥ ३१ ॥ जैसी व्यभिचारणी गणिका । ते पती न म्हणे कवणा एका । तैसिया नानाभक्ति कामिका । भजती अभिलाषें ॥ ३२ ॥

जैसें लेंकरू विये सामान्य वनिता । तेणें कवणासी म्हणावे पिता । तैसे जाले देखत देखतां । अज्ञान जनासी ॥३३॥

गीता

अन्तवत्तु फलं तेषां तद्भवत्यल्पमेधसां ॥
देवान्देवयजो यांति मद्भक्ता यांति मामपि॥१०३॥

ते अल्प बुद्धीचे त्रिगुण भक्त । फळ भोगा नंतरें होति पातित । देव यजक पावती देवातें सत्य । नाहीं भक्ता पुनरावृत्ती ॥ ३४ ॥

॥ दशमे भगवतोक्तं ॥

यस्याऽऽत्मबुद्धिः कुणपे त्रिधातुके ।
स्वधीः कलत्रादिषु भौम इज्यधीः ॥
यत्तीर्थबुद्धिः सलिलेन कर्हिचित्
जनेष्वभिज्ञेषु स एव गोखरः ॥ १०४ ॥

जे तिहीं धातूचे निर्मित शरीर । तयाचेठाई जया आत्मबुद्धी थोर । नो मुढमतीचा बैल आणि खर । बोलिला असे ॥ ३५ ॥ आणि स्त्री पुत्रादि शरीरसंबंधी । तया चेठाई जयाआत्मबुद्धि । आणि पाषाणी सज्ज भावयजती । तो गोखर बोलिजे ॥ ३६ ॥ जो जळाचे ठाईं तीर्थ बुद्धी धरीं । काळ विशेष परत्व स्नानकरी । तो मूढमतीचा अवधारी । बोलिला असे ॥ ३७ ॥ यथार्थ ज्ञानिये साधूजण । तयाचेठाईं ते बुद्धिनाहीं जाण । हें दशमस्कंधी भगवद्वचन । बोलिलें असे ॥ ३८ ॥ परसंताची महिमा ।

न कळे प्राकृत अधमा । तो आवडे एका पुरुषोत्तमा । भक्ति भावे ॥ ३९ ॥

## पांडव गीता.

वासुदेवं परित्यज्य चान्यदेवमुपासते ॥
तृषितो जान्हवी तीरे कूपं खनति दुर्मतिः॥१०५॥

परी त्यजूनि वासु देवातें । जे उपासती अन्य देवतातें । तियेव्यभिचारिये नानाव्रते । चाळीती सदा ॥ ७४०॥ जैसा कवणी तृषावंत अवधारीं । बैस उनि जान्हवींचे तीरीं । तेथही कुप खणुं आदरी । तो दुर्मती बोलिजे ॥ ४१ ॥

## श्लोक पांडव गीतायां.

वृक्षादि नीचैस्तु कृतानु संज्ञा ।
न धातु मृदारु मया विशेषः १ ॥
भजन्तिये माधव निंदकास्ते ।
पूर्णः सदानंदमयोप्यजन्मा ॥ १०६ ॥

ऐसें पांडव गीतेचें निरूपण । धातू मृत्तिका काष्ठ पाषाण । तेथ माझा निश्चये ठेविती अज्ञान । मंद बुद्धीचे ॥ ७४२ ॥ जें माधव बुद्धी भजती प्रति माते । ते माझे निंदक जाण निरुते । कांजे मज पूर्ण सदा नंद अजन्माते । जन्म भाविताती ॥ ४३ ॥

श्रुतिः इष्टापूर्तं मन्यमाना वरिष्ठं ॥
नान्यच्छ्रेयो वेदयंति प्रमूढा ः ॥

इष्टापूर्ते म्हणिजे वापी कूपतडाग । मठ मंडप देउळें प्रतिमा भोग । याहुनीं श्रेष्ट नाहीं मानींतिचांग । ते मूर्ख जाणा ॥ ४४ ॥

**यान्ति देवव्रता देवान्पितॄन् यान्ति पितृव्रताः ॥**
**भूतानि यांति भूतेज्या यान्ति मद्याजिनोपि मां ॥ १०७ ॥**

म्हणोनि वेद याचकते पावतीं देवाते । पितृ भक्त पावती पितृ लोकांतें । भूत भजक भजतीं भुतातें । तया तेचि पावन ॥ ४५ ॥ माझा भक्त सर्व भावी भजे मातें तो पावे माझीया परमा नंदाते । हा आभिप्राय भगवत् गीते । नवमो ध्याई ॥४६॥

**अव्यक्तं व्यक्तिमापन्नं मन्यन्ते मामबुद्धयः ॥**
**परं भावमजानन्तो ममाव्ययमनुत्तमं ॥ १०८ ॥**

अव्यक्त तो आला व्यक्तीतें । एसेनि बुद्धीजे मानिती मातें । पर मज अजा अव्यया अनुत्तमा भावातें । नेणती म्हणोनि ॥ ४७ ॥

**श्रवणं कीर्तनं विष्णोः स्मरणं पादसेवनं ॥**
**अर्चनं वंदनं दास्यं सख्यमात्मनिवेदनं ॥ १०९ ॥**

हे नव विध भक्ती अव्यभीच्यारी । होउनी भजे परमेश्वरी । गुरु पूजा करी षोडशोपचारी । भाव पुर्वक ॥४८॥ श्रवण कितर्न नामस्मरण । पादप्रक्षाळण अचरण वंदन । दास्य सख्यत्व आत्मनिवेदन । ज्ञान पूर्वक नवविध

भक्ती ॥ ४९ ॥ जैसी देवाचेठाई भक्ती उत्कृष्ट । तैसीच गुरू भक्तीचेठाई बुद्धी श्रेष्ट । यदर्थी वेद श्रुती स्पष्ट । बोलिली असे ॥ ५० ॥

श्रुती ॥ यस्यदेवे पराभक्तिः ॥

ऐसा भक्त षरि चर्यात्मकु । मनें वाचाशरीर भजकु । तयादेव आनंदाचा प्रापकु । तात्काळ होये ॥ ५१ ॥ आणि गुरू तेही श्रेष्ठत्व भजावे । उपकारकांत भक्ती भावें । ऐसीं श्रुतीवचन जाणावें । श्रोता जणी ॥ ५२ ॥ असो हे भक्ती निर्गुण । करू संन्यासासी लक्षण । जे जगदी श्वरू आपण । निरोपिता झाला ॥ ५३ ॥

प्र० ३९ सन्यास लक्षण निरोपन ॥

ज्ञेयःस नित्यसंन्यासी यो न द्वेष्टि न कांक्षति ॥
निर्द्वंद्वो हि महाबाहो सुखं बन्धात्प्रमुच्यते॥ ११०॥

जाणावा तोचि अभ्यासुनित्य । नाहीं इच्छा द्वेष आणि द्वंद्वमुक्त । तो सकळा पंथासी विरहित । सुखेचि असे ॥ ५४ ॥ कामक्रोध आणि रागद्वेष । मदमत्सर हे साही दोष । तो बोलिजे आंतर संन्यास । मुमुक्षुंसी ॥५५॥ बाह्य इंद्रिय देह दमन । निरविषयो ब्रम्हचर्य वर्तन । नाहीं परीग्रहो एकस्थान । वसावया ॥ ५६ ॥ वैराग्य वन्ही वरून । जाळुनी तारुण्य वनतृण । मग इंद्रिय श्वापदें भेण । रिघती गिरिकंदरीं ॥ ५७ ॥ तेथ लोपले यामार्गा उजेडु । तेणें क्रमिजे भवडोंगरू (भवादळ) आवघडु । मग कैवल्य नगरी होय पवाडु । सुखस्वस्थि लागीं ॥ ५८ ॥

भिक्षाहारी निराहारी भिक्षा नैव परिग्रहः ॥
अवधूतो हि पूतश्च सुधान्नानि दिने दिने ॥१११॥

पती गृहाची नधरी आश । सजन समूहीं नकरी वास । ममता रहित होउनी उदास । समचित्त असे ॥ ५९ ॥ तोचि निरा हारी बोलिजे जाण । जो अयाचित करी भिक्षा भोजन । अवधुत पवित्र सुधापान । करी निरंतर-पैं ॥ ६० ॥

गीता विविक्तदेशसेवित्वमरतिर्जनसंसदि ऽ

जेथ असती हिंसक मांस हारी । मद्यपी कुवेशनी अना-चारी । तिये देशीं वासन करी । पवित्र पणें ॥ ६१ ॥ जें कौवटालीव्यभिचारिक । रजरूप आणि कामिक । तामस भूत प्रेत प्रेरिक । तें लोकनसेवी ॥ ६२ ॥ ऐसीया जनाचा केलिया संसर्गु । होयध्यान अनुष्ठानासी भंगु । आणि मळीणत्वाचा लागे डागु । दोषसंगे ॥ ६३ ॥

प्र० ४० भागवतेपरमेश्वरस्पर्श संबंधप्रतिष्ठा

सरिच्छैलवनोद्देशान् मुकुंदपदभूषितान् ॥
अनिशं वीक्षमाणानां मनो याति तदात्मतां ॥११२॥

जे भगवंत चरणांकितें । तियेचि बोलिजती सकळ तीर्थें । परसाधन चरित स्वार्थें वदंनकरी ॥ ६४ ॥ श्री दत्तात्रय प्रभूचि क्रीडास्थान । शयन आसन अथवा भोजन । ते नमस्करी रजरेणूजाण । भावपूर्वक ॥ ६५ ॥ ऐसा निष्ठाचारेसी सदा । मानसीं स्मरत असे गोविंदा ।

तो पावे नित्यानंद परंपदा । संशयो नाहीं ॥ ६६ ॥ आतां असो ही पवित्र आचार शीळता । म्यां बोलिली वाणी आकळितां । कांहीं स्मरण उपयोग बोलुं आतां । म्हणे पंडित दिवाकरू ॥ ६७ ॥

## ॥ स्मरण प्रकर्ण ४१ ॥

कांजें मागा सांगितली पाखंड रचना । बिटाळु झाला मना श्रवणा । तो प्रायश्चित्त दत्तस्मरणा । वांचूनि नाहीं ॥ ६८ ॥ तया श्री दत्त योगि राजा । वाक्पुष्पींकरीन पूजा । सांडोनि भाव मनींचा दुजा । स्तवीन मी आतां ॥ ६९ ॥ जीवोद्धरणाचिया हेतू । ऋषिकुळीं अवतरला अनंतु । तो परब्रह्म कैवल्य नाथु । मार्गादी गुरू ॥ ७० ॥ तेणें आपुलिया इच्छे बद्रिकाश्रमीं । अवतार स्विकरला निर्लेप भूमीं । त्यपतिता जीवा देखूनि स्वामी । उत्पन्नली कृपा ॥ ७१ ॥ तेथ अत्रिपिता अनुसया माता । ईश्वर सेवा पूर्ण योग्यता । मोक्षपद केवळ लाधलें त्वरिता । शेखीं कैवल्य सिद्धी ॥ ७२ ॥ तेथूनि श्री दत्तात्रय योगि राजें । उद्धरणाचोनिकाजे । सह्यांद्रि पर्वता केले बिजे । स्वइच्छावशें ॥ ७३ ॥ तेथूनी प्रभुलिळा रूपांतरीं । खेळु मांडिला जान्हवी तीरीं । ते प्रसिद्ध जाणिजे पांचाळेश्वरीं । अद्यापी असे ॥ ७४ ॥ ऐसा क्रिडतां जान्हवी तटीं । नागींद्र द्विजाला जाली भेटी । ज्ञान दिक्षा देऊन आचार्य पट्टीं । स्थापिला तो ॥ ७५ ॥ तो श्री दत्त देवा दिपरात्परू । कैवल्य वेद विद्या दीक्षा गुरू । झाला संसार सागरीं तारू । बुडतया जीवा ॥ ७६ ॥ तेणें अवधुत

वेषें बहुत । ज्ञान देऊनि पारांगत । ते मी सांगेन श्रुत भागवत । पुराणमार्गें ॥ ७७ ॥ नहुष महाज्ञाता नृपती । तयाचा पुत्रयदु चक्रवर्ती । तया उपदेशिली ज्ञान स्थिती । अवधुत राजे ॥ ७८ ॥ भागवते अवधूतोक्त

**श्लोक अमुष्यसंसारतरोरबाधामूलम्**

या संसाराचें मूळ ऊन्मळावया । आणि समर्थ उपाव नाहीं ज्ञाना वांचूनिया । ऐसे यदुप्रती निरोपूनिया । ज्ञान केलें ॥ ७९ ॥ विश्वेश्वराचें आराधन । तत्त्व प्रबोधाचें जाणूण । या वेगळे संसार तरूचें मूळ छेदन । आणिक नाहीं ॥ ८० ॥

**॥ श्लोक भागवत ॥**

**पृथिवी वायुराकाश आपोग्निश्चंद्रमा रविः ॥**
**कपोतोऽजगरः सिंधुः पतंगो मधुकृद्गजः ॥११३॥**

**मधुहा हरिणो मीनः पिंगला कुरुरोर्भकः ॥**
**कुमारी शरकृत्सर्प ऊर्णनाभिः सुपेशकृत् ॥११४॥**

**पूर्वेषां वचनं श्रुत्वाऽप्यवधूतः सपूर्वजः ॥**
**सर्वसंगविनिर्मुक्तः समाचित्तो बभूवह ॥ ११५ ॥**

तो तत्वज्ञान योग उत्तम । चोविस गुरूचा अनुक्रम । ऐकोनि उत्पन्नला विराम । यदुरायासी ॥ ८१ ॥ तो प्रकाशिलिया आत्मबोधु । सांडोनि सर्व विषय संबंधु । यदुराज तिलकु झाला साधु । अवधुत संगे ॥ ८२ ॥ मदालसा ब्रम्हज्ञानी पवित्र । सांगोनि श्री दत्तनाम चरित्र

उपदेशिलें सातही पुत्र । आत्मज्ञानी ॥ ८३ ॥ तेथें अधि
कार भेदे साहीजणी । ऐकोनि मदालसेची पवित्र वाणी ।
श्री दत्त नामें राहिले वनीं । जाले पारंगत ॥ ८४ ॥
तयातु आलर्क राज्य मदें मातला । प्रपंचीका विषय सुखासी
रतला । भुलोनि माया जाळीं गुंतला । नकरीच त्याग
॥ ८५ ॥ पाठीं राज्य सुखासी झाला भंगु । आनित्यता
स्त्री पुत्र वियोगु । मग आठवला ज्ञान योगु । मदालसा
उक्ती ॥ ८६ ॥ आरळक तिही तापीं तापला गीवसीत
संह्याद्रीसीं पातला । तो श्री दत्तात्रय देवे निवविला ।
दर्शन मात्रे ॥ ८७ ॥ झालिया श्रीदत्तमूर्तीचा संबंधु ।
पातला परमानंद बोधु । श्रीदत्ते अनिमीत बंधु । केला
अविद्या मुक्त ॥ ८८ ॥ तो श्रीदत्त परब्रह्म पुतळा ।
ब्रह्मादिका न कळे कवणी वेळा । तो आरळका भेटला
अवलिळा कृपा वशे ॥ ८९ ॥ जो अत्रि अनुसयाचा
नंदनु । परामृत अनंदघनु । बोलिला वृष्टी अंबरीं जीवनु ।
अर्त चातकासी ॥ ७९० ॥
जो चहुं युगीं राज्यकरी । चारु वपू विचित्र वेषधारी ।
कृपापात्र जीव नाना परी । ऊर्ध्व केले ॥ ९१ ॥ जय
जय श्रीदत्तामृतवाणी । आरळक तितापहानी । जय अन-
मीत बंधु आर्तदानी । दीनवत्सला ॥ ७९२ ॥ जय
जय श्रीप्रभू जगद्वंद्या । जय प्रेरका ब्रम्ह विद्या । जय भव
रोग हारका आदि वैद्या । उपकार काजी ॥ ९३ ॥ जय
जय जगदीश नायका । जय सर्वत्मया सर्व व्यापका । जय
स्वरूप प्रकाशका । शक्ति मंता ॥ ९४ ॥ जय अव्यक्ता
अव्यय निगुर्णा । जय अमृत जीवोद्धरणा । जय अप्राप्य

अन्य साधना । स्वानंद रूपा ॥ ९५ ॥ जय अनंता-नंत स्फूर्ति । जय अच्युता अपार कीर्ति । जय अमुर्ती मंगल मुर्ति । हेमगौरा ॥ ९६ ॥ अनुसया पतिव्रता शिरोमणी । जयासामर्थ्यें देव भुलविले तिन्ही । तेत्वां लीळा वेषेंमानिली जननी । पुर्व कनवा ॥ ९७ ॥ तुझा पर ब्रम्ह अवतार येसृष्टी । त्वां रेणूका स्थापिली मूळ पीठीं । आणि शंकराचार्या देऊनि भेटी । मुद्रा सरती केली ॥ ९८ ॥ तुझीया भक्ता कैवल्य प्राप्ती । अवर अधिकाऱ्या अनेक मुक्ती । तूं आनंद पूर्ण अनंत शक्ती । अभय दानी ॥ ९९ ॥ तूं मोक्ष मार्गासी आदि मूळ प्रथम । तू भवीं शिणले या जीवा विश्राम । तू विमळ आत्मया परम धाम । प्राप्ती कारिता ॥ ८०० ॥ तूं निराधारासी आदि आधारू । तूं भव भयासी नाभिकारू । तूं संसार तप्ता आनंद जळधरू । आनंद मूर्ती ॥ ८०१ ॥ तू भक्तजन काज कैवारी । तू शरणांगता वज्र पंजरू भवारी । तू बुडालेया जीवा भव सागरीं । तरण उपाव ॥ ८०२ ॥ तुझिये गुण वर्णितां कीर्ति । नेति नेति ह्मणोनि परत लेया श्रुती । तेथें मज करावया स्तुती । पवाड कवणु ॥ ८०३ ॥ जयातें सुर वर ब्रम्हादिक । आगमनिगमाहि तारकिक । सहस्र वदन पन्नग । वरुण नेणती ॥ ८०४ ॥ परमी तुझ्या कृपा वरदानें । श्री-दत्त परामृत वचनें । उर्ध मती विस्तारु जाला तेणें । स्तवन करावया ॥ ५ ॥ हे श्रीदत्त स्वरूप स्तवन । जे ऐका देऊन अवधान । तया जन्म मरण नाहीं अज्ञान । आर्त जनासी ॥ ६ ॥ हा ज्ञान योग पुरातन ऐका ।

पूर्वी ब्रम्हयासी निरोपिला निका । तया नंतरें उद्धवार्जुना दिकां । बोलिला देव ॥ ७ ॥ तोचि बोलिजे गुणा तीत ज्ञान । जें मोक्ष प्रापक परामृत जीवन । तें लाधलया कहीं नाहीं पतन । एक गर्भ वासु ॥ ८ ॥ जो देव आप्राप्य साधना आणिका । तो ताप हरणीं भेटला आरळका । तयां नंतरें नागार्जुना दिका । जोडला देव ॥ ९ ॥ जो माया-तीत निराकारू । करावया परोप कारू । मनुष्य वेष साकारू । तो झाला आसे ॥ १० ॥ तया नमन करूं सवे भावी । तेणें दिवाळी केली निचवनी । जोया पर मार्गीचा गोसावी । आनंद कंदु ॥ ११ ॥ करावया जीवोद्धरण । नागार्जुना केलें अधिकरण । तया साष्टांगी करूं नमन । परात् पुरुषा ॥ ८१२ ॥ आतां उप-कारका सकळा । मार्ग वेधीया आदकरूनि गुरु कुळा । तापसां ज्ञानीया अनुष्ठान शीळा । प्रणिपातमाझा ॥१३॥ हें बोलिलें वाक्य कर्दम टीका । सिद्धांत सौरभ्याची काळिका । नातरी प्रमयररत्नमाळिका । वाग् विलासिया ॥ १४ ॥ हा ग्रंथ सकळ वादिया त्रासु । कुतर्क ठाव गजां कुशु । गुणग्राहियां निर्मळ उपदेशु । मती प्रबंधुहा ॥१५॥ सकळ मत रत्नाचा व्यापारू । करिती तेही सेवावा हा रत्नाकरू । येणें अज्ञान दुर्भाग्या निवारु होईल जाणा ॥ १६ ॥ अथवा मतीहोवावया सर्वार्थीं । हा गुरू सेवावा सुष्टपंथीं । तेणें सिद्धी होईल सर्वार्थीं । सत्यार्थ जाणा ॥ १७ ॥ नागींद्र शिष्य मुरार मलजवळीका । दैवयोगे जोडिला निका । तेणें वरदें मती प्रबंध ग्रंथिका । म्हणे मुनि दिवाकरूं ॥ १८ ॥ वेदश्रुति पंचक ॥ पाडव गीता

एक ॥ राम, नार्द गीता एक ॥ एक शिवपुराणीचा ॥१७ गीता सोळा श्लोक ॥ भागवत् जाण अष्टक ॥ स्मृती श्रुति एक ॥ सेचाळीस. गणना, ॥ शके पंधरार्शे एकोनीस अवधारी॥ पिंगल संवत्सरे पूर्णावली नगरी ॥ भाद्रपद शुद्ध द्वादशी गुरुवारी ॥ ग्रंथ संपूर्ण ॥

( दिवाकर कपाटिये मति प्रबंधु केला । तो गोपाळदासे शोधिला । आगळाहि वाढविला । हा ग्रंथ ॥ ८१७ ॥ ) एवं प्रबंध सपूर्ण मिति । इति श्री दिवाकर मुनी विरंचित श्रुती । इतरमत खंडर्णे स्वमत प्रतिष्ठापिती ॥ मत प्रबंध रत्नाकर ॥ ८१८ ॥

---

**श्रीदत्तप्रसादिक मुनिराज पंण्डित दिवाकर विरचित इति मतिप्रबंध शके १५१९ पिङ्गलनाम संवत्सरे भाद्रपदे शुद्ध द्वादशी वारः गुरू एवं संपूर्णः**

**१६१७ विजय संवत्सरे श्रावण शुद्ध पौर्णिमा वार बृहस्पती गोपाळदास शोधन.**

---

सर्वेशाचे वंदोनि चरण । सांगेन शास्त्र दर्शन वर्णन । जें बोलावया प्रमाण । उपयोगीक ॥ १ ॥ बव्हृच, आणि निगद, । रथांतरांगीरा ससिद्ध । हे चाऱ्ही निगम प्रसिद्ध । परमार्गाच्यार्थें ॥ २ ॥ ऋग्वेद आणि यजुर्वेद । सामवेद अथर्वण वेद । हे चारिवेद प्रसिद्ध । अपर विद्या ॥ ३ ॥ शिक्षा कल्प व्याकरण । छंद ज्योतिष मनुसंहिता ( निघंट ) निरूक्त जाण । इयें षडांगें प्रमाण । वेदार्ची प्रसिद्ध॰ ॥ ४ ॥ स्वच्छंद ललित मन्थान भैरव । आदिभेद कादिभेद सर्व । हे चारी आगम भैरव । कृत जाणावे ॥ ५ ॥ अक्षायाळ मुंचा पांचवा । तो परमेश्वरोक्त जाणावा । निर्गुण साधन सर्वा । प्रकाशकु ॥ ६ ॥ वेदांत सांख्य न्याये शास्त्र । मिमांसा आणि योगशास्त्र । कामशास्त्र सहित समग्र । इयें साही शास्त्रें॰ ॥ ७ ॥ वेदांत शास्त्री दंडधारी । सांख्यशास्त्री जटाधारी । मुंडित न्याय शास्त्रि । प्रसिद्ध जाणा ॥ ८ ॥ मिमांसा ते धर्मशास्त्र । त्याचें दर्शन जैन शास्त्र । जंगम योगशास्त्र । कामशास्त्र योगी ॥ ९ ॥ साशास्त्रे साहा दर्शनें । इये जाणावे प्रमाणें । या वेगळी आणिक अप्रमाण । मुर्ख प्रतिष्टिती ॥ १० ॥ वेदांत आणि सांख्य । न्याये आणि वैशेषिक । भाट्य प्रभाकर हें साऐक । दर्शनाचें ॥ ११ ॥ मुख्योप निषद परीयसा । सांख्यन्याय आणि मिमांसा । योगशास्त्र नास्तिक ऐसा । षट्शास्त्र भेद॰ ॥ १२ ॥ मार्कंड आणि मत्स्य पुराण । भविष्य भार्गव पुराण । ब्रम्हांड ब्रम्हपुराण । ब्रम्हकैवर्तक ॥ १३ ॥ विष्णूपुराण वायुपुराण । वामन आणि

वराह पुराण । नारद आणि लिंग पुराण । पद्म पुराण पै ॥ १४ ॥ कूर्म आग्निपुराण । स्कंद आणि गरुड पुराण । हे अठरा पुराण जाण । जग प्रसिद्ध* १५ आदित्य नारद पुराण । शक्री काळीं निरंजन । अनिळ धर्म पुराण । इये उप पुराणें ॥ १६ ॥ ** ॥ अदिपर्व सभापर्व । अरण्य पर्व । विराटपर्व । उद्योगपर्व भीष्मपर्व । द्रोण कर्ण पैं ॥ १७ ॥ सौप्तिक स्त्रिपर्व । शांति अनुशासन पर्व । अश्वमेधिक अपूर्व । व्यासाश्रम ॥ १८ ॥ मुसळ पर्व प्रस्थानीक । स्वगारोहणदेख । इये अठरा पर्व आईक । भारत पैं ॥ १९* ॥ संगीत वेद विद्या प्रमाण । रत्न परीक्षा गणित जाण । ज्योतिष वैदिक सपूर्ण । धनु विद्या ॥ २० ॥ ओढियान ( ओडवनी ) शाळी होत्र । सूपविद्या रतिशास्त्र । शाल्य तपद्दम विज्ञान मात्र । या चौदा विद्या ॥ २१ ॥ * नाटे श्वरीलक्षणपंथी । आणि पार्वती नाथी । अभंग नाथी । कापिल विभूतिये ॥ २२ ॥ भरथरी वैराग्य केवळ । पंख आई पंथीरा उळ । पाव पंथी षांगुळ । दासमार्गी ॥ २३ ॥ हे नाटे श्वरादिक । बारा पंथी योगी देख । आणिक संत नाथादि ऐक । आठरा पंथी ॥ २४ ॥ संत नाथ पंथी । सांतीनाथी गुललय धर्म नाथी । हामसेखीन का उखाळ पंथी । नाथ लक्षण ॥२५॥ रामनाथी वंकनाथी । योगी वैरागी गमपंथी । चोळीक गंगनाथी गोपाळ पंथी । हे मार्गी धनं जय ॥ २६ ॥ गज कथडीनागार्जुन पंथी । हे अठरा पंथ बोलीजती । ऐसे तीस पंथी भेद असती योगियांचे ॥ २७ ॥* तीर्थ आश्रम जन आरण्य । पुरी गिरी पर्वत सागर जाण ।

सरस्वती भारती मिळोन। हे दशनामजाण सन्यासियाचें ॥ २८ ॥ स्वरूपानंद चैतन्यप्रकाश। हे चाऱ्ही ब्रह्मचारी परीयेस। तयापासून झाले शैव। चतुर्विध वैष्णव ॥२९॥ रामानंदी तत्ववादी। वल्लभाचार्ये, राधा वल्लभीप्रसिद्धी। हे चाऱ्ही सांप्रदाय भेदी। विस्तारिले ॥ ३० ॥ तत्ववादी या पासूनि नंदन वैडुर्यचार्य मदन मोहन। भट्टाचार्य राधार-मण। रामानुज विठ्ठलेशा ॥ ३१ ॥ निंबादित्य माध वाचार्य। जयदेव पंथी हा अन्वय। ऐसे चौदा सांप्रदाय। वैष्णवांचे ॥ ३२ ॥ दर्वे मलंग प्यारे प्रकार। भडंग मुंडे कादी कलंदर। अबदाल मुल्ला जदे फकीर। महदी सेख सय्यद ॥ ३३ ॥ ऐसे चौदा पंथ सोफी जाणा। याचे भेद असती नाना। ते सांगता या जना। अपूर्व वाटेल ॥ ३४ ॥ मुख्य दोन भेद जैन। दिंगांबर श्वेतांबर जाण। दोन्ही भेद दिगांबर प्रमाण। चवऱ्यांशी स्वेत अंबर ॥ ३५ ॥ मूळसंगी काष्ट संगी देखा। दिगांबर दोपरीचे ऐका। तर्पे खडतर लोकादिका। श्वेतार असती ॥ ३६ ॥ शैव आणि पशुपत। व्यालवदन महावृत। ऐसे चतुर्विध समस्त। जंगम जाणा ॥३७ ॥ योगाचार वैमासिक। माध्यमिक आणि सौत्रादिक। ऐसे चतुर्विध काळिक। बौद्ध जाणा ॥ ३८ ॥

---

उपाध्य—दिवाकर—कवीश्वर। अमृते पारमांड्य—सा-ळंकर। दामोधर मदालसा कुमार। जयदेव ॥ ३९ ॥ चक्रपाणी हरिदेव। महेश्वर आम्नाय सर्व। हे तेरा भेद अपूर्व। माहात्मे यांचे ॥ ४० ॥ या वेगळीनाना

दर्शनें । असती बहु भेद भिन्न । तिये सांगतां ग्रंथ रचना । विस्तार होईल ॥ ४१ ॥ सा दर्शनें एकमती । शाहाण्णव पाखांडे असती । ते सांगेन बरवे या रिती । वेगळाची ॥ ४२ ॥ जैन मिमांसा सांख्य दर्शन । बौध्य शैव नास्तीक प्रमाण । ऐसी पाखांडें मिळोन । सोळा सोळा ॥ ४३ ॥ काष्ट संगी मूळ-संगी दिगांबर । जापली पक्रंदशी स्वेतांबर । चंड गच्छ खडतर । मल्लाधार अमलिये ॥ ४४ ॥ आगमी पुनमी भावसार । गोकात पापुजीकार । ये सोळा पाखांडें समग्र । जैन दर्शनी ॥ + ४५ ॥ भाटे सेवका पाळिक । पशुपती चहुं धटाळिक । आकड केदार पुत्र अयाचित् एक । भक्षणेज्ञ पटु ॥ ४६ ॥ धाडीवाह आचारी पतीयान । मढपती काळामुख चारण । हे सोळाभेद प्रमाण । मिमांस दर्शनी ॥ ४७ ॥ * ॥ भागवतेत्रिदंडी गुगुलिये । स्नातक चांद्रायणी गुणीये । एकवी म नठ गणागर्ये । कुडारा तगल धूड ॥ ४८ ॥ डदा दांभिक सांख्य कळेश्वरी । स्वाभियाची अवतारी । ईये पाखांडे अवधारी सांख्य दर्शनीं ॥ * ॥ ४९ ॥ बौद्धय भुमी वाचंड । कमळी सात हंड दगंड । विटगोपाल पेदहाड । डांगर भांड मूळधारी ॥ ५० ॥ ककढवास बीर्दी गुणधुळीये । गारोडी मोहरी कपावय । हे पाखांड भेद आन्य । बौध्य दर्शनी ॥ ५१ ॥ ब्राह्मण अग्निहोत्री दीक्षीत । याज्ञिक उपाध्य पंडित । आचार्य व्यास जोतिर्मत । कथाकर चातुर्मासी ॥ ५२ ॥ काहाळी चातुव डिंभहवे । भेद वैष्णव आघवे । ऐसे पाखांडी भेद जाणावे । शैव दर्शनी

॥ ५३ ॥ योगी हरीमेखळी नागमती । इंद्रजाळी तोत-ळमती । धन्वंतरिये कुळकाळामती भाडमती । भिक्षुक ॥ ५४ ॥ मंत्रवादी रसाथ निकबक । शस्त्रकर्मी धातु-वादी चाल्र दासीक । मारळी वेश धारी पाखांडिक । नास्तिक दर्शनी ॥ ५५ ॥ ऐसी साहादर्शनें शाहाणव पाखांडे सांगितले जगप्रसिद्ध रूढे । या वेगळी उदंडे । वर्तत असती ॥ ५६ ॥ योगी दर्शणांत । सत्यादी देवता भक्त । गोंधळिय भुतिये असत । तथा दिवठिये ॥ ५७ ॥ मूरळीय वाघिये डौरकार । भराडे कव्हाळे बहुरूपी दश अवतार । वसविया वासुदेव सुर्खेस्वर । दिंडी टाळघेर पाहाटगार्णे ॥ ८५ ॥ कोल्हाटीं वरिभद्र जळमंडपी खांबसुत्र । छायामंडपी बाजीगर । ऐसे पोटा-र्थीय दातार । गोमेबोर्धुतरा ? ॥ ५९ ॥ आधी ये देवता भक्त । आले प्रभु शिवाश्रित । यलंकी निसंत । बाहिरव काठी कार ॥ ६० ॥ आणि हेमाडीवंत । धर्म राई माठेचा तो भक्त । कान्हो बापुजी कहाजी दैवत । सटवई गोपाळा ॥ ६१ ॥ खुटदेव भक्त बरवे घुमारे । काचदीं नाना वेषांतर । ऐसे पाहा प्रकार । हरी दासादि वर्तेती ॥ ६२ ॥ बागागुरू शाखा फार । ब्रह्मज्ञानी वेषें धर । ऐसीं पाखांडे नानाप्रकार । सिप्णोदर परायण ॥ ६३ ॥ जना झाकोनि भुलविती । आपलाली महीमा वर्णिती । खंडिती तोंडबळें नीति । निंदिती यथार्थातें ॥ ६४ ॥ जे परमेश निर्मित । निगम श्रुति भासत । सप्तव्यसन दोष विवर्जित । तें यथार्थ मत पैं ॥ ६५ ॥ ते अति चतुर असती । सकळ मतें विमर्शिती । तेची यथार्थ

मानिती । शास्त्र प्रमाणिक ॥ ६६ ॥ हें सादर्शन विवरण । केलें गुरुमुखें यथाश्रवण । तें ऐकत श्रोते सुजाण । म्हणे गोपाळ दासु ॥ ६७ ॥ शट् दर्शण विवर्णन समाप्त ॥ भीष्माचार्यगुरू उपकृत । तयाचेनि प्रसादे मज ज्ञात्रत्व । म्हणें गोपाळदासु ॥ ६८ ॥

श्रीहरीदिवाकर बावा महानुभाव जयकृष्णी कवीश्वर
महात्म मुसाफर कर्सालकर.
जेहेलमचकवाल पंजाब.

इतिश्रीपरधर्में महामोक्षसाधनें श्रीनागदेवाचार्योप देशे शट् दर्शविवर्णन संपूर्ण.



## ॥ तत्वसारोपनिषत् ॥

तत्पदं त्वंपदमस्यादिपदंचेत्यस्मिन् कः पदार्थः कस्य उच्यते । तत्तन्मध्ये चार्द्ध मकारं सब्रह्म उच्यते । सापूर्ण पदार्थेन परब्रह्मेति । त्वंपदार्थेनाहं शोचेति । अस्यादि पदार्थेन चिन्मयं महदाद्या शक्त्याचेति । अस्मिन्स्व मेव पदार्थेन भिन्नाभिन्नं स उच्यते । तन्मध्ये तदक्षरं घनानंद पदं परब्रम्हपदार्थ लक्षणो वाच्योर्थः ॥ १ ॥ ॥ श्रुति ॥ शाश्वतपदं निजानंद परमानंदं पूर्णानंदं । नित्या नंदैकमेव केवलं विभुं । कैवल्यमव्यक्तममूर्तमनन्तमव्ययं । निर्गुणं निराकारं नित्यमुक्तं निर्विकारमुच्यते । निरामयं निरंजनं निरापेक्षं निरालंबं निर्विकल्पं निःशून्यं बुद्धानंदं तु सर्वेश्वरं । सर्वज्ञसर्वात्मा परमेश्वरं सर्वकर्तारमीश्वरं सर्वसाक्षिणं निरुपमं परमात्मानं पुरुषोत्तमं जगदात्मानं जगज्जीवनं जगद्वंद्यं जगदी-श्वरमलक्षमतीतं परमेश्वरं । एतानि सर्वाणि नामान्येकं परं-ब्रम्हचेति ॥ २ ॥ एको देवः सर्वभूतेषु गूढः सर्वव्यापी सर्वभूतान्तरात्मा । सर्वाध्यक्षः सर्वभूताधिवासः साक्षीचेता केवलो निर्गुणश्च ॥ ३ ॥ ॥ आचार ॥समंत्रग्रह नु प्रव-क्ष्यामि । सत्यागं कुर्वन् लभत् । गोत्रेवा पुरेवा देशेवा स्वधर्म्यादि । अन्यधर्मो विद्धिकर्मान्य धर्म्यो । स त्यक्त्वा करोति । प्रकृति धर्मानिंद्रिय धर्मान्मनो धर्मान् जीवधर्मा-न्परिग्रहान् सर्वधर्मान् त्यजेत् ॥ ४ ॥ चातुर्वर्ण्यं लभेत् त्यागं । अन्नाहारेण वर्ण भीक्ष्याषन् भवद्भिः । जनसंसर्ग वर्जितं विहरणं विजनं कुर्यात् । देवता स्थितभुवनानि वृक्षानि । ग्रामानि यात्रानि विभर्जित् स्थीयते । भूतोपद्रोह हिंसातीत वर्तमानः । अभक्ष्यं मद्यपानादि न जहुयोत्

अनियतवासाः । शीतोष्णं प्रहारेणं निर्दोष कुटिकायां । निर्झरेण वृक्षा स्थीयते निर्जनेन वासो कुर्यात् । शौचाशौचमविकल्पानि न बध्नाति । तनु प्रेतवत् । यतमाचरणम् । भवतां पुरश्चरणे किल्बिषं सर्व दोषान् । महंद्वोषो भुञ्जत अघपातकम् ।। ५ ।।

निराहारं निर्विकल्पं निरालंबं निरापेक्षं । निर्द्वंद्वो निराभी मानु वर्तते सः इति मुनिरुच्यते ।। ६ ।। * ।।

श्लोक ।। सद्घनं चिद्घनं वेद्यं सदानंद घनप्रभुः । एतद्यो वेद विहितं गुहायां तत्वमीदृशं ।। ७ ।। भागवते १ स्कं. धर्मस्य दक्ष दुहितर्ये जनिष्ट मूर्त्यां नारायणो नरऋषिप्रवरः प्रशांतः । नैष्कर्म्य लक्षण मुवाच चचार कर्म योऽद्यापि चास्ते ऋषिवर्यनिषेवितांघ्रिः ।। ८ ।। दाक्षायणी वरसती किल धर्म कांता मुर्ति स्वयं तदुपरे गुरुपंच कृष्ण । नारायणो नर ऋषिप्रवरः प्रशान्तां यत्ते वतार रुदिता निगमे विधात्रा ।। ९ ।। हंसस्वरूपं वदद्च्युत आत्मयोगं दत्तः कुमार ऋषभो भगवान्पितानः । विष्णुःशिवाय जगतां कलौवाव तीर्णस्तेनादृतां मधुभीधा श्रुतयो हयास्य * ।। १० ।। श्रुति ।। तत्वसारोपनिषदि श्रुतिः । नो ब्रम्हानोविष्णु हरसुरपर्ता रमरा तत्ववस्तुमेकं सकल पदलयं पातु वः पंच कृष्णं सोपि मोक्षं ।। ११ ।।

कर भाजन उवाच ।। इंद्रद्विडा कुले लोके मृडयंति युगे युगें ।। १/२ ।। कृतं त्रेता द्वापरंच कालि रित्येष केशव ।। नानावर्ण मिदाकारो नानेव विधिनेज्यते ।। १२ ।। धर्ममुर्ति कुमाराश्च पंच कृष्णा इति स्मृता : । नारायणः

सर्वेहंसः पक्षिरूपः कृते भवेत् ॥ १३ ॥ त्रेतायां ऋषि वेषेण हरि र्नाम्ना ऽ भवत् सच । द्वापरे कृष्ण संज्ञस्तु कलौ चक्रधरः सच ॥ १४ ॥ नारद उवाच. हरिवंशी ईंद्रा प्रती सांगीतले ॥ श्वेतः कृत युगे देवो रक्त स्त्रेता युगे तथा ॥ द्वापरेच तथा कृष्णः पीतः कलि युगे विभुः ॥१५॥ एका दशस्क० कर भाजन उ० श्लो० हंसः सुपर्णो वैकुंठो घर्मो योगे श्वरोऽमलात् । ईश्वरः पुरुषोव्यक्तः परमात्मेति गीयते ॥ १६ ॥ इत्थं स भगवान् कृष्णः प्रार्थितो रविणा स्वयं । निजगाद परंज्ञानं सूर्याय हंसरूपधृक् । ईतिमाहात्मोपनिषिद् ॥ १७ ॥ हरिवंश वैशंपायन उ० श्लो० सनत्कुमारस्य महानुभावो मनुर्महात्मा भगवान् प्रजाकरः । पुराण देवोथ पुराणचक्र प्रदीप्त वैश्वानर तुल्य तेजाः ॥ १८ ॥ कृतयुगाचीं मनुष्यें ॥ + मनुष्यास्तु तदा शान्ता निर्वैराः सुहृदः समाः ॥ यजंति तपसा देवं शमेन च दमेन न च ॥ १९ ॥

कृतेजः शुक्लवर्णेन सशांते भ्योविदंददौ ॥ तथाहं हंसरूपेण ब्रह्मादिभ्यो जगद्गुरु. ॥ २० ॥ त्रेतायांरक्त वर्णेन वेद विद्व्योमखादिपः । तथावधूत वेषेण यद्वादिभ्यो विदंददौ ॥ २१ ॥ द्वापरे कृष्ण रूपेण पार्थादिभ्यो खिलेश्वरः । कलौ विचित्र वेषेण दत्तं श्रीचक्र पाणिना ॥ २२ ॥ आचार्य नागदेवाय पीतवर्णेन देवराट् । कृपालुर्मुनिवेषोज-श्चकारा नंत रूपवान् ॥ २३ ॥ एवं युगे युगे मार्गो ज्ञान भक्ती विरागवान् । राजते सौसदाचारिसर्वभूतसुह्रत्तमः ॥ २४ ॥ महानुभावः कथितो महात्मा जिज्ञासुरार्तोथच मुंडिमाना । अर्थार्थिकश्च स्थितआत्मकामो ज्ञानी महाभाग-

वतो मुनींद्रः ॥ २५ ॥ इति निघंटे ॥ * ॥ निवृत्तो भगवद्वेषो महात्मापरिकीर्तितः । भगवान् विश्वरूपोयो महात्मेत्याभिधीयते ॥ २६ ॥ महात्मा कृष्णभक्तश्च महात्मा कृष्णदर्शनः । महात्मा कृष्ण आख्यातो वेदशास्त्र-पुराणतः ॥ २७ ॥ ॥ दशोपनिषद् ॥ श्रुति ॥ कल्पा-दौ कृतयुगे बदर्यां । नारायणमृषि प्रवरोनर प्रशांता । पंच-कृष्ण धर्मस्य दक्षदुहितरिमूर्तावजनीषंतते । तानि दिव्य रूपाणि यावत्सृष्टी कालं नोजह्युः ॥ तत्र नारायण ऋषेः प्रव-रोनर प्रशांतः ॥*॥ * ॥ दशो० यदाधर्मान्मूर्त्यां नारायण चक्रपाणि रजनिष्ट । तदामूर्ति ज्ञान धर्मोकृतौ नाम्नी आप्नु-तांस्म ॥२८॥ अथ यदामूर्त्यां मृषिदत्तो त्रेतां रक्तजांबूनदमूर्ति रत्रिभार्याजनिष्ट ज्ञानधर्मौ स्वाभ्यां नामभ्यां आस्तांस्म ॥ २९ ॥ यदा धर्मान्मूर्त्यां प्रवरो भगवान् कृष्णोऽजनिष्ट । तदामूर्ती ज्ञान धर्मौ दैवी द्वापर नाम्नी अप्नुतांस्म ॥३०॥ ॥ * ॥ दशोप निषद् श्रुति ॥ यदा धर्मान्मूर्त्यां नरो गोविंद श्री प्रभुरजनिष्ट । तदामूर्तिधर्मौ कलौ नाम्नी आप्नु-तांस्म ॥३१॥ यदा धर्मामूर्त्यां प्रशांत महापुरुष चक्रधरोऽ-जनिष्ट । तदा मूर्तिज्ञानधर्मौ क्षमा कलिनाम्ना फलस्तपूरं आप्नुतांस्म ॥ ३२ ॥ * ॥ ततोक्षराद्वै परतः परश्च दिव्यो ह्यमूर्तः पुरुषोत्तमं परात्परं ब्रम्हपंच विधं समेति ॥ ३३ ॥ तस्मिन्निषं मनुयुगे शुक्ल माहुः पिङ्गलं हरितं लोहितंच । एषां महात्म पंथाब्रम्हणाहानुवित । स्तेनेति ब्रम्हवित्तेजसः पुण्यकृचेति ॥ ३४ ॥ ॥ श्लोक ॥ शुक्लो नारायणो देवो लोहितो ऋषिरुच्यते । प्रवरोनीलवर्णश्च प्रशांतः पिंगलः स्मृतः

* नरहरी तो दीव्यो ब्रम्हपंचविधः तत्पंच कृष्णम् ॥ ३५ ॥ * ॥ तं तदा मनुजा देवं सर्व देवमयं हरिम् । यजंति विद्ययात्रय्या धर्मिष्ठा ब्रह्मवादिन : ॥ ३६ ॥ ॥ श्लोक ॥ दिव्यस्वरूपंच विहायदेवं धृत्वा नृणावपु विरस्मिस मृत्य लोके ॥ नेक्षंति देव सकलै नरणाग किंतु संप्रेक्षते द्विजकुले भूफ लस्थ पैरैः ॥ ३७ ॥ भविष्योत्तरे । नागांबो महदंब काचांगीरः अबेंद्र नागेंद्रयो नीलाख्यमुनि मंडलीकमुनयो प्रज्ञानिधी वाकूसुरो । श्री चक्रधर । प्रशान्त कलितो तत् शिष्यैरेतैर्मुनी चाग्रेवाग्मिभूतं मुनीं महतः शिष्योपशिष्यास्तिते ॥ ३८ ॥ उपाध्यकवींद्रामृतपारमंडलो यक्षदेवो हरिदेव नामा । दामोदरो मादल सत्कुमारो । दिवाकरस्सालकरादियोगी । प्रोक्ताः स्ततो जयदेवच चक्रपाणिः आम्नायकारात्रिदशा प्रवर्याः ॥ ३९ ॥ उपाध्य लक्ष्मींद्र कवींद्र भास्करो दामोदराख्य मुनि केशव सत्सुरिंद्रः । रामद्वयो हरमुरारि गुरुः शिवाख्यो आमनयकारात्रिदशा प्रवर्या ॥ ४० ॥ ऋषभअवताराचे ज्ञानिये ॥ कविर्हरिंतरिक्षः प्रबुद्धः पिप्पलायनः । आविर्होत्रोथ द्रुमिलः चमसः करभाजनः ॥ ४१ ॥ श्रुति ॥ यस्मिन्सर्वमिदं प्रोतं सत्वं स्थावरजंगमं तस्मिन्नेव भवंतीमे बुद्बुदाः सागरे यथा ॥ * ॥ इदं सर्वं खल्विदं ब्रम्ह । एकमेवाद्वितीयं नास्ति ॥ ४२ ॥

॥ द्रुमिलउवाच ॥ योवा अनंतस्य गुणाननंताननुक्रमि ष्येत्सतुबालबुद्धिः । रजांसि भूमेर्गणयेत्कथंचित्कालेन नैवाखिलसत्वधाम्नः ॥४३॥ वृष्णीकुळीं बळीरामे अवतरून प्रलंबादी वधिले ॥ भागवते ॥ भूमेर्भरावतरणाय यदुष्वजन्माजातः करि-

ष्यति सुरैरपि दुष्कराणि वादैर्विमोहयति यज्ञकृतो तदर्हान् । क्षुद्रान् कलौ क्षितिभुजो निहनिष्यदंते ॥४४॥ * ब्रम्हपुराण व्यासोक्त. षट्पदी । मत्स्यः कूर्मो वराहश्च नृसिंहो वामनस्तथा । रामो रामश्च रामश्च बुद्धः कल्कीच ते दश ॥ विष्णोर्दशावतारेभ्य स्तद्भिन्नं पुरुषोत्तमं । परमं ब्रम्हचाव्यक्तं कृष्णस्तु भगवान् स्वयं ॥ ४५ ॥ वेदानुद्धरते जगान्निवहते भूगोलमुद्बिभ्रते । दैत्यंदारयते बलं छलयते क्षत्रक्षयं कुर्वते । पौलस्त्यंजयते हलंकलयते कारुण्यमातन्वते । म्लेच्छान् मूर्च्छयते दशादशकृते कृष्णायतुभ्यंनमः ॥ ४६ ॥

हे नाम उच्चारून ईश्वराची पूजा करितात.

नरोजयन्तः प्रभुर्वृष्णिगर्भो । वृषाकपिश्चाथ उरुक्रमश्च उक्तः समुद्रैरुरुगाय ईड्यैः । सचक्रतुर्योगिभिरीज्यरूपैः । ४७ ।

विष्णुर्यज्ञः पृश्निगर्भो सर्वदेव उरुक्रमः । वृषाकपिर्जयन्तश्च उरुगाय इतीर्यते ॥ ४८ ॥ तं तदा पुरुषं मर्त्या महाराजोपलक्षणं । यजन्ति वेदतंत्राभ्यां परं जिज्ञासवोनृपाः ॥ ४९ ॥ कृष्णाय वासुदेवाय पुरुषाय महात्मने । विश्वेश्वरायविश्वाय सर्वभूतात्मने नमः ॥ ५० ॥

ब्रम्हदेवानें सर्व देवांसह श्रीकृष्णाची स्तूति केली.

॥ श्री शुकउवाच ॥ इत्याभिष्टूय विबुधैः सेशः शतधृर्हरिं । अभ्यभाषत गोविन्दं प्रणम्यांम्बरमास्थितः ॥ ५१ ॥ श्रीकृष्ण संकर्षण वासुदेव । प्रद्युम्न गोपाल उतानिरुद्ध । आख्याभिरीज्यं ऋषभं वदंति । तं सप्तभि-

योगिवरा मुनींद्राः ॥ ५२ ॥ * ॥ * ॥ सिद्धिप्रदः पूरुष एव मुक्तः स्त्रीभिर्बुधैश्चक्रधराभिधानैः । एषां चतुर्णां भगवत्तमाना मेतानि नामान्यमृतोपमानि ॥ ५३ ॥ ॥ भागवत एका० ॥ ध्येयं सदा परिभवघ्नमभीष्टदोहं । तीर्थास्पदं शिवाविरिंचिनुतं शरण्यं । भृत्यार्तिहं प्रणतपाल भवाब्धिपोतं वंदे महापुरुष ते चरणारविंदं ॥ ५४ ॥ त्यक्त्वा सुदुस्त्यज सुरेप्सितराज्यलक्ष्मीं । धर्मिष्ठ आर्य वचसा यदगादरण्यं मायामृगं दयितयेप्सितमन्वधावत् । वंदे महापुरुष ते चरणारविंदं ॥ ५५ ॥ ++दाने तपसि वीर्येच विज्ञाने विनये तथा । विस्मयेन हि कर्तव्यो बहुरत्ना वसुंधरा ॥ ५६ ॥ + कायेन वाचा मनसेंद्रियैर्वा बुध्यात्मना वानुसृतस्वभावात् । करोमि यद्य त्सकलं परस्मै नारायणायेति समर्पयेत्तत् ॥ ५७ ॥ उरसा शिरसा दृष्ट्या मनसा वचसा तथा । पद्भ्यां कराभ्यां जानुभ्यां प्रणामोष्टांग उच्यते ॥ ( पाठांतर ) दोर्भ्यां पदाभ्यामुदरेणोरसा शिरसा तथा । सोपस्थद्वयंजानुभ्यां प्रणामोष्टांग उच्यते ॥ ५८ ॥ न क्षुद्रा भगवद्भक्ता विप्रा भागवताः स्मृताः । सर्ववर्णेषु ते शूद्रा यद्यभक्ता जनार्दने ॥ ५९ ॥ द्विषन्तः परकायेषु स्वात्मानं हरिमीश्वरं । मृतके सानुबन्धेस्मिन् बद्धस्नेहाः पतंत्यधः ॥ ६० ॥ । काळ्या वस्त्राची प्रमाणें । + । किल्मिषंदहते वन्हि स्तत् भस्मचक्रतंशुभं । तथाच कज्जलं पूतं दातव्यं वसनादिषु ॥ ६१ ॥ संप्रोक्तं चांगिरसेन श्यामवस्त्रंत्वया कृतं । समासादितनैर्गुण्यं तवशिष्योपशिष्यकैः ॥ ६२ ॥ श्यामरूपं भगवतः श्यामं चाकाश मेदनी । श्यामकुर्चं भवेनेत्रं श्याम चक्रगदायुधं

॥ ६३ ॥ श्यामाक्षर हरिनाम श्याम जगत्र जीवनं । श्याम वस्त्र प्रावरणं श्याममहात्मादर्शनं ॥ ६४ ॥ * ॥ उदक ॥ अशुद्धंच जलं पीतं पीतं शोणित मेवच । मधूकर क्रिया पूतं महात्मेति प्रकिर्तितः ( सेविता साधुरुच्यते ) ॥६५ ॥ वर्णानां वेदसंख्यातु शास्त्रसंख्याषडेवहि । सारपीयूषवाक्यंच वस्त्रपूतं पिबेज्जलं ॥ ६६ ॥

॥ ब्रम्हांडपुराणें ॥ निर्गालितं जलं पीत्वाशोणितं पीतमेवच । सप्तग्राम दहनंच यत्पापं तेन लिप्यते ॥ ६७ ॥

॥ एवं उदाहरणार्थ श्लोक समाप्त ॥

# अवतार आचार्यपद्धति.

## कृतयुग.

ऋग्वेद दशोपनिषद् मुंडी महात्म मार्गी आचार्य श्रीनारायण. हंस अवताराचे प्रमुख ३२ परंपरा त्यां पैकीं.

बह्वचाचार्य.
भृगवादी.
सारस्वतमुनी.
उपेंद्र.

— —

विवस्वत, मनु, ईक्ष्वाक.

— —

सनकादिक ४ चार.
ब्रह्मदेवाचे वरदपुत्र.

## त्रेतायुग.

श्रीनर अवतार ऋषी श्रीदत्त यांचे युगांत प्रमुख १६० परंपरा त्यां पैकीं.

निगदाचार्य.
यदुराजा.
अजगर मुनी.
मानधाता.
प्रभव.
अरळक राजा.
पिंगल मुनी.
अश्वलायन.
देवल ऋषी.

## द्वापार युग.

श्रीऋषभ अवतार-प्रवर श्रीकृष्ण यांचे आचार्य प्रमुख परंपरा ८०० त्यां पैकीं.

रथांतराचार्य.
ऋषभ ९ पुत्र.
कवि.
हरी.
अंतरिक्ष.
प्रबुद्ध.
पिप्पलायन.
अविर्होत्र.
द्रुमिल.
चमस.
करभाजन.

———

श्रीउद्धव देव.
विदूर.
अर्जुन.

श्रुतदेव.
मुचकुंद.
सारस्वत.
भुरी सेनादि मुनी.
भोमासुर बंदीखानीचे
२२००० राजे त्यांनींही
वैराग्य केलें.

कलि युग.

श्रीप्रशांत महापुरुष सिद्ध चक्रपाणी यांचे ४००० परंपरा त्यां पैकीं प्रमुख.

अंगीराचार्य.
तैल्यकार विनायकबास.
निळभट्ट भांडारेकार.
नागांब.
महदांब.
नागदेवाचार्य.
प्रज्ञार्कबिंब माहींभट.
मंडळीक.
आबेंद्र.
नागदेवाचे शिष्य १३
या वेगळे.
केशराज पंडीत.
दामोदर पंडीत.
लक्ष्मींद्रभट देउळवाडेकर हे मुख्य व एकंदर ५०० नागदेवाचे शिष्य १३ पै० भास्कर कवि बोरीकर.

त्यांचे

परशरामबास, रामेश्वरबास परशरामबासांचे शिष्य— पेंटे हरिबास. त्यांचे शिष्य अचलमुऱ्हारी मल्लबास. त्यांचे गुजर शिवबास. त्यांचे वैद्य दत्तराजबास. बेदरकर.

ही शाखावेली १ अशा १३ शाखा मग त्यांत आणखींही पुष्कळ प्रकारच्या उपशाखावेली आजपर्यंत आहेत. त्या ज्यांचे त्यांच्या वृद्धाचारी मांडिल्या आहेत. ऐसी मुंडीमहात्म मार्गीयाची आचार्यसांकळा कृतयुगापासून ब्रम्हविद्या सिद्धांत आचार सांकेत आजपर्यंत प्रमाणोक्त एकच आहे परंतु युगव्यवस्थेनुसार ग्लानी येणे तो भाग निराळा आहे तीं जिवाची अध:मति होय.

॥ श्रीदत्तप्रसन्न ॥

# दर्शनप्रकाश ग्रंथ २

## गणवर्णनोच्छेद प्रकर्ण १.

जो सृष्टि मूळकारक । जाहाला मार्गमूळ तोचि एक । बावन्ना विद्यादायक । तया नमन त्रिविध ॥ १ ॥ नमूं निर्मळा परदाता । नमूं चक्रपाणि ख्यातिवंता । नमूं चक्रधर उपकार भूता । नमूं भक्ता ज्ञानिया ॥ २ ॥ तो ज्ञानिया पिंगलाख्य देव । तयाची आत्मजा अंबुजा नाव । तियेची सुतावज्रा नांव बरव । तियेचा प्रताप मल्ल ॥३॥ तयाचा तुकोबास सगुण । तेथोनि मल्लिराज श्रीवर्धन । तयाचा मुधेराज गहन । तयाचा सुत कमळाकर ॥ ४ ॥ तयाचा संतराज जगविख्यात । तेथोनि त्रितापहर नामविख्यात । तयाचा दैत्यारी नाम सुत । तो जाहाला ग्रंथकारक ॥ ५ ॥ तयाचा विद्या गुरूराज । जैताख्य ज्ञान त्रिकसहज । त्यांचिये भारती प्रसाद मज । ग्रंथ कर्णी आइका ॥ ६ ॥ जो जीवगणा दिव्यगणांशीं पर । जाला सकळांशीं आधार । विस्तारिले चराचर । पर तयां वेगळा ॥ ७ ॥ तयाचा पर मंडळी वास । आनंद मंडळी रहिवास । रमता परम हंस । देव राया तूं ॥ ८ ॥ तूं परेशा परायणा । तूं कृपाळू जावा जीवना । ज्ञान प्रेम साध्य दाणा । उदीत तूं ॥ ९ ॥ जो जीव देवतांचा ईश ।

तोचि नमूं गणेश । येरंगण बहुवस ! अन्यकृत॥ १० ॥ उत्तम मध्यमाद्धम, कणियस । हे चारी प्रणवते गणेश । तेथूनि रचना शास्त्र विशेष । जाली असे ॥११॥ चार पांच चतुर्दश । हा एकावन ग्रंथ प्रकाश । तो सुत सांगता ये विशेष । शौनका प्रती ॥ १२ ॥ चार वेद सहा अठरा हे सकळ । तयाचें पासाव सृष्टि मूळ । तो आदि-गण अवतरला केवळ । तया नमन पुन्हां पुन्हां ॥१३॥ त्रेतीं धुंधुमार शक चालता । तै गजासुर वर्तत होता । त्याचे शीरगणाचिया माथां । लाविलें महेशे ॥ १४ ॥ तयाचा सुत दुंदुभी वीर हट्टी । तयाचीं शिरें तोडिलीं जगजेठी । हें वर्तलें द्वापाराचे शेवटीं । ने जाणती सुज्ञान ॥ १५ ॥ त्रेत दोन लक्ष उरलें । तैं गणेशाचें जन्म जालें । हें जाणतेनि जाणितलें । नेणती मूर्ख अज्ञान ॥ १६ ॥ तरी गण जाला त्रेता भितरीं । ऐसीं युगें गेलीं बहुतें चाऱ्हीं । तैं निगमागमें वेदकारी । नमिला कवण गणे ॥ १७ ॥ तो निराकार गणेश एक । गण समूह ईश न्यामक । अनंत कोटी आइक । अधीना जयाशीं ॥१८॥ तो गणेश ऐकतां । तुटे जन्म मरण संसारव्यथा । तो गण नमावा कवितां । येर नको ॥ १९ ॥ अणिक हीं ऐका गण । परि नेणती तयाचें आचरण । आदि पश्चात् वर्तन । करिती जे ॥ २० ॥ सांडोनि वडील पार्वती शंकर । आधीं गण कां नमिती कवीश्वर । आणिक ही सांगेन प्रकार । तो आइका आतां ॥ २१ ॥ नाहीं सरस्वती नाहीं मळीं गण । तैं महाकवी नमिला कवण । वेद आगम शास्त्रें पुराण । निरोपिली जैं ॥ २२ ॥ चहूं गणा वेगळा

मळी गण। तरी यातें नमिती कां हे जन। परि नेणतां चुकलें खुण । सारासार ॥ २३ ॥ हा मुद्दल गण नव्हें । ऐसें बहुत जाणावें । गणापासोनि उद्भवें । तो उपगण बोलिजे ॥ २४ ॥

## गीतासु श्लोक–१३–१३.

॥ सर्वतःपाणिपादंतत्सर्वतोक्षिशिरोमुखं ॥
सर्वतःश्रुतिमल्लोके सर्वमावृत्यतिष्ठति ॥१॥

आतां आईका महद्गण । श्रोतां सावधान जन । जेणें फिटे अज्ञान । गण भ्रांतीचें ॥ २६ ॥ गणांअनंत भुजा अनंत कर । अनंत चरण अनंत नेत्र । अनंत श्रवण अनंतशिर । मुखें अनंते ॥ २७ ॥ तो सकळांतें धरूनि वर्ततसें । तयाचा कवण ठिकाण कैसा दिसें । हें जाणावें सद्गुरु उपदेशें । वाचौनि नाहीं ॥२८॥ कवी नानामतें बोलती । परि उपगणचि वर्णिती । हे पडली असे भ्रांती । गणदेखण्याची ॥२९॥ तो निराकार महागण । अवतला असे आपण । तयाची सांगेन खुण । श्रोते सावध चित्तें ॥३०॥ तो चहूंयुगीं अवतरत । ऐसें वेदगीता बोलत। ते खूण वसुदेवसुत । अत्रीनंदन ॥ ३१ ॥ जया जेथ-वरी प्रकाशलें । तेणें तेंचि ध्येय केलें । उंच देखलिया हीन त्यजिलें । जाणतेंनी ॥ ३२ ॥ निरोपितां आदि गण। तेथें मळी गणाचें काय कारण । परि सांडिला म्हणती अज्ञान । म्हणोनि सांगीतला ॥३३॥ जो सकळ गणाचा ईशु । तोचि निराकार गणेशु । कृपापर शक्ति विशेषु । शारदा देवी ॥३४॥ तेणें आदिगणें सृष्टी संहार । जीव

देवता गणा केला विस्तार । अंतीं मागुतें तेंचि घर जेथचें तेथें ॥ ३५ ॥

### गीता. ९.—७.

**सर्वभूतानिकौन्तेय प्रकृतिंयांतिमामिकां ॥**
**कल्पक्षयेपुनस्तानि कल्पादौविसृजाम्यहं ॥ २ ॥**

माझिया प्रकृती । मध्यें सर्व भूतें लया जाती । कल्पांतरें मागुती सृजति । माझिया इच्छा ॥ ३७ ॥ तो निराकार गणेश । साकार होऊनि सुंदर वेष । जीवां ज्ञान उपदेश-करी चहु—युगीं ॥ ३८ ॥ शुक्ल श्यामाऽलोहित पीत । ऐसे वर्ण जयाचे फिरत । ब्रह्मा हरिहर जीव अनंत । त्याज पासूनी ॥ ३९ ॥ तो गुरु ब्रह्मकवी दिनकरा । तेणें दर्शन प्रकाश अवधारा । निवाड होय साराऽसारा । सहज तेथें ॥ ४० ॥ दर्शन साधन साध्य भेद । आईकतां तुटती तिन्हीं वाद । एका परमेश्वर पद । एका नाहीं ॥ ४१ ॥ ऐसें उंच नीच पावन । तरी कैसें एक ब्रह्म जाण । न घडे कर्मवाद बोलण । परमेश्वर प्राप्ती ॥ ४२ ॥

### गीता. ८—१६

**॥ आब्रह्मभुवनाँल्लोकाः पुनरावृत्तितोऽर्जुन ॥**
**॥ मामुपेत्यतुकौन्तेय पुनर्जन्मनाविद्यते ॥ ३ ॥**

आब्रह्म भुवन मर्यादा । तेथें पतन असें सर्वदां । जें पावले परमेश्वर पदा । तयां येणें नाहीं ॥ ४४ ॥ जे पर-मेश्वर ज्ञानी । ते न पावती भव भ्रमणी । ऐसी बोलिलि

वेदवाणी । उपनिषदीं ॥ ४५ ॥ ऐसा हा भेद सिद्ध । म्हणोनि न घडे ब्रह्मवाद । नाकर्मेतर परमेश्वर पद । बोलोचि नये ॥ ४६ ॥ म्हणोनि ब्रह्मकर्म वादन घडे । आपण सेवक तो सेव्य जोडे । तैंचि उघडती कवाडे । मोक्ष द्वारींचीं ॥ ४७ ॥ तरी निवाड श्रुती मूळ निर्धार । जेणें प्रकाशे चराचर । तो सुत सांगेल प्रकार । एका वन ग्रंथांचा ॥ ४८ ॥

## एकावन ग्रंथभेद प्रकर्ण २ रें.

॥ " संहितायां " सूतउवाच । श्लोक

॥ चत्वारोनिगमाः प्रोक्ता मंत्राचत्वारएवच ॥
॥ आगमाःपंचसंख्याकाः शास्त्राण्येत्र षडेवहि ॥ ४ ॥
॥ अष्टादशपुराणानि विद्याश्चैवचतुर्दश ॥
॥ एकपंचाशदेवात्र ग्रन्थभेदाः प्रकीर्तिताः ॥ ५ ॥

तरी ग्रंथाची किती गणित भेद । चाऱ्ही निगम चारी मंत्र वेद । पांच आगम प्रसिद्ध । चवदा विद्या ॥ ५१ ॥ साहा शास्त्रें अठरा पुराण । ऐसें भेद एकावन । या तेंच म्हणिजति षट्ट प्रमाण । हा त्रिकांसु भेद ॥ ५२ ॥

॥ सूतउवाच ॥ त्रैविद्यतेतत्वमनेनवेद
प्रमाणमेतत्कथितंचशाब्दं ॥
षोढाप्रमाणंनिगमोऽथमंत्रा
गमाः पुराणानिच शास्त्रविद्या ॥ ६ ॥

यज्ज्ञानकाण्डंनिगमाःसएव
यत्कर्मकाण्डंदशवेदविद्या ॥

मंत्रागमाः शास्त्रपुराणभारा
उपासनाकाण्डमिदंवदन्ति ॥ ७ ॥

निगम मंत्र आगम पुराण । शास्त्र विद्या हे षट्‌ प्रमाण ज्ञान कांड निगम जाण । कर्म कांड त्या विद्या ॥ ५५ ॥ मंत्र आगम जाण । शास्त्रें अठरा पुराण । हें कांड असें उपासना । ऐसें ग्रंथ त्रिकांड ॥ ५६ ॥ इतुकीं प्रणवा पासाव । तो आईकां प्रणव । तयाचा गुरू मुखें अनुभव । म्हणोनि सांकळित ॥ ५७ ॥

तथाच महावाक्योपनिषत्सूक्तयः ॥

तत्पदेनैवमुद्गीय प्रणवः परिकीर्तितः ।
येनेदंत्रायते सर्वं तस्मादोंकार ईयते ॥ ८ ॥

अकारेसत्पदंप्रोक्त मिकारेचित्पदंखलु ।
आनंदोयमुकारेच भगवान्परमेश्वरः ॥ ९ ॥

" त्रिपदामप्येवबोद्धव्यम् "
ॐतत्सवितुर्वरेण्यं भर्गो देवस्य धीमहि ॥

सच्चिदानंद भर्गाख्यो तेषां देवः परात्परं ।
" एवं या वेद स सर्वं वेद " ॥ १० ॥

या ॐकारापासोनि सृष्टी रचना । भार्गा ऐसी त्रिपदा-चिनामना । हें गायत्री ( जाणें ) मुळज्ञाना । तो गुरू उप-

देशीं ॥ ६१ ॥ हे जयाशीं असें ज्ञान । तो सकळ जाणें वर्तन । जैसें मूळें विस्तारण । वृक्षाचें होय ॥ ६२ ॥ प्रणवा पासाव विग्रह निरधार । तें हंसादिक अवतार । तेहीं निरोपिले निगम चार । ब्रम्हयांशीं ॥ ६३ ॥

"तत्वसारोपनिषादि"

**परोपि कृत्य कैवल्यं तुलयित्वा जगद्गुरु ।**
**उपकारं परं मत्वाप्यव तारान् स्वयं दधेत् ॥११॥**

स्वानंद जीवोधरण । परोपकारी कृपाळु गुण । अधिकरवें वर्तन । आपल्या प्रवृत्ती ॥ ६५ ॥ तरितया निगमाचें गणित । श्रीकृष्ण नाथाचा शिष्य सुत । तो सांगताये संख्या परामित । शौनका प्रती ॥ ६६ ॥ तयाची सवा सहस्त्र गणना । उपनिषदें बावन जाणा । याचेंचि वेद–त्रई ज्ञान खूना । म्हणत असती ॥ ६७ ॥

## चारी निगमनाम प्रकर्ण ३ रें.

### संहितायां.

**संख्या सपादसाहस्रं श्लोकानां निगमेषुच ।**
**द्विपंचाशत्भेदाश्च तत्रोपनिषदःस्मृताः ॥ १२ ॥**

चहूं निगमांचीं नांवें चार । बव्हृच निगद रथांतर अंगिरा हें निगम सार । तें सांगतायसुत ॥ ६९ ॥

**बव्हृचो निगदश्चैव तृतीयोथ रथन्तरः ।**
**आंगिरसा श्चतुर्थश्च चत्वारो निगमाःस्मृताः ॥ १३ ॥**

अणिकही सुतें सांगीतलें । चार व्यास सृष्टीकाळीं जाहालें । तेंही काय कथन केलें । तें आइका आतां ॥७१॥ तेहीं चहुं व्यासीं चाऱ्ही ब्राह्मणें । चाऱ्हीं संहिता चाऱ्ही अरण्य । चहूं वेदीं केंलीं निर्माण । भारत संहिता केंलीं ॥ ७२ ॥ कवणा व्यासाचें कवण कृत्य । तें सूत जहाला सांगत । हें सावध चित्तें आइकत । शौनक तो ॥ ७३ ॥ चहूं वेदीं चाऱ्ही ब्राह्मणें । तें वृद्ध व्यासें केलें कथन । बृहद् व्यासें चाऱ्ही अरण्यें । चहूं वेदीं केलीं ॥ ७४ ॥ दैव व्यासें चाऱ्ही संहिता । चहूं वेदी जाहाला कर्ता । मानव व्यास भारत संहिता । कृत्य जाणा ॥७५॥ ब्राह्मण अध्याय षोडश । अरण्य जाणावें अध्याय वीस । संहिता अध्याय चौविस । चहुं वेदींचीं ॥ ७६ ॥ भारत संहिता परमित । चौविस सहस्र गणित ॥ अध्याय जाण दोन शत । ऐशी संख्या असे ॥ ७७ ॥

"संहितायां"

चतुर्धा ब्राह्मणं प्रोक्तं
बृद्धव्यासेन भार्गव ॥
यत्ख्यातं षोडशाध्यायैः
ऋगादीनां च नामभिः ॥ १४ ॥
चातुर्धारण्यमाख्यातं
बृहद्व्यासेन भार्गव ॥
नामभिश्च ऋगादीनां
यत्राऽध्यायाश्च विंशतिः ॥ १५ ॥

**चतुर्धा तंत्रमाख्यातं देवव्यासेन यत्र च ॥**
**चतुर्विंशतिरध्याया ऋगादीनांच नामभिः ॥१६॥**
**चतुर्विंशति साहस्रं चक्रे भारतसंहितां ॥**
**मानवो द्विशताऽध्यायैर्व्यासोवेदश्चनामाभिः ॥१७॥**

चहूं वेदीं सम आचरण । जेणें होय फळाचें पावन । तें उत्तम मंत्रोचारण । तें ब्राह्मण जाणेंवें ॥ ८२ ॥

**चतुर्षु वेदेषु समीरितं च**
**तद्ब्राह्मणं यत्र फलस्मृतिश्च ॥**
**आख्यायिकाभिः सहदेवतानां**
**मंत्रोत्तमानां किलगीयतेशं ॥ १८ ॥**

कामिकस्वर्ग फळाचा निषेध । जेंथ मोक्ष असें प्रतिपाद्य। हा गुरुशिष्य संवाद । तें अरण्य जाणावें ॥ ८४ ॥

**स्वर्गस्य कामस्य निषेधकत्वा**
**निःश्रेयसस्य प्रतिपादकं यत् ॥**
**चतुर्षु वेदेषु समीरितंतत्**
**दारण्यकं यद्गुरुशिष्यवादं ॥ १९ ॥**

मंत्र संग्रह ते संहिता । जेथ देवता फळपरिमिता । हें लक्षण बोलिलें संहिता । दैवव्यासें ॥ ८६ ॥

**संहितायां**

**सा समाख्याता । देवता मंत्रसंख्याता ॥**
**चतुर्वेदेषु यैर्मंत्रैर्देवताफलमीयते ॥ २० ॥**

अठरा जाती चारी वर्ण । षड्दर्शनाचें पावन । तें शास्त्रकारी आपण । आणि श्रीकृष्ण नाथें ॥ ८८ ॥ तेंही इतुक्याची फलश्रुती । निरोपिली ज्ञाननिगुती । आतां वेदत्रयीं व्यास ख्याती । बोलिली जाणा ॥ ८९ ॥ तरि हे चार व्यास कवणापासून । कैसे जालेहो निर्माण । तें आईका आख्यान । सांगेन आतां ॥ ९० ॥

## चार व्यासवर्णन प्रकर्ण ४ थें.

॥ संहितायां ॥

**ततो नारायणो देवः श्वेतद्वीपपतिः प्रभुः ॥**
**कल्पादौ चतुरो व्यासश्चतुर्षु च युगेषु च ॥ २१ ॥**
**निर्ममे स्वस्वरूपेण**
**लोकानां हितकाम्यया ॥**
**षट्पदी ॥ वृद्धव्यासो बृहद्व्यासो**
**देवव्यासस्ततऽपरं ॥**
**मानवो व्यासमाख्यातं**
**स च द्वैपायनो बुधः ॥ २२ ॥**

श्वेतद्वीपीं पती प्रभु नारायण । सृष्टि काळीं चार व्यास केले निर्माण । चहूंचें युगरूप वर्तन । असें जाणा ॥९३॥ तें स्वरूपाचें ममतारहीत । लोकांसि करावया हित । ऐसें केलें निर्मित । तें नामें सांगितलीं ॥ ९४॥ आतां आईका वेदज्ञाना । कवण वेद किती गणना । तें सांगेन अनुक्रमणा । चहुं वेदांची ॥ ९५ ॥

## वेदगणनाश्रुती प्रकर्ण ५ वें.

ऋग्वेदोथ यजुर्वेदः सामवेदोह्यथर्वणः ॥२३॥
द्वाविंशति सहस्त्राणि । ऋग्वेदस्य बभूविरे ॥
शाखाग्रंथा महाभागा । शिष्योपशिष्यसन्तते ॥२४॥
संक्षिप्त्येवं यजुर्वेदं कृताशाखा मुनीश्वरैः ॥
द्वाविंशति सहस्त्राणि शाखास्सन्ति भूतले ॥२५॥

अठ्यांशी सहस्र चाऱ्ही वेद । ऐसा असे संख्याभेद ।
बावीस सहस्र एक वेद । चाऱ्ही सम ॥ ९९ ॥

॥ वेदोत्पत्तीवर लोगमत ॥

द्वाविंसाति सहस्त्राणि सामवेदस्य भार्गव ॥
शाखाग्रंथा बभूवुस्ते शिष्योपशिष्यसंततेः ॥ २६ ॥
मंडुको गर्दभश्चैव श्वानोजंबूक एवच ॥
चत्वारो वेदरूपाश्च पूर्व जन्मसु ब्राह्मणः ॥ २७ ॥
ऋग्वेदो मंडुकोज्ञेयो यजुर्वेदस्तु गर्दभः ॥
सामवेदस्तथाश्वानो जंबुकश्चाप्यथर्वणः ॥ २८ ॥
कर्मणा केन मंडूकः कर्मणा केन गर्दभः ॥
श्वानो वा कर्मणा केन जंबूकः केन कर्मणा ॥२९॥
मद्यपानेन मंडूको मातृ गामीच गर्दभः ॥
निंदया भवतिश्वानोः संध्याहीनेन जंबुकः ॥ ३० ॥
द्वाविंशति सहस्त्राणि ह्यथर्वेदस्य भार्गव ॥
शाखा ग्रंथा बभूवुस्ते शिष्योपशिष्यसंतते ॥ ३१ ॥

म्हणती उत्तर जाती ब्राम्हण । उपनिषदें संख्या बावन ।
हे चहूं वेदीं समान । तेरा तेरा ॥ १०६ ॥ म्हणती

दक्षण जाती ब्राम्हण । त्रयवेदी उपनिषदें बावन । ते तुलेची अथर्वण वेदीं असती ॥१०७॥

**त्रिभिश्च निगमाश्चैव द्विपंचाशत्प्रकीर्तितः ॥**
**एकस्मिन्निगमे तद्वच्चतुर्भिरधिकं शतं ॥ ३२ ॥**
**दाक्षिणात्या इदं प्राहुस्तदेवमुक्तमेव च ॥**
**चतुर्भिर्निगमैश्चैव द्विपंचाशत्तथोत्तरं ॥ ३३ ॥**
**इतः परंक्षेपकाश्च पंडितैः परिकल्पिताः ।**
**वेदितव्या लोकेषु महाभाग शौनक ॥ ३४ ॥**

या वेगळे जे दिसती । ते क्षेपके बोलिजेती । ऐसे सूत सांगे शौनकाप्रती । वेदव्यासाचा ॥ १११ ॥ उत्तर दक्षण ब्राम्हण । उपनिषदां भेद भिन्न भिन्न । तयामाजीं नव्हे कवण । तें जाणावें पंडितीं ॥ ११२ ॥ एकाचीं थोर उपनिषदें असतीं । एका लहान म्हणीजती । तेणें भेद दिसे मती । पर एक जाणा ॥ ११३ ॥ अष्ट शाखा ऋग्वेद । शिहाशी शाखा यजुर्वेद । षोड्ष शाखा सामवेद । संख्या दाहोत्तरशतें ॥ ११४ ॥ अथर्वणीं सहस्र भेद । बारा भेद सामवेद । ऐसा असे अनुवाद । एकाचापैं ॥ ११५ ॥ तर वेद कवणापासाव । कवणा पासाव जाले देव । कवणा पासाव हे विश्व । प्रणवकवण ॥ ११६ ॥
( वेदशाखा १२७ )

## अथ योगशास्त्रे

**प्रणवाज्जाता वेदाः ॥ प्रणवाज्जाता देवाः ॥**
**प्रणवाज्जातं विश्वं ॥ प्रणवात् ब्रम्होत्पन्नं ॥ ३५ ॥**

तरी प्रणव म्हणजे ॐकार । ऐसे ॐकार असती चार । तो सूत सांगेल प्रकार । चहूं ॐकाराचा ॥ ११८ ॥

## ॐकार प्रकर्ण ६ वें.

"संहितायां"

स ॐकारः समाख्यातो वेदविग्रहमानसैः ॥
आंशिकः सांभवश्चैव शाक्तिकश्चान्नवः स्मृतः ॥ ३६ ॥

चहूं ॐकाराचें कार्य कारण । जीव प्रपंचातें जाण । हें ग्रंथज्ञान श्रवण । होय तया ॥ १२० ॥ दुसरा ओंकार शांभव । तेथुन विग्रहा उद्भव । तेणें ब्रह्मया केला प्रभव । चहूं वेदांचा ॥ १२१ ॥

॥ ६ वें प्रकर्ण वेदविग्रह उद्भव. ॥

मुखेभ्यो ब्राह्मणा जाताश्चत्वारो वेदविग्रहाः ॥
चैतन्यस्यावतारांस्तान् वेदब्राह्मणमूचिवान् ॥ ३७

ब्रम्हाकश्यप तयाच्या मुखीं जाले । ब्रह्मयाचा मुखीं चाऱ्ही पुत्र जन्मले । तें वेद विग्रह नांव पावले । चहूं वेदाचे ॥ १२३ ॥ ब्रह्मयाची चाऱ्ही वदन । सृष्टीकाळीं जाला ध्यायमान । चतुर्मुखीं चाऱ्ही पुत्र निर्माण । जालेति ये वेळीं ॥ १२४ ॥

ततःसृष्टिं ध्यायमानो ब्रह्माऽभून्निजमानसे ॥
चतुर्षु वदनेष्वस्य चत्वार उदगन्सुताः ॥ ३८ ॥
ऋग्यजुःसामकोऽथर्वनाम्नोगान्निगमान्विभुः ॥
चतुर्भिर्वक्त्रैर्ब्रह्माऽप्येतान्धारयदात्मानि ॥३९॥
निगमो यो धृतो येन मुखेन तस्य नाम तत् ।
सहस्रं यद्बृहत्याश्च श्लोकरूपं विभोर्वचः ॥ ४० ॥

ऋग्ज्ञाने यजुर्भक्ति । सामवेद ते विरक्ति । हें नामाभान बोलिजेति । चहू वेदांचें ॥ १२८ ॥ ज्ञान भक्ति-वैराग । निरोपिला तिहीं वेदीं योग । ह्मणोनि वेदा

नांव जालें सांग । तेचि मुखा पुत्रा ॥ १२९ ॥ ज्येष्ठो-थर्व दुसरा साम । यजु तिसरा ऋग चौथा उत्तम । ते निगम पुत्राचि सांग नाम । ब्रह्माजगख्यात ॥ १३० ॥

**ज्येष्ठोऽथर्वा ततः साम यजुर्वेदस्ततश्च ऋक् ।**
**तेभ्यः सन्निगमान् वेदान् सांगान् ब्रह्मा जगाद ह॥४१॥**

जिये मुखीं जो अभ्यासिला वेद । तेंचि मुखा पुत्रा नाम भेद । चारी निगम चारी मंत्र भेद । सांगता ये सुत ॥ १३२ ॥

**प्रकर्ण श्रीकृष्णशिष्य ७ वें**

भार्गव वंश शौनकाचा । ब्रह्मवंश तो सुताचा । सुत शिष्य श्रीकृष्णाचा । आणिक सप्त जाणा ॥ ११३ ॥ प्रथमतो ब्रह्मा शिष्य । सुत मनुतयाचा वेदव्यास । तयाचा पुत्र दैव व्यास । तयाचा बंधू सुत ॥ १३४ ॥ अर्जुन आणि उद्धव । गंगासुत भीष्म देव । हे सप्त शिष्याची आणीव । श्री कृष्णाच्या ॥ १३५ ॥

**स्वायंभुवमनोः पुत्रो वेदव्यासो महामुनिः ॥**
**तस्य पुत्रो महातेजा ब्रह्मव्यासोऽहमेव च ॥ ४२ ॥**
**श्रीकृष्णस्यैव शिष्योऽहमर्जुनो येन बोधितः ॥**
**उद्धवश्च महातेजा भीष्मो गंगासुतस्तथा ॥ ४३ ॥**

युगायुगीं अवतरत । जीवा ज्ञान गुरू होत । ऐसे असती अनंत । परी सप्त सांगीतले ॥ १४८ ॥

**॥ वर्ण ४ प्रकर्ण ८ वें विराज पुरुषा मुखो द्भवः ॥**

गुणकर्म चारी वर्ण । कैसे सृजिले जाण । तें ऐका अख्यान । सांगेन आतां ॥ १३९ ॥ हा सांगता निर्धार ब्राम्हण क्षत्रिय वैश्य शूद्र । याचा कैसा जाहाला विस्तार ।

विराट पुरुषीं ॥ १४० ॥ विराट पुरुषा पासाव । ब्राह्मण क्षत्रिय वैश्य शूद्रा उद्भव । तर तयाचा कवण कवण नाव । तें सांगेन आतां ॥ १४१ ॥ मुखीं जाहाले ब्राह्मण ब्रम्हा कश्यप हे दोघेजन । भुजीं क्षत्रिय गहन । दोघे जाहाले ॥ १४२ ॥ दक्षिण भुजें पृथु जाहाला । वाम-भुजे दक्ष जन्मला । वक्षस्थळीं वैश्य निर्मिला । तें परियसापां ॥ १४३ ॥ दक्षिणे वक्षस्थळीं वैजका उद्भव । वाम वक्षस्थळीं विदंभा प्रसव । चरणीं जाहाले शूद्र मानव । दोघे देखा १४४ दक्षिणे चरणीं दंभ-एक । वाम चरणीं जाहाला चैनक । तयापासून अनेक होते जाहाले ॥१४१॥

" संहितायां "

आद्ये महायुगे सौम्य कृते वर्णा बभूविरे ॥
विराजः पुरुषात्साक्षाद्यः प्रजापतिरेव च ॥ ४४ ॥
मुखबाहूरूपादेभ्यश्चत्वारो मनवोऽभवन् ॥
चतुर्णामपि वर्णानां पूर्वजास्ते यथाक्रमं ॥ ४५ ॥

" ब्रह्माण्ड पुराणे "

ब्रह्मणस्तु मुखाद्विप्रो बाहुभ्यां क्षत्रियः स्मृतः ॥
ऊरुभ्यां निर्गितो वैश्यः शूद्रस्तु पदयोर्युगात् ॥४६॥
काश्यपोऽगस्ती विप्राणां पृथुर्दक्षश्च भूभुजां ॥
वैश्यानां वैदवैदंभौ शूद्राणां दंभचैनका ॥ ४७ ॥

येथे नाहीं निंदा स्तुती । एके क्षोभ एके विकल्प संच-रती । म्हणोनि ज्ञान केले निगुती । जैसे तैसें ॥१५०॥

॥ प्रकर्ण ९ वें ओवानिका. ॥

ऐसी ही श्लोक सांखळा ऐक । एक युग्म एक विशे-

षक । एक कळाप एक संधानिक । एक कुलक जाणा ॥ १५१ ॥ कवणें ठाई प्राणाळिका । ऐसीहीं ग्रंथ ओवनिका हा सरवळा लापनिका । जाणावे पंडितीं ॥ १५२

॥ " संहितायां " ॥

सार्धेन षट्पदी प्रोक्ता द्वाभ्यां युग्ममुदाहृतं ॥
त्रिभिर्विशेषकं चैव चतुर्भिश्च कलापकं ॥ ४८ ॥
संधानिकं पंचभिश्च षड्भिः कुलकमेव च ॥
सप्तभिर्बहुभिश्चैव श्लोकैरुक्ता मणालिका ॥ ४९ ॥

॥ प्रकर्ण १० वें ॐकार तिसरा चवथा ॥

तिसरा शाक्तयॐकार । तयापासूनि आगमचार । तयाचीं संख्या शतादिसत्तर । कोटीजाणा ॥ १५५ ॥

स्वच्छंदपूर्वललितः प्रथमागमोऽसौ
मंथानभैरव उदीरित आदिकादिः ॥
आम्नाय एष किल पंचम एव षड्भिः
पंचागमाः पटुतराः किल सिद्धविद्याः ॥५०॥

चहूं आगमाचें गणीत । तें ब्रह्मविदचि जाणत । येरा न कळे आद्यंत । फळादिकांचा ॥ १५७ ॥ चवथा ॐकार तो आनव । तेथून षटुशास्त्रा उद्भव । चवदा विद्या पुराण नाव । तयाचिपासूनी ॥ १५८ ॥

॥ प्रकरणः ११ वें ५१ ग्रंथआधारे सृष्टिव्यापार ॥

" संहितायां "

मत्स्यं च कौर्म्यं च ततो वराहं
तन्नारसिंहं किल वामनं च ॥
रामायणं रेणुकनामधेयं
हलायुधं बौद्धमथैव काल्क्यं ॥ ५१ ॥

आदित्यचांद्रे अनिलं च वाह्नं
ब्राह्मंच शैवं त्वथ वैष्णवं च ॥
नारायणं चाष्टदश प्रभेदाः
पुराण वेदैः कथिताश्च मुख्याः ॥ ५२ ॥
आयुर्वेदो यो धनुर्वेद एव
पश्चात्प्रोक्तः शिल्पवेदस्तृतीयः ॥
तुर्या विद्या योऽथ गंधर्ववेदो
विद्या मुख्या सानुगास्ता दशैव ॥ ५३ ॥
एताश्चतस्रो विद्या वै उपवेदसमाभिधाः ॥
लोकानामुपयोगाय वेदितव्या मनीषिभिः ॥ ५४ ॥
प्रोक्ता महद्भीरपि सुपनीति
पशुर्वणिग्वैलिपिपोतविद्या ॥
माहेंद्रविद्या गणिताख्यविद्या
अध्यात्मविद्या दश वेदविद्याः ॥ ५५ ॥

हे एकावन ग्रंथ मूळ भूत । ग्रंथा आदि मध्य अंत । हेंचिवाक्य असत । आधार तया ॥ १६४ ॥ एकावन ग्रंथा आधार । हा चाले सृष्टीचा व्यापार । तो ऐका विस्तार । सकळाचा ॥ १६५ ॥ निगमें होय मोक्षपद । फळ प्राप्ती होय वेद । आगमें होय सिद्ध । न्याय शास्त्रें मोक्ष ॥ १६६ ॥ हंस अवतारे निरोपिला न्यायें । म्हणोनि तेथ मोक्ष उपाये । याचे फळप्राप्ती होय । तें बोलिलीं सुतें ॥ १६७ ॥ पुराण विद्या सकळें । होती स्वर्गादि फळें । ग्रंथीं कवळिलीं सकळें । दर्शन ग्रंथ हस्त मात्र ॥ १६८ ॥

## ॥ प्रकर्ण १२ वें दर्शन प्रकाश ॥

तरी ग्रंथषट्ठ शास्त्र ज्ञान । ऐकावे अंतःकर्णे । तेणें गार आणि षड कोण । निवाड होय ॥ १६९ ॥ कवणे शास्त्रीं कर्म वाद । कवणे शास्त्री भेदाऽभेद । हा दर्शन संवाद । करीं पां तूं ॥ १७० ॥ वेदांत काम शास्त्री अद्वैत । न्याययोग धर्म सांख्यद्वैत । हा भेद जाणत । चहूं शास्त्रीं ॥ १७१ ॥ कवणें शास्त्रीं किती अध्याय भेद । कवणे शास्त्रीं किती सूत्र प्रबंद । कवणें शास्त्रीं किती पदार्थ वृंद । कवण कवण ॥ १७२ ॥ ऐशीं हे षड्-दर्शन । एकाहुन एक उंच निंच जाण । हें ज्ञान सार लक्षण । बोलिलें असें ॥ १७३ ॥ शब्दें दर्शन तऱ्ही म्हणत । परिं तया दर्शना तें नोळखत । तें जाणावें अल्प-मत । ज्ञाना वेगळें ॥ १७४ ॥ आतां आइका ज्ञान-सागर । जो षड्शास्त्राचा निर्धार । दर्शनाचा विस्तार । आईका आतां ॥ १७१ ॥

## ॥ प्रकर्ण १३ वें ६ दर्शण विस्तार ॥

साही शास्त्रें षड्दर्शन । तयाचीं नांवें कवण कवण । कवण शास्त्रीं कवण दर्शन । तें सांगेल सुत ॥ १७६ ॥

संहितायां.

तत्कामशास्त्रं किल धर्मशास्त्रं
तद्योगशास्त्रं त्वथ सांख्यशास्त्रं ॥
वेदांतशास्त्रं त्वथ पंचमं च
तन्न्यायशास्त्रं प्रवदन्ति षष्ठं ॥ ५६ ॥

कामे मुद्री धर्मे कुंची योगे लिंगी सांख्ये जाटी ॥
वेदान्ते वैदण्डी चोक्ता न्याये मुण्डी प्रोक्ता मार्गाः ॥

कामशास्त्र म्हणजे चार्वाक । तेंथ मुद्री दर्शन बोलिले एक । तें सांगतां आईक । पंथ बारा ॥ १७९ ॥ नाटेश्वर भैरव संतनाथ । जालंधरी वाघळी अवघटी अघड कळंक पंथ । अघोर मच्छ अळपाळी माहिंद्रनाथ । घोडाचुडी ॥ १८० ॥ सुवर्ण पंथ बाळनाथ । हा योग जाणिजे बारा पंथ । आतां आईका वृत्तांत । धर्म शास्त्राचा ॥१८१॥ धर्मशास्त्र म्हणजे मीमांसका । तेथें कुंची दर्शनद्विध देखा । तयाचे पंथ आईका । भेद चौऱ्यायशीं चौदा ॥ १८२ ॥ निजप्रभु आणि जिन । आनंद नारदप्रभु जनार्दन । ब्रह्मांड कीर्ति जयमल जाण । प्रताप नववा ॥ १८३ ॥ तारक वैराग्य पितांबर । चंद्र विष्णु ब्रह्मशंकर । हे आदि करूनी चौऱ्यायशी विस्तार । गुच्छ बोलिजेती ॥१८४॥ आतां सोफी पंथ विस्तार । तयाचा चतुर्दश निर्धार । ऐका करूनी आदर । सांगेन आतां ॥ १८५ ॥ प्यारे मुल्ला अबदाल फकीर । जंदे मलंग कादी कलंदर । मुंडे किलशेख सैयदसार । दर्वेश भडंग महमदी सोफी ॥१८६॥ योगशास्त्र तें तृतीय जाणा । तेथ लिंगीं दर्शनाची नामना । तयाचे भेद विचारणा । पंथ पांच ॥ १८७ ॥ रेवण मैराळ आचार्या । एको राम पंडित आराधिया । हे प्रथम जंगमाचार्या । कलियुगीं पांच ॥१८८॥ माचया आणि बंबया । चंदया आणि कंकया । पांचवा तो गुंडया । हे जंगमाचार्ये ॥ १८९ ॥ सांख्य शास्त्रीं जटी दर्शन । तयाचे पंथ दश नामन । हें दर्शनाचें लक्षण । बोलिलें असें ॥ १९० ॥ तीर्थ भारती पर्वत गिरी । बन अरण्य आश्रमपुरी । सरस्वती सागर विस्तारी । हा दश पंथ

संन्यास ॥ १९१ ॥ वेदांत शास्त्रीं दर्शन श्रीपाद । अवतार संख्या दर्शन भेद । म्हणोनि न करावा प्रतिवाद । शास्त्रसाक्षी असें ॥१९२॥ स्वरूप चैतन्य ब्रह्म । आनंद प्रकाश राम । स्वामी दोन्ही दत्त नाम ज्योति जीर्ण संन्यास ॥ १९३ ॥ न्यायशास्त्री मुंडी दर्शन । तयाचे तेरा पंथ जाण । हें ज्ञानसार ओळखण । तैं चुके संसृती उपाध्ये अमृते कवीश्वर । चक्रपाणी मादालसा कुमार । पारमांडल्य साळकर । जयदेव योगी ॥ १९५ ॥ हरी देव दिवाकर । यक्षदेव आणि दामोदर । महात्मा पंथ निर्धार । तेरा बोलिले ॥१९६॥ यती आणि हंस.॥ त्यांसचि परमहंस । जयकृष्णी महात्मास ॥ अच्युपंथ ॥ ११७

भविष्योत्तरपुराण

अथाप्युपाध्यायदिवाकरौ च
कवीश्वरः सालकरोऽमृतश्च ॥
सपारमांडल्य महेश्वरश्च
दामोदरो मादलसाकुमारौ ॥
सयक्षदेवो हरिदेवनामा
त्रयोदशः स्याज्जयदेवयोगी ॥
आचार्यवर्यांश्च नमामि शिष्य
आम्नायकाराः सकला मुनींद्राः ॥ ५८ ॥

कृती महात्मा बव्हृच आचार्य । त्रेतीं महात्मा निगदाचार्य । द्वापारीं महात्मा रथांतरीय । कलयुगीं अंगिरस ॥ १९८ ॥ ऐसें हें महात्मे चाऱ्ही । तें चहूं युगा भीतरीं । केले जीवोद्धरणा व्यापारी । आचार्य तें ॥१९९॥

॥ प्रकरण ६ दर्शन भेद लक्षन. ॥

हीं दर्शनें आणि साधन । यांचें भेद भिन्न भिन्न । तयाची ऐका लक्षणें वेगळीं वेगळीं ॥ २०० ॥

॥ " संहितायां " ॥

साधने षड्विधे शास्त्रे षड्विधं परिकीर्तितं ॥
तथाच दर्शनं मार्गे शब्देन पर्येत्किल ॥ ५९ ॥

न्याय शास्त्रीं तो सत्कार । वेदांती तो साक्षात्कार । सांख्ये शास्त्री अहंकार । विहार तो योग शास्त्रीं ॥२०२॥

सत्कारः प्रथमः प्रोक्तः साक्षात्कारस्ततः स्मृतः ॥
अहंकारस्ततश्चैव व्याहारस्तत एव च ॥ ६० ॥

धर्म शास्त्रीं अंतःकार काम शास्त्रीं तो संस्कार । हा साधन षटु प्रकार । पुढादर्शनें ॥ २०४ ॥

॥ प्रकरण १४ दर्शन. ॥

अन्तःकारोऽथ संस्कारः साधनानि षडेव हि ॥
मुण्डी दण्डी जटी लिंगी कुंची मुद्री तु दर्शने ॥६१॥

मुद्री दर्शन तो योगी एक । कुंची दर्शन तो क्षेपणिक । लिंगी दर्शन तो जंगम ऐक । हे दर्शन त्रय ॥ २०६ ॥ जटी दर्शन तो जटाधारी स्वतःसिद्ध । वैदंडी म्हणजे श्रीपाद । मुंडी दर्शन तो महात्मा प्रसिद्ध । बोलिला असें ॥ २०७ ॥ सत्कार साधन तें श्रवण । साक्षात्कार ते लोचन । अहंकारतें नासिक जाण । रसनाते विवहारा ॥ २०८ ॥ अंतःकार साधन तें मन । संस्कार त्वचा इंद्रिय साधन । पुढें आईका आख्यान । दर्शनाचें ॥२०९॥

सत्कारः श्रवणं प्रोक्तं साक्षात्कारश्च लोचनं ॥
अहंकारोऽथ नासाच व्याहारो रसना स्मृतः ॥६२॥

अन्तःकारो मनश्चैव संस्कारोऽथ त्वगिंद्रियं ॥
षड्दर्शनानि चैतानि शास्त्रकारैः स्मृतानि च ॥६३॥

॥ प्रकर्ण १५ वें शास्त्र ओळख लक्षण भेद. ॥

आधी शास्त्र उप शास्त्रांतें । तें जाणावे पंडितीं बहुश्रुते । एरव्हीं न कळतां मूळमतें । षट्‌ शास्त्राचीं ॥२१२॥
शास्त्रें ओळखावीं तीं लक्षणें । ऐका लक्षणीं भेद तीन । ऐसे भेद चौपन्न । शट्‌ शास्त्राचें ॥ २१३ ॥

उपशास्त्राणि शास्त्राणि ये के कुर्वन्ति भूतले ॥
शास्त्रसारमजानंतः पंडितानां तथाविधः ॥ ६४ ॥

॥ प्रकर्ण १६ वें उपशास्त्र ६. ॥

ये भूमंडळीचे लोक । शास्त्राउपशास्त्रांतें करीती एक शास्त्रपार न कळे ऐक । तैसे न होती पंडित ॥२१५॥

ग्रंथतात्पर्यव्युत्पत्तिलक्षणं यत्र नास्ति च ॥
उद्धारो मतशेषस्य प्रोक्तं तच्चोपशास्त्रकं ॥ ६५ ॥

तीं लक्षणें शास्त्र ओळखत । ग्रंथ तात्पर्य व्युत्पत्ती जाणत । हे लक्षण जेथें न देखत । तें उपशास्त्री ॥२१७॥
तरी आईका ग्रंथ लक्षण । तात्पर्य हें तैसेंच जाण । तिसरें उत्पत्ती लक्षण । सांगेन आतां ॥ २१८ ॥

देवतानिर्मितं सूत्रं श्रुतस्यान्वयकारकः ॥
द्वावृषी विद्येते यत्र शास्त्रषट्कं प्रकीर्तितं ॥ ६६ ॥

एक देवता आणि दोन ऋषी । ऐसेचि जाणावे षट्‌ शास्त्रांसी । एक श्रोता परियसीं । एक अन्वय कारका ॥ २२० ॥

प्रमाणप्रमेयादिभिर्यत्र ताव-
त्फलाधारसूत्रं त्रयीप्रोक्तमाद्यं ॥

**प्रमाणं च वेदः षडंगस्य वृत्तीः**
**स्ववादप्रतिष्ठोदितं शास्त्रषट्कं ॥ ६७ ॥**

आदि शब्दे पदार्थ सोळा । तयाधारें फळसुत्र निर्वाळा हा ग्रंथ त्रिलक्षणी सरवळा । पुढिले विश्रांतीं ॥ २२२ ॥ तरी प्रमाण तो वेद । प्रमेय तो षडांग वृत्ति भेद । स्ववाद प्रतिष्ठा फळवाद । तात्पर्य बोलिजे ॥ २२८ ॥

**यत्र कथाऽनुसंघानं तत्सहोद्देशपंचकः ॥**
**पादैश्चतुर्भिरध्यायः शास्त्रषट्कं प्रकीर्तितं ॥ ६८ ॥**

एक कथा अनुसंधान । आणि पंच उद्देशजाण । चतुष्पादा अध्याय हें ग्रंथ लक्षण । बोलिलें असें ॥ २२५ ॥

## प्रकर्ण १७ वें उपशास्त्र मतें.

यात्रिलक्षणीं शास्त्र निर्धार । तो सांगीतला विस्तार । आतां आईका उपशास्त्र । शास्त्रमतें ॥ २२६ ॥ ऋषी स्वकृत ग्रंथ करीत । शास्त्र शेष मत उद्धारित । म्हणोनि उपशास्त्र म्हणत । तया ग्रंथा नाव ॥ २२७ ॥ आश्राऊनि न्याय मत । विशेषिक केला ग्रंथ । तो कणाद मुनिकृत । नव्हे शास्त्र लक्षण ॥ २२८ ॥

**न्यायस्य मतमाश्रित्य कणादस्तु करिष्यति ॥**
**वैशेषिकं सूत्रपाठं तत्र नो शास्त्रलक्षणं ॥ ६९ ॥**

वेदांत मत द्विज व्यास । घेऊनि केले वेदांत भाष्य । शारीरक शास्त्र विशेष । ग्रंथा नाव ठेविलें ॥ २३० ॥

**वेदान्तमतमाश्रित्य द्विजो व्यासः करिष्यति ॥**
**शारीरकं शास्त्रपाठं तत्र नो शास्त्रलक्षणं ॥ ७० ॥**

विप्रदंडीं शंकराचार्यानें । वेदांत व्याख्यान केलें तेणें । ते भविष्य केलें कथन । वेदांत उपशास्त्र ॥ २३२ ॥

**भविष्यान्ति कलौ विप्रा दण्डिनः शंकरादयः ॥**
**तद्व्याख्यानं करिष्यन्ति ये वेदान्तानुशायिनः ॥७१॥**
**बौद्धशास्त्रं करिष्यन्ति तत्र नो शास्त्रलक्षणं ॥ ६९ ॥**

कलियुग मत घे घेउनीं । शैव शास्त्र जंगमें करूनी । आतां पुढील ऐका वाणी । धर्म शास्त्राची ॥ २३४ ॥

**योगस्य मतमाश्रित्य जंगमास्तु कलौ युगे ॥**
**शैवशास्त्रं करिष्यन्ति तत्र नो शास्त्रलक्षणं ॥ ७० ॥**

मी मांसा मत जय मुनी द्विजें । पूर्वोत्तर सूत्र पाठ सहज । तो नव्हे लक्षण बुझ । शास्त्राचा पै ॥ २३६ ॥

**मीमांसामतमाश्रित्य जैमिनिः कृतवान् द्विजः ॥**
**पूर्वोत्तरं सूत्रपाठं तत्र नो शास्त्रलक्षणं ॥ ७१ ॥**

कळौ भट्टाचार्या प्रभाकर । जाले मीमांसा व्याख्यानकार । ते भाष्य प्रभाकर । ग्रंथा नाव ॥ २३९ ॥

**भविष्यन्ति कलौ भट्टास्तच्छिष्यास्तु प्रभाकराः ॥**
**तद्व्याख्यानं करिष्यन्ति भाट्टं प्राभाकरं हि तत् ॥७४॥**

कलौ भविष्यंति जाण । मी मांसा मत घेऊन । सूत्र-पाठ ग्रंथ करण । तयाधारें ॥ २४१ ॥

**मीमांसामतमाश्रित्य भविष्यंति कलौ जिनः ॥**
**सूत्रपाठं करिष्यन्ति तत्र नो शास्त्रलक्षणं ॥ ७५ ॥**

चार्वाक मत आश्राईत । संबर शिष्यें केला ग्रंथ । तया नाव सांबराख्य म्हणत । नव्हे शास्त्र लक्षण ॥ २४३ ॥

**चार्वाकमतमाश्रित्य सांबराख्यः करिष्यति ॥**
**सिद्धशांबरभार्यं च तत्र नो शास्त्रलक्षणं ॥ ७६ ॥**

हे षट् शास्त्रांचीं उपशास्त्रें । आणिकें बहुतें असतीं विचित्रें । ते सांगितलीं संकळित मात्रें । बुझावया ॥२४५॥

## ।। प्रकर्ण १८ मुदल शास्त्र निर्धार. ।।

हा उपशास्त्र विचार । आता मुदल शास्त्र निर्धार । तो सुत सांगेल प्रकार । शौनका प्रती ॥ २४६ ॥ षट्‌ शास्त्राचे कर्ते कवण । किती पुरुष मिळोनि जाली निर्माण । कवणें दर्शनीं किती भेद जाण । आहेत जे ॥ २४७ ॥ रुद्र न्यायाचा कर्ता । तो गौतमाशी जाला निरूपिता । गौतम जाला सांगता । पिछलायणाशी ॥ २४८ ॥ वेदांत ब्रम्ह्यानें केलें । जेणें वृद्ध व्यासाशीं सांगितलें । तेणें वामदेवाशीं निरोपिलें । पुढील कृत्य आईका ॥ २४९ ॥ विष्णुकर्ता सांख्याचा । तो गुरू होय कपिलाचा तो निरोपिता जाला साचा । पंच शिष्यांशीं ॥ २५० ॥ योगशास्त्र शुकें केलें ॥ सौगता प्रती सांगितलें । तेणें याज्ञवल्क्याशीं निरोपिलें । हें लक्षण शास्त्र षट्‌काचें ॥ २५१ ॥ धर्म शास्त्राचा कर्ता बृहस्पती । तेणें जैमिनीशीं सांगितलें निगुती । पुढील आईका ख्याती । काम शास्त्राची ॥२५२॥ कामशास्त्रकळा संबर रूपें॥ तो वात्स्यायनाप्रती सापें । निरोपिता जाला प्रतापें चार्वाक तें २५३

## ।। प्रकर्ण १९ वें शास्त्रीं पदार्थ फळ पावन ज्ञान. ।।

शास्त्र दर्शन म्हणत । तरी कवणें शास्त्रीं किती पदार्थ आणि कवण फळ पावत । तें जाण शास्त्र ज्ञान ॥२५४॥

### ॥ " संहितायां " ॥

**षोडशानां पदार्थानां तत्त्वज्ञानात्प्रकाशितं ॥**
**निःश्रेयसफलं यत्र न्यायशास्त्रस्य लक्षणं ॥७७॥**
**पंचविंशतिसंख्याकशतानि पचकाधिकैः ॥**
**न्यायशास्त्रस्य सूत्राणि रुद्र एव विजज्ञिवान् ॥७८॥**

सूत्र प्रमाणप्रमेयोपाधिप्रयोजनसिद्धांतदृष्टान्तावयवतर्कनिर्णयवादजल्पवितंडहेत्वाभासच्छलजातिनिग्रहस्थानां ॥ तत्त्वज्ञानान्निःश्रेयसाधिगमः इति न्यायशास्त्रस्यादिमं सूत्रं ॥ ७९ ॥

ह्या न्याय शास्त्राच्या सूत्रा । कर्ता हंसे ज्ञान केलें रुद्रा । तेणें त्रेतीं गौतम ऋषीश्वरा । सांगीतलें त्र्यंबकीं । २५८ न्याय शास्त्रींचें पांच आध्ये । पंचवीस शते पांच प्रसिद्धे । निश्चय फळ पावती आल्हादे । पदार्थ सोळा ॥ २५९ ॥

पंचाध्यायैः सूत्रितं न्यायशास्त्रं

॥ " संहितायां " ॥

दशानां तु पदार्थानां तत्त्वज्ञानात् प्रकाशितं ॥
पारमेष्ट्यं फलं यत्र तत्तु वेदान्तलक्षणं ॥ ८० ॥
शतानि दशपंचैव त्रिपंचाशोत्तराणि च ॥
वेदांतशास्त्रसूत्राणि ब्रह्मैकः प्रतिपेदिवान् ॥ ८१ ॥

सूत्र प्रमाणप्रमेयोपाधिमायाविवर्तदृष्टान्तप्रयोजनसिद्धांतवेदान्तमहावाक्यानांतत्वज्ञानात्पारमेष्ठ्यं संगच्छेत । इति वेदांतशास्त्रस्यादिमं सूत्रं ॥ ८२ ॥

वेदान्ताख्यं पंचभिःरध्यायै सूत्रितं॥

हें वेदांत शास्त्रींचें सूत्रजाण । तें त्रेतीं ब्रह्मां सांगे व्यासालागुन । तेणें जालें सकळ पदार्थज्ञान । तें आईका आतां ॥ २६३ ॥ वेदांतशास्त्रीं पंधरा अध्याय म्हणत ।

ं पंधराशतें त्रेषन गणीत । दाहा पदार्थ बोलत । फळ-
मिष्टच ॥ २६४ ॥

कसंख्या पदार्थानां तत्त्वज्ञानात्प्रकाशिता
ंरसाधिपत्यंच सांख्यशास्त्रस्य लक्षणं ॥ ८३ ॥
ादशशतैः सूत्रैः नवयुग्माधिकैर्मुनिः ॥
ासुरि कापिलं सांख्यं साक्षाद्विष्णुर्जगाद वै ॥८४॥

सूत्र प्रमाणप्रमेयोपाधिब्रह्मपरिमाणदृष्टान्तप्रयो-
जनसिद्धान्तसांख्यानां तत्त्वज्ञानाद्रसा-
धिपत्यं संपद्यते इति सांख्यशास्त्रस्यादि-
मंसूत्रं ॥ ८५ ॥

र्याध्यायैः सूत्रितं सांख्यशास्त्रं ॥

हें सूत्र सांख्यशास्त्रीं असे । त्रेतीं विष्णु कपिलासीं
कारों । तेथें फळपदार्थ ज्ञान असें । तें जाणावें श्रोतीं
२६८॥ सांख्यशास्त्रीं अध्याय बारा । सूत्रें अठराशतें
रा । नवपदार्थ अवधारा । फळरसाधिपते । ॥ २६९ ॥

ातुर्णांतु पदार्थानां तत्त्वज्ञानात्प्रकाशितं ॥
ाजरत्वामरत्वंच योगशास्त्रस्य लक्षणं ॥ ८६ ॥
ोगशास्त्रस्य सूत्राणि शतानिद्वादशैव च ॥
शोत्तरस्य सुक्रोसौ याज्ञवल्क्यः प्रपेदिवान् ॥८७॥

सूत्र प्रमाणप्रमेयोपाधियोगसिद्धियोगानांतत्व-
ज्ञानादजरोमरोभयो भवेदिति योग-
शास्त्रस्यादिमं सूत्रम् ॥८८॥

ाष्टाध्यायैः सूत्रितं योगशास्त्रं ॥

हें सूत्र योगशास्त्रींचें सांगता । तें सुक्र सौगताशीं
ाहाला निरोपिता । फळपदार्थ तत्वता । निर्धारिलें

२७३ योगशास्त्रीं अध्याय आठ असत । सूत्रें तेराशतें आणि दाहा गणीत । पदार्थ चार अजरामरत्व । पावती तें ॥ २७४ ॥

**पंचसंख्या पदार्थानां तत्वज्ञानात्प्रकाशिता ॥**
**फलं माहेंद्रधिष्ण्यं च मीमांसाशास्त्रलक्षणं ॥ ८९ ॥**
**धर्मशास्त्रस्य सूत्राणामेकादशशतं मितं ॥**
**शोडशाधिकमाख्यातं गुरुणांद्युसदां खलु ॥ ९० ॥**

सूत्र **प्रमाणप्रमेयकर्मलाभमीमांसाधर्माणांतत्वज्ञानान्महेंद्रधिष्ण्यं च समश्नुते इति धर्मशास्त्रस्यादिमं सूत्रं ॥९१॥**

**पंचाध्यायैः सूत्रितं धर्मशास्त्रं ॥**

हें सूत्र मीमांसाजाणा । तें बृहस्पती सांगे जैमिना । तेणें फळपदार्थ गणना । होती जाहाली ॥२७८॥ धर्मशास्त्रीं दाहा अध्याय परमित । सूत्रें अकराशतें सोळा गणीत । पदार्थ पंच अवधारित । मळमहेंद्र ॥ २७९ ॥

**यत्र षण्णां पदार्थानां तत्वज्ञानात्प्रकाशितम् ॥**
**फलं च सार्वभौमत्वं शास्त्रं चार्वाकसंमतं ॥ ९२ ॥**
**द्वाविंशतिशतैः सूत्रैः प्रोच्य षष्ठ्यधिकैः कलिं ॥**
**चार्वाक कामशास्त्रं तु मुनिं वात्स्यायनं प्रति ॥९३॥**

सूत्र **प्रमाणप्रमेयाप्रमेयत्वं तत्र भोगकामानांतत्वज्ञानात्सार्वभौमं समृद्धिमिच्छेत्तु ॥ इति कामशास्त्रस्य लक्षणं ॥**

**सप्ताध्यायैः सूत्रितं कामशास्त्रं ॥ ९४ ॥**

हें कामशास्त्रींचें सूत्र । तें वात्स्यायना सांगे कलिसांबर । फळ पदार्थ निरधार । केला तेणें ॥२८३॥ कामशास्त्रीं

अध्याय सात । सूत्रें बावीसशतें सहागणीत । सहा पदार्थ निर्धारित । फळसार्व भौम ॥२८४॥ हें साही शास्त्रींचें बोलणें आईका । तें सूत सांगे शौनका । वेदगीता पुराणें देखा । येरें ओफळ जाणावीं ॥ २८५ ॥

**शास्त्राध्यायाः सप्तपंचाशदुक्ताः ॥**
**शास्त्राणां गणितं षण्णां सूत्राणां गणितं बुधैः ॥**
**सहस्राणि दशैवेह सूत्राणि च शताधिकं ॥ ९५ ॥**

षटुशास्त्राचि अध्याय सत्तावन्न । सूत्रें दहासहस्र आष्ट जाण । पदार्थ पन्नास गणन । शास्त्रमतें ॥ २८७ ॥

**॥ प्रकर्ण २० वें षटुदर्शन साध्याः ॥**

षटुदर्शनाचीं साध्यें पाहतां । सूत शौनकाप्रती जाहाला सांगता । भगवंत सांगोनी निषेधिता । उद्धव देवाप्रती ॥ २८८ ॥ ब्रह्मा विष्णु महेश्वर । शुक्र बृहस्पती कली सांवर । पदार्थ साध्यें निर्धार । केला साहीजणीं ॥२८९॥ जो पाचाचें बोलणें नाईके । आणि साहातें मनीं न लेखे । तो बहुत पावे दुःखें दृष्टादृष्टीं ॥ २९० ॥ तरीं पांच ते परमेश्वर । साहा ते ब्रह्मा विष्णु महेश्वर । शुक्र बृहस्पति कलि सांवर । तयाचीं शास्त्रें ॥ ३९१ ॥ पांचीं निरोपिला षडांगवेद । गीता आणि निगमभेद । वेदपुरुषें चाऱ्हीं वेद । निरोपिले असती ॥ ३५२ ॥ विद्यापुराणे कर्ते पुरुष । यितुक्यांचें बोलणें ग्रंथीं अस । आतां आईका व्याकरण पुरुष । पुढा असे वेद करीता ॥ २९३ ॥

**॥ प्रकर्ण २१ वें व्याकरण पुरुष लक्षण. ॥**

व्याकरण करिता पुरुष । तो किती अंगीं वर्तत निर्दोष । तयाचा सांगता विशेष । असे बहु ॥ २९४ ॥

**॥ नारायण कल्पे ॥**

**चत्वारि शृंगाणि त्रयोस्य पादाद्वे अस्य शीर्षे चतुसप्त हस्ताः ॥ त्रिधा बद्धो ऋषभोरोरवीति ॥ महो देवो मर्तमानाविवेशा ॥ ९६ ॥**

आईका महापुरुषाची ख्याती । तयाचें विकट आंग-आकृति । चारी शिंगें तीन चरण बोलिजती तयापुरुषा ॥ २९६ ॥ दोन शिर्षे ( शिरे ) सप्तहस्त । दो तिहीं-ठाई बांधला नेमस्त । तिहीं लोकीं बोलत । व्याकरण पुरुष तो ॥ २९७ ॥ तरी व्याकरणें किती कवण । आष्टधा असती जाण । तें ऐका चित्त देऊन । सांगेन आतां ॥२९८॥

**॥ प्रकर्णः २२ व्याकरणनामः ॥**

महेश्वरी, पिछली, चंद्र, । काशीका, कृत्सन, इंद्र, । शाकट, आणि कुमार, । हे अष्ट व्याकरणें ॥ २९९ ॥

**॥ संहितायां ॥ माहेश्वरं चापिशलं च चाद्रं**
**तत्काशिकृत्स्नं किल शाकटं च ॥**
**कौमारकातंत्रमथैव मिंद्रः ।**
**यदष्टधा व्याकरणं च संस्कृतम् ॥ ९७ ॥**

श्रीकृष्ण हंसरूप सृष्टीकाळीं । षडांग वेद तिये वेळीं । तयांत एक अंग व्याकरण वनमाळी । निरोपिता जाहाला ॥ ३०१ ॥ वेद म्हणजे षडांग । व्याकरण तें एक आंग । तरी साही पुरुष अभंग । हो व्हावे कीं ॥३०२॥ म्हणोनि श्रीकृष्णाचिया लिळा न कळती सृष्टीच्या मंडळा । तेथ व्याकरण पुरुष वेगळा । कैसा बोलावा ॥ ३०३ ॥

**॥ नारायणकल्पे ॥**

**सृष्टिकाले षडंगानि वेदस्येशाविरिंचयः**

**श्रीकृष्णो हंसरूपेण जगादात्मप्रसिद्धये ॥९८॥**
**शिक्षा कल्पो व्याकरणं निरुक्तच्छंदो ज्योतिष मितिस्मृतेः ॥ ९९ ॥**
**छंदः पादौ च वेदस्य हस्तौ कल्पोथ कथ्यते ॥**
**ज्योतिषामयनं चक्षुर्निरुक्तं श्रोत्रमेव च ॥**
**शिक्षा घ्राणं च वेदस्य मुखं व्याकरणं स्मृतं ॥१००॥**

**॥ प्रकर्ण २३ वें वेदमुर्ति ॥**

ऋग्वेद यजुर्वेद । सामवेद अथर्वणवेद । याचा षडांगं भेद । मुख नेत्रादिक ॥ ३०७ ॥ छंद पाय वेदाचे । हस्तकल्प जयाचे । ज्योतिष नेत्र तयांचे । निरुक्त कर्ण जाणा ॥ ३०८ ॥ शिक्षा जाण नासिक । व्याकरण वेद मुख । हा बोलिला वेदपुरुष । धड जाणावे श्रुती ॥३०९॥ यजुर्वेद शिर एक अंग । ऋग्वेद तो वामांग । सामवेद तो उजवें अंग । शेष ते अथर्वण ॥ ३१० ॥

**॥ श्रुतिः ॥**

**यजुः शिरो ऋग्वामांगं साम दक्षिणांगं शेषमाथर्वणं ॥**

**॥ प्रकर्ण २४ वें वेदमुर्ति चौर्य ॥**

आणिक एक अवधारी । ब्रम्हया पठण संध्या अवसरी । शंखासुरे नेलिया मूर्ती चारी । वेदपुरुष तें ॥३१२॥

**॥ तथा चोक्तं भागवते ॥**

**वक्ता कर्ताविना नान्यो धर्मस्याच्युतते भुवि ॥**
**सभायामपि वैरिंच्यां यत्र मूर्तिधराः कलाः ॥ १०२**

जरी वेद पुरुष एक । तरी हे बोलिले अनेक । यामाजी साच लटिक । तें सांगावें श्रोतीं ॥ ३१४ ॥

॥ नारायणकल्पे ॥

अथ श्रीमहादेवेन पार्वतीगंगासहितं गौतमं प्रति श्रीन्यायशास्त्रं निरूपितं ॥ १०३ ॥

हंसस्वरूपी भगवान् स्वासिद्ध्यै
मांध्यायमानो यदवोचताब्धौ ॥
पूर्वं मया कल्पितसूत्ररूपं
तन्न्यायशास्त्रं निगदामि तुभ्यं ॥ १०४ ॥

रुद्र जाला ध्यायमान । जें कल्पिलें होतें मन । तें हंस अवतारें केलें निरूपण । न्यायसूत्र रूपीं ॥ ३१७ ॥ तो न्याय रुद्रें गौतमाप्रती । निरोपिला ब्रह्मगिरीसी निगुती । समवेत गंगापार्वती । तिये अवसरी ॥ ३१८ ॥

॥ प्रकर्ण २५ शास्त्रलेखन. ॥

न्याय लेखन गौतमाचें । वेदांत तें व्यासाचें । सांख्य लेखन कपिलाचें । सौगते योग ॥ ३१९ ॥ धर्मशास्त्र जैमिनें । कामशास्त्र वात्स्यायनें । हीं साही पुस्तकें लेखन केली असती ॥ ३२० ॥

॥ प्रकर्ण २६ वें दर्शनेसाध्य भिन्न ॥

ऐसीं हीं साहीं दर्शन । तयाचीं साध्यें भिन्न भिन्न । तें आइका चित्त देऊन । सांगेन आतां ॥ ३२१ ॥

॥ संहितायां ॥

न्यायेच केवली प्राप्तिर्वेदान्ते च विदेहिकी ॥
सांख्ये तु देहिकी योगे प्रोक्तांतःकरणी बुधैः १०५
धर्मे चैंद्रियकी प्रोक्ता कामे वैशेषिकी तथा ॥
साधनं षड्विधे शास्त्रे षड्विधं परिकीर्तितं ॥ १०६ ॥

न्यायें करुनि प्राप्ती केवळ । वेदांत ते विदेह फळ । साख्यें देह निर्मळ । पावती तें ॥ ३२४ ॥ योगें पावती अंतःकरणा तें । धर्मे पावती इंद्रियांतें । कामें करुनि विषयातें । पावते होंती ॥ ३२५ ॥ केवळीं प्राप्ती तो मुनी प्रसिद्ध । विदेहीं प्राप्ती तो श्रीपाद । जटाधारी तया देह साध्य । बोलिलें असें ॥ ३२६ ॥ जंगम साध्य अंतः करणीं । कुंची साध्य तें इंद्रिय गणीं । मुद्री साध्य ते विषयस्थानीं । इयें दर्शन साध्यें ॥ ३२७ ॥ इती श्री सामवेदेषु सूत संहितायां वेद विवेक पूर्वखंडे शास्त्राषट्कलक्षणें नाम चतुर्थाध्यायः ॥ ॥ ॥

येथ न व्हावे अनारिसे । दाखविला साक्षी विशेषे । तो जाणती राजहंसें । न्यायादि सकळ शास्त्रीं ॥ ३।२८ । या ग्रंथ दर्शनाशीं मूळ श्रीदत्त । तेणें दर्शन प्रकाश जग विख्यात । ते आईका सिद्धांत मत । पुरातन ॥ ३२९ ॥

## ॥ प्रकर्ण २७ अवतार पद्धताचार्य कथन ॥

## ॥ नारायणकल्पं ॥

**अहं विसंगीतकात्या? दत्तात्रेयो युगेषु च ॥**
**चतुर्षु गुरुरेतेषां ते चाहं न पृथक्कदा ॥ १०७ ॥**

कृतयुगीं हंसें ब्रह्मयासी । तैसाचि प्रकाशिलें रुद्रासी त्रेतीं रक्तवर्णे सूर्यासी । ज्ञान प्रकाशिले ॥ ३३१ ॥ द्वापारीं श्रीकृष्ण मुचकुंद उद्धवा । कलियुगीं चक्रधरें नागदेवा । आणिकही सिद्धांत बरवा । तो आईका आतां ॥ ३३२ ॥ कृतयुगीं नारायण । बव्हृचासी दिधलें ज्ञान । त्रेतीं नर भगवान । निगदासी दिधलें ॥३३३॥ द्वापारीं ऋषभें रथांतरा । कली महासिद्धें आंगिरा । हा चहूं युगीं

मार्ग निर्धारा । वेदीं बोलिला ॥ ३३४ ॥ इक्ष्वाकु रैल मुचकुंद विदेहगाधि । रघुअंबरी षसगराद्री । नाहुष मांधाता अलर्कादि । दिलीपदेवव्रता ॥ ३३५ ॥

। तथा च द्वितीय स्कंधे ॥

दत्तो यथालर्कमथावधूत–
हंसस्वरूपी सनकादि सूर्ये ॥
ब्रह्माणमीशं च हरिं जगाद
भिक्षुं विदेहं द्विजपिंगलं च ॥१०८॥
इक्ष्वाकुरैलमुचकुंदाविदेहगाधि–
रघ्वंबरीषसगरा गयनाहुषाद्याः ॥
मांधात्रलर्कशतधन्वनुरंतिदेवो
देवव्रतो बलिरमूर्तरयो दिलीपः ॥१०९॥

पुरीरवा लुब्धपाणी । हें बहुत असती ज्ञानीं । आणिक बहुत असती याहुनी । ते सांगेन आईका ॥ ३३८ कृतयुगीं दिधले बत्तिसा । त्रेतायुगीं एकशत आणि साठीसा । द्वापारीं दिधलें अष्टकांकली चार सहस्र ॥ ३३९ परमेश्वर तो मुनी महात्मा । तेणें वेषें क्रिडला परमात्मा हे तेणें चालती केली महिमा । साक्षी वेदोक्त ॥ ३४०

॥ प्रकर्ण २८ वें परमेश्वर वर्णग्रहण ॥

जनकासी पुसे कर भाजन । कवणें काळीं कैसा भगवान । कैसें आभरण कैसा वर्ण । ते सांग आम्हां ॥ ३४१ ॥ चहूं युगीं अवतरत । शुक्ल श्यामरक्तपीत । तैसेंचि गर्ग बोलत । नाम वर्ण ॥ ३४२ ॥

॥ तथा च दशमे गर्गः ॥

**आसन् वर्णास्त्रयो ह्यस्य गृण्हतोऽनु युगं तनूः ॥**
**शुक्लोरक्तस्तथा पीत इदानीं कृष्णतां गतः ॥११०**

आणीक पिङ्गला यदुराव । हे ऋषभाचे ज्ञानीये असतीं नव । हा न मानावा संदेह । बहुता प्रकाशें ॥ ३४४ ॥ ज्ञान मार्ग तो महात्मामुनीश्वर । तयाची ग्वाही शास्त्रीं असे अपार । तो त्रिगुणरहित सार । निर्गुण ज्ञानी ३४५ ॥ हा दर्शन प्रकाश । तेणें भावपद्मा होय विकास । तेथ सारपराग विशेष । घेती मुनी–भ्रमर ॥ ३४६ ना तरी सिद्धांत मुक्त । ते मुनी हंसांचे भक्त । येर टकमका पहात । बक जैसे ॥ ३४७ ॥ हे चतुर्युगींची झडती । श्रोता सांगे निगुती । मग उपजे एक तत्वभक्ती । परमेश्वराची ॥ ३४८ ॥ जो निराकार परमात्मा । तोचि चहूयुगीं होय महात्मा । त्याची सांगतां महिमा । शिणला पृथ्वीधर ॥ ३४९ ॥ बहुता काळाचे ऋषी वेद । परनेणती तया महात्म्याचा भेद । तो ब्रम्हादिका अगाध । तेथें मनुष्यें केउति ॥३५०॥ हंस महात्मा कृतयुगांत । भगवंत महात्मा त्रेतीं वर्तत । द्वापरीं कृष्णमहात्मा सत्य । कळीं पीतवर्ण महात्मा ॥ ३५१ ॥ ऐसे हे महात्मे चाऱ्ही । ह्या भरतखंडाभीतरीं । ते वर्तती कर्मभुमीं महाराष्ट्रीं । युगायुगीं ॥ ३५२ ॥

**॥ प्र० २९ वें चहुयुगीं अवताराचार्य नामकथन ॥**

**॥ नारायणकल्पे ॥**

**हंसानां सुमहात्मनां कृतयुगे शुभ्राश्च मार्गोऽभवत् ।**
**त्रेतायामथ लोहिता भगवतः सद्द्वापरे कृष्णतः ॥**

**पीताश्चैव कलौ युगे प्रतियुगं यावद्युगं वर्तते**
**खंडे भारतसंज्ञके वरमहाराष्ट्रे न देशे क्वचित् ॥**

बहुयुगीं दिधलें ज्ञान । तो अवतार आचार्य सांगेन । तयाचीं नामें रूपें वर्णन । तेही ऐका ॥ ३५४ ॥

**॥ तथा च दशोपनित्त्छ्रुतयः ॥**

**अथ जंबूद्वीपे भरतखण्डे दण्डकारण्ये महाराष्ट्रे कृतयुगमात्रे बव्हृचनामानमाचार्यमधिष्ठाय नारायणेन मुण्डिनं मुनिमार्गं सदा प्रतिष्ठेत् ॥ ततो द्वात्रिंशसदाचार्याः बोभूयेरन् ॥ अतिप्रसंगात्तेषां कथानामभिरलंकृतमस्तु ॥ तन्मार्गमूलाभिमानी दत्तात्रेयो बोभूयेत ॥ एवं नारायणेन श्वेतादिषु षट्सु द्वीपेषु नवमदक्षिणागतखण्डेषु विविक्तदेशेषु मुण्डिमुनिमार्गा विधीयन्ते ॥ ११२ ॥**

जंबुद्वीपीं भरतखंड । तेथें दंडकारण्य महाराष्ट्र प्रचंड । कृतयुगमात्र उदंड । बव्हृच आचार्य ॥ ३५६ ॥ तेथ नारायण अवतार । तेणें मुनिमार्ग सदाचार । प्रतिष्ठिला निरंतर । तयापासुनि बत्तीस ॥ ३५७ ॥ या मार्गाचा अभिमानी । तो दत्तात्रय ये भुवनीं। सदा प्रतिष्ठा करूनी । राहिला असे ॥ ३५८ ॥ हा पंथ सृष्टी आधीं । म्हणोनि बोलिला वेदीं । ते जाणती शास्त्रभेदी । वेद षडांगी ॥ ३५९ ॥

**अथ जंबुद्वीपे भरतखण्डे दण्डकारण्ये महाराष्ट्रे त्रेतायुगमात्रे निगदनामानमाचार्यमधिष्ठाय नरोऽवतारं मुण्डिनं मुनिमार्गं सदा प्रतिष्ठेत् ॥ ततः षष्ठ्याधिकमेकशतमाचार्या बोभूयेरन् ॥ अतिप्रसंगात्तेषां कथानामभिरलंकृतमस्तु ॥ तन्मार्गमूलाभिमानी दत्तात्रेयो**

**वोभूयेत ॥ एवं नरावतारेण श्वेतादिषु षट्सु द्वीपेषु नवमदक्षिणागतखण्डेषु विविक्तदेशेषु मुण्डिमुनिमार्ग-प्रतिष्ठा विधीयते ॥ ११३ ॥**

यानंतर त्रेतायुगीं । नर भगवान अवतरला वेगीं । तेणें निगद प्रतिष्ठिला जगीं । मुनि—मार्ग तो ॥ ३६१ ॥ तेथोनि शत आणि साठीं जाण । तयाचा अभिमान अत्री-नंदन । ऐसें चहूं युगीं केलें उद्धरण । मुनि—मार्ग ॥३६२॥ चहूं युगीं आचार्या । भिन्न नाम असतां तया । पंथ नामें सारिखी अघवया । मुनि मुंडी महात्मा ॥ ३६३ ॥

**अथ जंबुद्वीपे भरतखण्डे दण्डकारण्ये महाराष्ट्रे द्वापारमात्रे रथांतरनामानमाचार्यमधिष्ठाय ऋषभावतारं धृत्वा प्रवरभगवान्मुण्डिनं मुनिमार्ग सदा प्रतिष्ठेत् ॥ ततोष्टशतमाचार्या बोभूयेरन् ॥ अतिप्रसंगात्तेषां कथानामाभिरलंकृतमस्तु ॥ तन्मार्गमूलाभिगानी दत्तात्रेयो बोभूयेत ॥ एवं प्रवरेण श्वेतादिषु षट्सु द्वीपेषु नवमदक्षिणागतखण्डेषु विविक्तदेशेषु मुण्डिमुनि-मार्गप्रतिष्ठा विधीयते ॥ ११४ ॥**

यानंतरें द्वापारीं । जंबुद्वीपा माझारीं । भरतखंड अव-धारी । दंडकारण्य ॥ ३६५ ॥ तेथें आचार्य रथांतर । ऋषभ भगवान अवतार । मुंडी मुनी मार्ग सदाचार । प्रतिष्ठिला तेणें ॥ ३६६ ॥ तयापासूनि अष्टशत । तयांचा अभिमान घे श्रीदत्त । आतां सांगो पुढिल वृत्तांत । कलयुगींचा ॥ ३६७ ॥ हें महात्मदर्शन पुरातन । चहूं युगीं असें जाण । सांगेन आचार्य—चिन्ह । आणि सप्रमाण ॥ ३६८ ॥

सू० अथ जंबुद्वीपे भरतखण्डे दण्डकारण्ये महाराष्ट्रे कलियुगमात्रे चांगिरसनामानमाचार्यमधिष्ठाय महापुरुषसिद्धावतारं धृत्वा प्रशान्तो भगवान् मुण्डिनं मुनिमार्गं सदा प्रतिष्ठेत् ॥ ततः सहस्रचतुष्टयमाचार्या बोभूयेरन् ॥ अतिप्रसंगात्तेषां कथानामभिरलंकृतमस्तु ॥ तन्मार्गमूलाभिमानी दत्तात्रेयो बोभूयेत ॥ एवं प्रशान्तेन श्वेतादिषु षट्सु द्वीपेषु नवमदक्षिणागतखण्डेषु विविक्तदेशेषु मुण्डिमुनिमार्गप्रतिष्ठा विधीयते ॥ ११५ ॥

यानंतर कलयुगाभीतरीं । अंगिराचार्या अवधारी । महापुरुष सिद्ध अवधारी । होता जहाला ॥ ३७० ॥ तेथुनी सहस्रचार्‍ही आचार्या । तयाचा अभिमान दत्तात्रेया । ऐसें जाणे तो नवचे वायां । साक्षी म्हणोनिया ॥ ३७१ ॥ चहू युगिचे ज्ञानीये सांगितले । एक एकापासूनि शतसहस्र जहाले । ऐसे बहुत मोक्ष पावले । मुंडीमुनीश्वर ते॥ ३७२॥ हे असती अगणित । ऐसें मानोतरें ही बहुत । म्हणोनी पावले अनंत । परमेश्वरातें ॥ ३७३ ॥ हे चहूं युगींचे आचार्य अवतार । ते सांगतां साराहूनी सार । येर ते अवघे असार । परमेश्वररहित ॥ ३७४ ॥ मुनिमार्ग चहूं युगीं प्रतिष्ठिला । हा हेतु उभय सृष्टीं बोलिला । तरी कलयुगीं वर दिधला कवणें शर्की ॥ ३७५ ॥ म्हणोनि मार्ग अनादिसिद्ध । परी चहूं युगीं होता ये वरद । तो करिताये अनुवाद । श्रोतयां प्रती ॥ ३७६ ॥

## ।। प्र० ३० चहू युगीं मार्गवरकथन ।।

तर युधिष्ठिर प्रथम शक । विशेष कुलकसंधानिक । तीर्थ निर्धार कळापक । ब्रह्मवत्सर प्रणालिका ।।३७७।। ऐसा चहूं युगीं मुनिमार्ग । तैसाच संन्यास योग । उभयां वर दिधला अभंग । श्रीदत्त–राजें ।। ३७८ ।। म्हणोनी हे दोन्ही गुरु–बंधु । परी हा न कळे कवणा भेदु । येथें नाहीं प्रतिवादु । गुरु एक म्हणोनिया ।। ३७९ ।। परी एका दिधली मान्यता मुक्ती । एका दिधली भुक्ति–मुक्ती एकाचि पासोनि दोन्ही वर्तती । म्हणोनीच बंधू ।। ३८० ।।

" ।। तथा च शंकरपद्धतौ उक्तमास्ति ।। "

गौडपादान्वये जातः शकेंद्रे शालिवाहने ।।
श्रीमद्गोविंदपादोसौ गोविंदाचार्य ईरितः ।। ११६ ।।
तच्छिष्यः शंकराचार्यः पादान्तेन समीरितः ।।
दत्तात्रेयाद्वरं लेभे निजमार्गप्रतिष्ठितं ।। ११७ ।।
स तद्वत्तोटकं प्राह वाक्यं स्वगुरुसंस्तवे ।।
शालिवाहनशके श्रीमान् शंकरो यतिवर्धनः ।। ११८ ।।
अभूवन्निर्जिता भट्टास्तथा प्रभाकरादयः ।।
वेदान्तो येन लोकेस्मिन् वितता हि मनस्विना ।।

युग्मपयोधरसामितशाके
रौद्रकवत्सर ऊर्जकमासे ।।
वासर इज्य उताचलमान
कृष्णतिथौ दिवसे शुभयोगे ।। १२०
शंकरलोकमगान्निजदेहं
हैमगिरौ प्रविहाय हठेन ।।

**शंकरनाममुनिर्यतिवर्यो**
**मस्करिमार्गकरो भगवत्पाद् ॥ १२१**

प्रथम गौडपादाचार्य । तयाचा शिष्य गोविंदाचार्य ! तयाचा शंकराचार्य । तया वरद जालें ॥ ३८७ ॥ तर सन्यास शालिवाहन शक । युग्म कळाप कुशल । रुद्र वत्सर मास ऊर्जक । तर्यी देह त्याजिले ॥ ३८८ ॥ हीमाचळ पर्वती । देह धाडिले हटयोग स्थीतीं । ऐसा अन्वयो शंकर–पद्धती । बोलिला असे ॥ ३८९ ॥

**॥ प्र० ३१ वें शंकराचार्य शिष्य दशनाम ॥**

**शंकरस्यैव चत्वारः शिष्या जाता महाविदा ॥**
**आचार्या दश नाम्ना ते तीर्थादीनां च दंडिनां ॥ १२२॥**
**प्रथमो विश्वरूपश्च तोटकश्च ततः स्मृतः ॥**
**ततश्च हस्तामलकश्चतुर्थः पृथिवीधरः ॥ १२३ ॥**

शंकराचार्यांचे चौघे शीक । प्रथम विश्वरूप दुसरा तोटक । तिसरा हस्तामलक । चौथा पृथ्वीधर ॥३९२॥ तेथोनि तीर्थादी दशनाम । आणि त्रयोदश उत्तम । दोन्ही मार्ग प्रतिष्ठिले परब्रम्ह । श्रीदत्त–राजें ॥ ३९३ ॥ निर्वचनाचें करिती पठण । त्यासी भव नाहीं जाण । आणि न्यायीं बोलिलें भवमोचन । रुद्रें गौतमाप्रती ॥ ३९४ ॥ हें प्रथम सृष्टीकृत्य । अदित्यवार पंचमी तिथ । कृष्ण पक्ष प्रभव सत्य । तैं सर्वा संस्कृत ॥ ३९५ ॥ अंशाचें कृत्य तें संस्कृत । परमेश्वर माया बोलिजत । हा रचना–अन्वय जाणत । ब्रम्हविद ते ॥ ३९६ ॥ तमादी अध्यासु होता । तें संस्कृत कार्य समस्ता । देशोदेशीं ऋषी कृता । अन्यकी भाषा ॥ ३९७ ॥

॥ प्र० ३२वें पंचकृष्ण जन्म तिथीवार ॥

सृष्टी आधीं पंचही अवतार । तैं कृतयुग संवत्सर । सांगेन मास तिथवार । जन्मकाळ ॥ ४९८ ॥

॥ " नारायण–कल्पे " ॥

युगे युगे खण्डमलं करोति
मार्गं महान्तं परमेश्वरासौ ॥
ॐभूर्भुवः स्वः सवितुर्वरेण्यं
यावत्स तावन्निजपंचरूपैः ॥ १२४ ॥

कल्पादौ मृत्युलोके स्वपुरिकृतयुगे गांगतीरे बदर्यां
पंचम्यां कृष्णपक्षे प्रभवरविदिने माधवे चाश्विनीभे ॥
प्रातर्जातोथ मूर्तिर्जनिरथ जनिता धर्म एवर्षिराख्या
स्यात्कल्पं दिव्यपिंगं तनुमुनिनटधृत्सच्चिदानंददेवः ॥

पिंगवर्ण धार्य नाम । आदित्यवार पंचमी उत्तम । हा अवतार प्रथम । होता जाला ॥ ४०१ ॥

कल्पादौ मृत्युलोके स्वपुरि कृतयुगे गांगतीरे बदर्यां
षष्ठम्यां कृष्णपक्षे प्रभवशशिदिने ज्येष्ठमासे भरण्यां
माध्यान्हेभूत्समूर्तिर्जनिरथ जनकः
कृष्णनारायणाख्यः
स्यात्कल्पं दिव्यशुभ्रं तनुमुनिनटधृत्सचिदानंददेवः ॥

नारायण शुभ्रवर्ण । षष्ठी आणि शशिदिन । ही अवताराची खुण । ओळखिजे ॥ ४०३ ॥

कल्पादौ मर्त्यलोके स्वपुरि कृतयुगे गांगतीरे बदर्यां
सप्तम्यां कृष्णपक्षे प्रभवशुभदिने यः शुचौ कृत्तिकायाम्
मातात्रेताशशायां जनक उत कृतः श्रीप्रद्युम्ननराख्यः
स्यात्कल्पं दिव्यरक्तं तनुमुनिनटधृत्सच्चिदानंददेवः

तिसरा श्रीप्रभू नर रक्तवर्ण । शुभवार सप्तमी जाण ।
हें अवताराचें लक्षण । बोलिलें असे ॥ ४०५ ॥

**कल्पादौ मृत्युलोके स्वपुरि कृतयुगे गांगतीरे बदर्या-**
**मष्टम्यां कृष्णपक्षे प्रभवबुधदिने श्रावणे रोहिणीभे ॥**
**माता शान्तिर्निशीथे जननिमितपिता द्वापरो वासुदेवः**
**स्यात्कल्पं दिव्यकृष्णं तनुमुनिनटधृत्सच्चिदानंददेवः**

वासुदेव कृष्णवर्ण । अष्टमी आणि बुध दिन । हे
मुनि नटाची खुण । असे पांचांही ॥ ४०७ ॥

**कल्पादौ मृत्युलोके स्वपुरिकृतयुगे गांगतीरे बदर्यां**
**पक्षे कृष्णे नवम्यां प्रभवगुरुदिने भे मृगे मानभंस्ये ॥**
**काले सारस्वतेऽभूत्कलिरथ जनको मोक्षमासिद्ध-**
**माख्या**
**स्यात्कल्पं दिव्यपीतं तनुमुनिनटधृत्सच्चिदानंददेवः ॥**

सिद्ध नाम वर्ण पीत । तीथ नवमी वार बृहस्पत ।
सच्चिदानंददेव ह्मणत । पांचांही अवतारा ॥ ४०९
पिंग शुभ्र रक्त कृष्ण । पीत ऐसे पांचही दिव्य वर्ण ।
तयातें म्हणिजे पंच कृष्ण । ते जाले सृष्टी आदि ॥४१०॥
तया पांचांसी मुनीचा नट । तो बोलिला असे प्रगट ।
हे साक्षी असें स्पष्ट । नारायण--कल्पीं ॥ ४११ ॥

**॥ प्र० ३३ पंचकृष्णनामकां ? ॥**

**पक्षे कृष्णे प्रजातः किल खलु भगवान् पंचधा**
**पंचवर्णः**
**तस्मात्तं पंचकृष्णं श्रुतय उदयिता योगपद्यैक-**
**कालात् ॥**

**सोयं पन्था महात्मा भवशरधितरो ब्रह्म नाहं**
**वितस्ते**
**नेतीति ब्रह्मविच्च प्रतिपदविभवं पुण्यकृन्मोक्षयोगः ॥**

तया पांचा मिळूनि एक नांव । तें बोलिलें अति सुहाव। कृष्ण पक्षीं अवतरला देव । म्हणोनि पंच कृष्णा ॥४१३॥ तो हा पंथ महात्मा बोलिजे । भवशरितेपासून तरीजे । ब्रम्हारत पुण्य योग म्हणिजे । मोक्षा लागीं ॥ ४१४ ॥

**कल्पारंभे पंचकृष्णं वदन्ति**
**नित्यं सर्वे सर्वदा ब्रह्ममार्गे ॥**
**तस्मिन् पिंगं शुक्लरक्तं च नीलं**
**वर्णैरेतैरास जांबूनदं च ॥ १३१ ॥**

" **तथोक्तं भगवता ऋग्निगमे** " **यन्नामकृतिभिर्ग्राह्यं पंचवर्णमबाधितं ॥**

ऋगनिगमाचे ठायीं । पंच नामें पंच आकृति पाही । धरिता जाला वर्ण पंच ही । परमेश्वर तो ॥ ४१६ ॥

**बिभ्राणः परमेश्वरो हि युगपत्मूर्तेर्धरं पंचकं**
**कुर्वन् सेवकसेव्यभावमतुलं विस्मापनं तद्विदां ॥**
**श्रीदत्ताच्च महागुरोर्भगवतो विद्यां निजां लेभिरे**
**शुक्लोरक्त उतासितोऽमलतरां पीतो महापूरुषः १३२**

धरिता जाला परमेश्वर । युगरूपें पांचही अवतार । करिता जाला सेवा चार । ते सेवा अतुल्य ॥ ४१८ ॥ तो श्रीदत्त महागुरू । चतुर्वर्ण चार अवतारू । महापुरूष निर्धारू । पीत जाणावा ॥ ४१९ ॥ हे चहूयुगीं विचारत । जीवा ज्ञानप्रेम देत । तयाची आईका ख्यात । सांगेन आतां ॥ ४२० ॥

॥ प्र० ३४ पंचकृष्णवेषनाम ।

नारायणकल्पे ॥

कृत युगे शुभ्रतनुं चतुर्भुजं
जटाधरं वल्कलवाससं विदुः ।
कृष्णाजिनाक्षामलकोपवीतः
कमण्डलुं दण्डमुनासिं बिभ्रत् ॥ १३३ ॥
सुपर्ण नारायणचक्रपाणि
तुर्याभिधाख्यापित एव धर्मः ॥

कृते शुभ्रवर्ण चतुर्भुजा । दंडकमंडलु योगीराजा । धरिता जाला काजा । चतुर्नामें ॥ ४२२ सुपर्ण नारायण नाम । चक्रपाणी आणि पिताधर्म्य । हीं धरिता जाला नाम । चतुर्विधें ॥ ४२३ ॥

त्रेतायुगे रक्ततनुं चतुर्भुजं
हिरण्यकेशं च विदुस्त्रिमेखलं।
त्रयात्मत्वात् सृकसृविकादिलक्षणम्
ॐतत्सदानंदकरो महात्मा ॥ १३४ ॥
नरो जयन्तः प्रभुपृश्निगर्भो
वृषाकपिश्चायमयक्रमश्च ।
उक्ता मुनीन्द्रैरुरुगाय ईड्यैः
स सप्ताभिर्नामभिरिज्यरूपैः ॥ १३५ ॥

त्रेतीं चतुर्भुजा रक्तवर्ण । आणि सप्तनामें धरण । तें आईका चित्त देऊन । सांनेन आतां ॥४२६॥ सदानंद आणि नर । जयंत आणि मुनेंद्र । महात्मा आणि मुरार । प्रभु हें सातवें ॥ ४२७ ॥

तं द्वापरे श्यामतनुं चतुर्भुजं
पीतांबरं कौस्तुभमालयायुतं ।
निजायुधैः शंखमुखैः समाकुलं
श्रीवत्सलक्ष्मादिभिरूर्जितं विदुः ॥१३६॥
श्रीकृष्ण संकर्षण वासुदेव
प्रद्युम्न गोपाल उतानिरुद्धाः ॥
आख्याभिरिज्या ऋषभं वदंति
तं सप्तभिर्योगवरामुनीन्द्राः ॥ १३७ ॥

द्वापारीं श्यामचतुर्भुज । धरिता जाला कृष्णराज । तयाचीं सप्तनामें सहज । अवधारिजे ॥ ४३०॥ श्रीकृष्ण आणि संकर्षण । वासुदेव आणि प्रद्युम्न । गोपाळ आणि अनुरुद्ध जाण । सातवें ऋषभ ॥ ४३१ ॥

कलौ युगे पीततनुं चतुर्भुजं
संहारमुद्राहरितांबरं विदुः ॥
हंसा हरिच्छत्रमनंतशक्तिभि-
र्भक्तैर्निजैः सेवितपादपंकजं ॥ १३८ ॥

सिद्धो महापूरुषएवमुक्तः
स्त्रीभिर्बुधैश्चक्रधराभिधानैः ॥
येषां चतुर्णां भगवत्तमाना-
मेतानि नामानि विशेषितानि ॥ १३९ ॥

कलौ चतुर्भुजीं पीतवर्णा । आणि समस्त भक्तिजना । धरिता जाला नामना । ते परियेसा ॥ ४३४ ॥ महां-पुरुष आणि सिद्ध । चक्रधर हे त्रिविध । हीं नामें बोलिलीं प्रसिद्ध । वेदहस्तीं ? ॥ ४३५ ॥

चत्वार एते भगवत्तमाश्च
युगे युगे मार्गमुदीरयंति ॥
यदृच्छयोपेतजनं सुसज्जनं
दीक्षातिरिक्तं मुनिराजराजं ॥ १४० ॥
॥ ईतीकल्पे ॥

हे अवतार बोलिले षडांगवेदीं । भविष्यपुराणीं नगर प्रसिद्धी । ग्रामनदी विवेकसिद्धी । बोलिले मराठियेसीं ।४३७।

॥ श्लोक भविष्यपुराणांतील ॥

शाके बाणपयोब्धिपर्वतमिते प्राप्ते तु यौधिष्ठिरे
वष श्रीप्रभवे निशाकरदिने मासे च मार्गाभिधे ॥
सप्तम्यां बहुले तिथौ हि भगवान् गच्छेत्प्रशान्तःकलौ
त्यक्त्वाश्रीबदरीवनं तु नगरं श्रीमत्फलस्थाभिधम् ॥

हे चारी अवतार भगवंत । युगीं युगीं मार्ग प्रगटत । आपुले इच्छें सुचना देत । अतीत दिक्षा ॥ ४३९ ॥ हे मुनीराज ह्मणावे सहज । ते परमेश्वर आज्ञेचें तेज । ते जाणावें आनंदाचे भोज । ऐसे असती विवेकसिंधु ४४० तीथे वेणुगंगेचे तीरीं । मनोहर अंबापुर नगरीं । तेथें प्रगटले श्रीहरी । जगविख्यात ॥ ४४१ ॥ आणि तेणें माध्यंदिनशाखे । अवतीर्ण केले परमपुरुखें । चांपेगौर तेणें वेखें । मनोहारें ॥ ४४२ ॥ श्रीवत्सपद लपविलें । चतुर्भुज आच्छादिलें । कळयुगीं अवतरण केलें । ह्मणोनियां ॥ ४४३ ॥

" तथा च दशोपनिषत्मुख्य " ३।२।३
यदा पश्यः पश्यते पिंगवर्णं
दत्तात्रेयं स्वामिनं ब्रह्मयोनिं ।

तदा विद्वान् पुण्यपापे विधूय
निरंजनः परमसाम्यमुपैति ॥ १४२ ॥
यदा पश्यःपश्यते शुभ्रवर्णं
नारायणं चक्रिणं ब्रह्मयोनिं ।
तदा विद्वान् पुण्यपापे विधूय
निरंजनः परमसाम्यमुपैति ॥ १४३
यदापश्यः पश्यते रक्तवर्णं
नरं कर्तारं श्रीप्रभुं ब्रह्मयोनिं ।
तदा विद्वान पुण्यपापे विधूय
निरंजनः परमसाम्यमुपैति ॥ १४४ ॥
यदा पश्यः पश्यते कृष्णवर्णं
श्रीवासुदेवं स्वामिनं ब्रह्मयोनिं ।
तदा विद्वान् पुण्यपापे विधूय
निरंजनः परमसाम्यमुपैति ॥ १४५ ॥
यदा पश्यः पश्यते रुक्मवर्णं
कर्तारमीशं पुरुषं ब्रह्मयोनिम् ।
तदा विद्वान् पुण्यपापे विधूय
निरञ्जनः परमसाम्यमुपैति ॥१४६॥ मु०३।२।३

॥ प्र० ३५ दर्शन प्रकाशग्रंथनाम ॥

हे अवतार दर्शन प्रकाश । तो अवघा सांगेन विशेष म्हणोनि ग्रंथ दर्शन प्रकाश । नांव ठेविलें ॥ ४४९ ॥ आणि षड्‍ दर्शनातें प्रकाशिजे । तयातें दर्शन प्रकाश म्हणजे । प्रकाशीं यथावत् देखिजे । म्हणोनि ग्रंथा नांव ॥ ४५० हें जाण चहूं युगीं निर्धारे । दर्शन प्रकाश तो केला परमेश्वरें । बव्हृच निगद रथांतरे । अंगिरा प्रका-

शले ॥ ५५१ ॥ अनंत युगीं त्रिकाळ प्रकाशे । गत भविष्य वर्तमानीं दिसे । म्हणोन दर्शन प्रकाश ऐसें । नांव ठेविलें ॥४५२॥ याची सृष्टी आदि असे । संहारी अंत दिसे । सकळातें प्रकाशें । म्हणोन ग्रंथानाव ॥ ४५३ ॥ परमेश्वर प्रकाश दर्शन । जीवासि होय ज्ञान । म्हणोनि ग्रंथीं जालीं नामन । दर्शन प्रकाश ॥ ४५४ ॥ दर्शन प्रकाशा कारणे । महाऋषि गुरू केले आपण । धांडोळीलीं अन्यकें दर्शन । सकळलोकीं ॥ ४५५ ॥ एका दर्शनें एकचि मत जाणत । परी आणिका दर्शनाचें नावें नेणत । ऐसीं सकळ मतें जेथें असत । तो दर्शन प्रकाश थोर ॥ ४५६ ॥ या इतुक्या मता सहीत । जेथें परमेश्वर मत असत । तो दर्शन प्रकाश जग विख्यात । ऐकावा श्रोतीं ॥ ४५७ ॥ अनंता युगींचा दर्शन प्रकाश । तो चहूं युगींचा विशेष केतुक्याचा एकवेळ प्रकाश । होता ये सकळां ॥ ४५८ ॥ हा दर्शन प्रकाश जुना । जो चहुंयुगीं ओळखिला खुणा । ब्रह्मा विवस्वत अर्जुना । दर्शन प्रकाश ॥ ४५९ ॥

॥ प्र० ३६ वें अर्जुन विश्वरूपः दर्शण ॥

"गीतासु"

दिवि सूर्यसहस्रस्य भवेद्युगपदुत्थिता ॥
यदि भाः सदृशी सा स्याद्भासस्तस्य महात्मनः ॥

दिव्य सुर्य सहस्रासे । दिव्य युगळ असम साहासे । ऐसे एकसरा दिसे । दिव्यस्वरूप ॥ ४६१ ॥

द्यावापृथिव्योरिदमंतरं हि
व्याप्तं त्वयैकेन दिशश्च सर्वाः ॥

दृष्ट्वाद्भुतं रूपमुग्रं तवेदं
लोकत्रयं प्रव्यथितं महात्मन् ॥ १४८ ॥

देवा स्वर्ग पृथ्वी दिशा अंतराळी आघवी । त्वां व्यापिली स्वभावीं । माया स्वरूप जीवीं । सकलिक ॥४६३॥ अद्भुत तेज देखिलें । उग्र ऐसें जाणितलें । लोकत्रयें वाखाणिलें । स्वरूप तुझें ॥४६४॥ ऐसी शक्ति विश्वरूपा दाखवुनि । उगाचि राहिला श्रीचक्रपाणी । मग स्तुती करूं लागला देखुनि अर्जुन । परमेश्वराची ॥ ४६५ ॥

॥ संजय उवाच ॥

इत्यर्जुनं वासुदेवस्तथोक्त्वा
स्वकं रूपं दर्शयामास भूयः ॥
आश्वासयामास च भीतमेनं
भूत्वा पुनः सौम्यवपुर्महात्मा ॥ १४९ ॥

संजय बोले धृतराष्ट्रा प्रती । ऐसी देवा भक्ता उभय प्रिती । मग पूर्व दाखविता जाला मुर्ती । श्री कृष्णरूप ॥ ४६७ ॥ मग स्वयंभू रूप धरोनि जगन्नाथें । संबोखिलें पार्थातें । मग अर्जुन स्ताविता जाहाला देवातें । कर जोडुनी ॥ ४६८ ॥ तया महात्म्या पासुनी रचना । सप्त ऋषी चौदा मनु गणना । तेणें जालें सकळजण । परियसापां ॥ ४६९ ॥

महर्षयः सप्त पुर्वे चत्वारो मनवा स्तथा ।
मद्भावा मानसा जाता येषां लोक इमा प्रजा ॥५०॥
गीता

प्र० ३७ महात्मा शब्दः परमेश्वरे. ॥

महात्मा म्हणजे परमेश्वरातें । आणि तयाचिया ज्ञानि-

यातें । परी जें प्रकरण जयाचें जेथें । तेथ तो जाणावा ॥ ४७० ॥

तो महात्मा सकळाचा पिता । तयाची जे सुबुद्धि करीती वार्ता । तयासी पंडु पौत्र सुता । सारखें होईल ॥ ४७१ ॥ देह परत्वें पिता भिन्न । परी निजपिता तो एकचि जाण । तयाची नेण ती खूण । अज्ञान ते ॥४७२॥ तयाचा पंथ हा प्रसिद्ध । जयासी साक्षी असें वेद । ज्ञान आचार वृत्ति भेद । साक्षी प्रमाणें ॥ ४७३ ॥

जैसें मागिलें युगीं ज्ञान । तैसेंचि कलियुगीं जाण । यासी वेदगीता प्रमाण । बोलिली असे ॥ ४७४ ॥

**॥ "तथा च श्रुतिर्बृहदारण्यके" ॥**

**सर्वस्यात्मा सर्वस्य वशी सर्वस्येशानः सर्वस्याधिपतिः। सर्वमिदं प्रशास्ति विना सर्वस्य ज्ञानमनुयुगं दधाति ॥**

**॥ "तथा च गीतायां" ॥**

**परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृतां ॥**
**धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ॥ १५१ ॥**

करावया रक्षण साधूचें । विनाश अधोगतीचें । धर्म संस्थापन करी साचें । युगायुगीं ॥ ४७७ ॥ तारावया साधू जना । नाशावया दुष्ट दुर्जना । या धर्माची संस्थापना । करावया ॥ ४७८ ॥ ऐसें ज्ञान उपदेशिलियावरी। जया संन्यास उपजे अंतरीं । म्हणोनि उभयतां त्याग करी। अंतर बाह्य ॥ ४७९ ॥

**॥ प्र० ३८ वें. संन्यास लक्षण ॥**

येथें नाहीं चतुराश्रम । जे वेळीं उपजे विराम । ते वेळीं तेजि गृहाश्रम । योगिया होय ॥ ४८० ॥

॥ " तथा च ब्रह्मविद्योपनिषच्छ्रुतिः ब्राह्मणग्रंथे " ॥

संन्यस्य ब्रह्मानंदावाप्तिकामः
यदहरेव विरजेत्तदहरेव प्रव्रजेत् ॥
यदि इतरथा ब्रह्मचर्यादिरेव प्रव्रजेत् ॥ १५२ ॥

॥ " तथा च विज्ञानेश्वरे " ॥

राज्ञी प्रव्रजिता धात्री साध्वी वर्णोत्तमा च या ॥
आसामेकतमांगच्छेद्गुरुतल्पग उच्यते ॥ १५३ ॥

प्रव्रजिता म्हणजे तपस्वीनी । गार्गी मादालसा कात्यायनी । मैत्रेयि देवहूति आदि करूनि योगिनी । होती मोक्षा कारणें ॥ ४८३ ॥ वेदीं अवर्ण त्याग ह्मणितला । तो स्त्रियांसीं असे बोलिला । म्हणोनि उभयतां विहिला । संन्यास मार्ग ॥ ४८४ ॥ धाकुट्या अधिकार रहिता । साधुयोग जोडे अवचिता । ते जाणावी सफलता । पूर्व दोहींची ॥ ४८५ ॥

॥ " तथाच गीतायां " ॥

तत्र तं बुद्धिसंयोगं लभते पौर्वदेहिकं ।
यतते च ततो भूयः संसिद्धौ कुरुनन्दन ॥१५४॥

॥ " तथाच ब्रह्मविद्योपनिषच्छ्रुतिः " ॥

वध्वर्भकप्रवयसजडमूकांध बधिराद्या निः—।
श्रेयसाय प्रव्रज्यमंगी कुर्वन्ति ॥ १५५ ॥

वधू बालक वृद्ध । जड मूका बधीर अंध । यासी निश्रेय ससाध्य । होताये सकळा तात्काळ ॥ ४८८ ॥ स्त्रिवैश्य शूद्र जाती । जे परमेश्वरा तें आश्रायती । ते परम गती पावती । संशय नाहीं ॥ ४८९ ॥ ऐसें असे गीतार्थीं ।

आणि बोलिलें वेदमतीं । ह्मणोनि स्त्रिया योग घेती । गतभावेंर्थी ॥ ४९० ॥ जे परमेश्वरातें जाणती । ते वेद माये पासाव तरती । स्त्री हुनी ( हिन ) शूद्र सर्व जाती । आदि करुनी ॥ ४९१ ॥

"तथाच गीतायां"

अपि चेत्सुदुराचारो भजते मामनन्यभाक् ।
साधुरेव स मन्तव्यः सम्यग्व्यवसितो हि सः ॥१५६॥
क्षिप्रं भवति धर्मात्मा शश्वच्छान्तिं निगच्छति ।
कौन्तेय प्रतिजानीहि न मे भक्तः प्रणश्यति ॥१५७॥

"इति भगवतोक्तवचनात्"

॥ प्र० ३९ शिखासूत्र वर्ण त्याग ॥

परी दीक्षा चहूं वर्णीं जाणा । ब्राह्मणा शूद्रा क्षौर स्मृति भिन्ना । शूद्रासी सूत्राचा त्याग ना । ब्राह्मणासि असें ॥ ४९४ ॥

"तथाच ब्रह्मविद्योपनिषच्छ्रुतिः भी० चा० कृ०"

सशिखं वपनं कृत्वा बहिःसूत्रं त्यजेद्बुधः ॥
यदक्षरं परं ब्रह्म तत्सूत्रमिति धारयेत् ॥ १५८ ॥
वर्णावर्ण लभे त्यागं ब्रह्मचर्ये न वर्तते ॥
विधाय वपनं सर्वं त्रयो देवा उदासते ॥ १५९ ॥

शिखादि वपन सूत त्याग । परब्रह्म सूत्र धरिलें अभंग । आणि आचार सूत्र त्याग । सूत्र परं पद ॥ ४९७ ॥

॥ प्र० ४० महात्मलक्षण ॥

महात्मा कैसा जाणिजे । आचार चिन्ह मार्ग ओळखिजे । तोभेस मार्ग पाहिजे । वेदशास्त्रीं ॥ ४९८ ॥ तो

महात्मा द्वादश लक्षणी । तिये लक्षणें असती वेदप्रमाणीं । ऐसें जाणें तोचि ज्ञानी । येर बोलिजे अज्ञान ॥ ४९९ ॥ तें लक्षणें सांगेन आतां । जेणें ओळखिजे ज्ञान पंथा । निवर्ते संसार व्यथा । जन्म मरणाची ॥ ५०० ॥ तो महात्मा हिंसा रहित । आणि अहार विहारयुक्त । जैसा ईश्वर कर्मीं नव्हे लिप्त । तैसा तोही जाणिजे ॥ ५०१ ॥ तो दैवी प्रकृति निर्गुण । महात्मा मुनि हे नामन । थिगळी कंथा प्रावर्ण । भिक्षा चहूं वर्णीं करी ॥ ५०२ ॥ तो शिखादि सूत्र त्यागी । ऊर्ध्वमूल दंडहस्त योगी । ईश्वर भक्ती न भंगी । अव्यभिचार तो ॥ ५०३ ॥ निरपेक्ष शांत निर्वैर । ब्रह्मचर्य वर्तन सदाचार । ऐसे गुण असती अपार । परी ओळख द्वादश लक्षणीं ॥ ५०४ ॥

॥ प्र० ४१ वें क्षौरकर्म धर्मार्थं पापसंक्षये ॥
" तथा च श्रुतिः "

**वपनस्पर्शनं कुर्यादिति परिशिष्टाच पक्षमेकं च द्वयम् इति श्रुतिः प्रवक्ष्यामि ***

**दक्षिणं कर्णमारभ्य धर्मार्थं पापसंक्षये ॥**
**हन्वाद्यन्तं च संस्कारः शिखाद्यन्तं शिरो वपेत्** १६०

क्षौरकां किती दिवस । कवणी कडूनि हा निर्देश । क्षौर केलेया काय होय विशेष ॥ तो जाणावा श्रोतीं ॥ ५०६ ॥ पातकी याचें स्पर्शने । म्हणोनि क्षौर करणें । मास अथवा पक्ष दिनें । क्षौर दक्षणे कर्णीं ॥ ५०७ ॥ उजव्या कर्णाकडूनि क्षौर । आधीं शिखा भाद्रिता शीर । हा धर्मार्थ निरंतर । पापा क्षय होय ॥ ५०८ ॥

॥ प्र० ४२ वेदी दोन मार्ग ॥

दोन मार्ग बोलिले वेदीं । एक प्रवर्तले कर्म शुद्धी । ज्ञानमार्ग धरिला बुद्धी । जाणू निया ॥ ५०९ ॥ कर्ममार्गीं चतुराश्रम । ज्ञान मार्गीं नाहीं अनुक्रम । दोहीं मार्गांचा कर्म नेम । भिन्न असे ॥ ५१० ॥

नदीतीरे गवां गोष्ठे क्षेत्रमध्ये चतुष्पथे ।
धर्मस्थाने सभास्थाने मलमूत्रं न कारयेत् ॥१६१॥

" तथा पाठांतर "

नदीतीरे गवांगोष्ठे मार्गक्षेत्राशिवालये ॥
वृक्षमूलश्मशानंच मलमूत्रं न कारयेत् ॥ १६२ ॥
संध्यासूदङ्मुखंवाऽप्यहरथ निशि वा दक्षिणायां दिशायां ।
कुर्यान्मूत्रादिशौचं बहिरथ सलिलादेकलिंगे मृत्तिका ।
पंचापानेथ हस्ते दशपुनरुभयोः सत्पचै ( मे ) तद्गृहस्थे ।
द्वैगुण्याद्धक्रमोयं व्रातियतिपतिनां स्यात्तदर्धं निशायां ॥ १६३ ॥

शौच षड्दश सप्त । याचे द्विगुण करिती निष्वृत । कर्मीं लिप्त समस्त । कर्म मार्गींचे ॥ ५१४ ॥ ज्ञानी आळक सप्तबांधव । सूतादि मुचकुंद शुकदेव । ऐसें बहुत आणि यदुराव । ज्ञान मार्गींचे ॥ ५१५ ॥

" तथा च ब्रह्मविद्योपनिषत्सु "

शौचमाचमनं स्नानं नतु चोदनयाऽऽचरेत् ।
अन्यांश्च नियमान् ज्ञानी यथाहं लीलयेश्वरः ॥१६४॥

शौच स्नान अंचवण । कर्मा सारिखे न करी आचरण। ज्ञानिया तो तियेच काळीं जाण । शौचादिक करी ॥ ५१७ ॥ शौच अंचवण स्नान । याचि शंका न धरी मन। ये अर्थी जैसें करण । लीळा ईश्वराची ॥ ५१८ ॥ ऐसा करुनि त्याग । देव अथवा गुरुभक्ती अभंग । ऐसा प्रकाशिला सांग । तो महात्मा म्हणिजे ॥ ५१९ ॥

" ब्रह्मविद्योपनिषादि "

श्वेताश्वतरोपनिषद् ६।२३

यस्य देवे परा भक्ति यथा देवे तथा गुरौ ।
तस्यैते कथिता ह्यर्थाः प्रकाशन्ते महात्मनः ॥१६५

॥ प्र० ४३ आत्मा अनात्मा भेद ॥

ब्रह्म नव्हे जिवात्मा । प्रपंच ठाईचा अनात्मा । ऐसे जो जाणे तो पात्रे उत्तमा । मोक्षपदातें ॥ ५२१ ॥

" विवेक सिंधु "

जें जें वस्तु अनात्मा । तें तें जाणावी महात्मा । तर स्वयंप्रकाश परमात्मा । स्वयं भेटे ॥ ५२२ ॥ नित्य तो परमात्मा । अनित्य प्रपंच अनात्मा । हा ही विवेक जाणावा महात्मा । वेदांतशास्त्रीं ॥ ५२३ ॥

॥ प्रक० ४४ विष्णु ४ वर्णन ॥

" तत्वादि मत "

आतां सांगेन तत्वादिमत । जे एकतत्वीं विष्णु भक्त । ते उपदेशीं चारी विष्णु बोलत । प्रसिद्ध शब्दें ॥ ५२४

" तत्वादि "

विष्णुर्विष्णुः पुरा विष्णु पुराणं पुरुषोत्तमं ।
माया विमोहितं साक्षात् विश्वेशः परमात्मने ॥१६६॥

प्रथम जाणावा वयकुंठीं । दुसरा क्षिराब्धीं जगजेठी । तिसरा तत्पुरुष अव्यक्त दृष्टीं । दीर्घ मूर्ति तयाची ॥ ५२६ ॥ चौथा परमात्मा परमेश्वरु । जो सृष्टीं आदिं जगद्गुरु । तो भगवान् विष्णु परमेश्वरु । भागवतीं बोलिला ॥ ५२७ ॥

॥ " तथाचदशमे मुचकुंदं प्रति देवउवाच " ॥

वरं वृणीष्व भद्रं ते ऋते कैवल्यमदन ।
एक एवेश्वरस्तस्य भगवान् विष्णुरव्ययः ॥१६७

ज्ञान ध्यान सो महात्मा । शांतो दांता सो आत्मा । यस्या सौ महात्मा । वित्त पुत्रादि सर्व तुछ ॥ ५२९ ॥ सोऽधिकारी महात्मा । महंतस्य आत्मा । यस्य सौ महात्मा । म्हणिजे त्यातें ॥ ५३० ॥

॥ प्र० ४५ वें चातुर्वर्णी भिक्षा मद्य मांस वार्जित ॥

ऐसा जो महात्म । तो सांगतां निरोपम । चातुवर्णीं भिक्षा नेम । हिंसा रहित ॥ ५३१ ॥

॥ तथाच ब्रह्मविद्योपनिषच्छ्रुतिः ॥

भिक्षां चतुर्षु वर्णेषु विगर्हां वर्जयंश्चरेत् ॥
चातुर्वर्ण्यं चरेद्भैक्ष्यम् मद्यमांसविवार्जितं ॥ १६८ ॥

तो यथा काळीं दिवसां । नगरांत प्रवेशे सहसा । तो त्यजूनि सर्वदोषा । भिक्षा चहूं वर्णीं करी ॥ ५३३ ॥

॥ प्र० ४६ वें प्रावरण जीर्ण वेशग्राहेकज्जलचीरादी॥

पथाचें ठाईं जिर्ण । अथवा जनासीं याचन । तें करी प्रावरण । महात्मा तो ॥ ५३४ ॥

॥ " ब्रह्मविद्योपनिषदि " ॥

पथि दृष्टानि चैलानि जीर्णान्यंगी करोतिसः ॥

**देहाच्छादनमात्रंच कुर्यात्प्रावरणं मुनिः ॥ १६९ ॥**

ऐका महात्म चिंन्ह । दंडकमंडलु अभरग । मुंडित वस्त्रारूखारूवर्ण । करीं माळा ॥ ५३६ ॥

॥ " नारद गीतायां " ॥

**यथा शरीरं तैलेन यथा भूमिर्जलेन वै ॥**
**यथा वर्खो वस्त्रं कज्जलेन शुद्धध्यति ॥ १७० ॥**
**महादोषहरंचैत देवं ( द्वाणी ) वदति माधवः ॥ ३**

जैसें तैलें करुनि शुद्ध अंग । जळें करुनि शुद्ध भूमीयोग । काजळें शुद्ध वर्ख वस्त्र रंग । तें प्रावरण करी ॥ ५३८ ॥ तेणें महा दोष हरत । सकळ पापें नाशत । ऐसें माधव असें बोलत । नारद म्हणें ॥ ५३९ ॥ जे महदाचार्ये गुरु । तयासी होय पूजा पुरस्कारू । तेणें श्वेत पिताम्बरू । अलोहीतें ॥ ५४० ॥ कां निद्रास्थान अथवावस्त्र । जैसे प्राप्त तैसा अंगिकार । जनाशीं याचे अन्न अंबर । देह चालावया ॥ ५४१ ॥

" ब्रह्म विद्योपनिषच्छ्रुतिः "

**यथा वासस्तथा शय्या प्राप्तंप्राप्तं भजेन्मुनिः ॥**
**शय्यावासोन्धसा लोके देह निरवाह मारभेत् ॥ १७१**

जन कार्याविराहित । पथीं जीर्ण वस्त्र देखत । तेणें देह आच्छादन करीत । मुनीश्वर तो ॥ ५४३ ॥

॥ प्र० ४७ वें मपीत प्रावरण ॥

तो प्रावरण मपीत करीं । तया नाव त्रिपुटी एक पदरी । विहिती सप्तदश अवधारी । रुंदी लांबी ऐसी ॥ ५४४ ॥

तथा कंथा दोपदरी । लांबी रुंदी तयाची परी । ऐसा भेस ( वेश ) अवधारी । ख्याति मंत ॥ ५४५ ॥

॥ "धर्म शास्त्रे नारदः" ॥

ऱ्हस्वा शय्या सप्तवितस्ति कार्या ।
वितस्तिदीर्घा त्रिपुटी तथावा ॥
दशैव कार्या त्रय पल्लवीच ।
सा सप्तकंथेति भिरेव वाणैः ? ॥ १७२ ॥

निद्रास्थान अथवा वस्त्र । जैसें प्राप्त तैसा अंगिकार । हें आचरे मुनीश्वर । आणि दशनामी ॥५४७॥ धड वस्त्र प्राप्त जालिया । कैसा रंग द्यावा तया । दोष नाहीं रंगा जया । तो अग्नि भस्म ॥ ५४८ ॥

॥ प्र० ४७ शुक्ल श्याम विभुती द्वौ ॥

अग्नि मुखीं दहनें शुद्ध जालीं । शुक्लश्याम निफन्नलीं । तीं दोहीं दर्शनें अंगिकारिलीं । दशनामी आणि त्रयोदशे ॥ ५४९ ॥ दशनामी लाविलीं कलेवरी । त्रयोदशी दिधली वस्त्रीं । अग्नि मुखीं पवित्र अवधारी । म्हणोनि अंगिकारिलीं ॥ ५५० ॥

॥ प्र० ४८ सप्तमाला जपार्थी ॥

माळा ऐका अबनूस अगर । शिवाक्ष आणि कापुर । तुळसी चांप्य माळा परिकर । नारीफळें ॥ ५५१ ॥ हें नारद गीता बोलत । सप्तमाळा असे विहित ॥ त्यांत दोन चार अंगीकृत । असे जाणा ॥ ५५२ ॥

॥ "नारदगीतायां" ॥

रुद्राक्षमगरं चार्जं कर्पुरं हरिवल्लभा ।
नारीफलंच चांपौलं सप्तमाला विधीयते ॥१७३॥

जे पुरुष सामर्थ्यें इच्छित । ते सदा कुटुंबातें पिडित । ब्राम्हण महात्म्यातें भजत । आत्म हिताकारणें ॥ ५५४ ॥ ऐसें भारती बोलत । म्हणोनि ब्राह्मण महात्म्या तें भजत । ओळखुन आत्म हित । सूज्ञ जन ॥ ५५५ ॥

॥ " भारते " ॥

**कुटुंबं पीडयित्वातु ब्राह्मणाय महात्मने ॥**
**दातव्यं भिक्षवे चान्नमात्मनो भूतिमिच्छता ॥१७४॥**

तर तो महात्मा कैसा जाणावा । महत्तत्त्वें गुणें ओळखावा । तो गुण असे बरवा । संसृति दुःखावेगळा ॥५५७॥

॥ " गीतायां " ॥

**मामुपेत्य पुनर्जन्म दुःखालयमशाश्वतं ।**
**नाप्नुवंति महात्मानः ससिद्धिं परमांगताः ॥१७५॥**

मया महात्म्या माजी प्राप्ती । पावल्या नाहीं पुनरावृत्ति । आणि पारूखली संसृती । कर्म मार्गाची ॥ ५५९ ॥

**॥ प्र० ४९ वें. विकार विकल्प हिंसा विवर्जीत भैक्षा ॥**

तो महात्मा भिक्षा मागत । मद्य मांस विवर्जीत । विकार विकल्पें घरें त्यजित । सत्य जाणा ॥ ५६० ॥ हिंसा आणि द्यूत घर । कार्मीक प्रभू याचक मंदिर । वैद्यक जोतीष आचार । ये सप्तघरें ॥ ५६१ ॥

॥ " नारदगीता स्फूट " ॥

**भिक्षा चतुर्षु वर्णेषु मद्यमांसविवर्जितं ।**
**त्यक्त्वा विकारवैकल्पे सप्तागारान् विवर्जयेत् १७६**
**हिंसको द्यूतकः कर्मी प्रभुर्याचकवैद्यकौ ॥**
**त्यजंते तानि गेहानि ज्योतिषां क्षेत्रपाठकाः ॥१७७॥**

भिक्षान्न अथवा सिधें अन्न नाहीं । तर अगत्य स्वयं-

पाक करावाही । ते प्राण रक्षावया देहीं । स्वनिष्टी पाप ॥ ६६४ ॥

**स्वनिष्टेने कृतं पाकं महद्दोषेण लिप्यते ? ।**
**सदा चान्यकृतान्नेन प्राणरक्षा विधीयते ॥**

जे भजती यती मुनी जन । ते परमेश्वरी घडे भजन । दत्त ग्रहणादि पाचै करण । तें ऋण ब्राम्हणाचें ॥५६६॥

**वाचादत्तं मनोदत्तं कायदत्तं तथैवच ॥**
**दत्तग्रहणरूपत्वं पंचैते ब्रम्ह संस्मृताः**
**( पञ्चकंब्रम्हस्वंस्मृतम् ) ॥ १७९ ॥**

मनें वाचा शरीरें देतां । दत्त ग्रहणादि ऋण घेतां । ही पांचही ऋणें राखतां । महादोष ॥ ५६८ ॥ भूतादिकाची नकरी हिंसा ॥ काम क्रोधादि त्यजी साही दोषा । नाहीं परिग्रह सरिसा । ब्रम्हध्यानीं असें ॥ ५६९ ॥ तो ब्रम्हध्यानें संपन्न । अंतरीं सदा शुद्ध पण । येणें निरंतर वर्तन । असें तयाचें ॥ ५७० ॥

"इति नारद गीता"

**॥ प्र० ५० वें भिक्षा याचना गति ॥**

प्राण रक्षावया कारण । मध्यान्ही ग्रामंत करी भ्रमण । भिक्षा उदर पोषण । प्राणरक्षणार्थे ॥ ५७१ ॥

**"तथाच ब्रह्मविद्योपनिषच्छ्रुतिः"**

**नहिंस्यात्सर्व भूतानि निर्द्वंद्वो निष्परिग्रहः ॥**
**सम्यक् तत्वब्रह्ममार्गे संपन्नः शुद्धमानसः ॥१८०॥**
**प्राणसंधारणार्थाय यथाकालं दिवा निशि ॥**
**भिक्षा दत्तेत्य भिधाय विमुक्तो भैक्ष्यमाचरेत् १८१**

तेथें तो म्हणें भिक्षा (द्या) दत्त । ऐसें मुखें असें वदत । हे बोलिलें वेद मत । श्रुति मूळ ॥ ५७४ ॥

॥ प्र० ५१ न पात्र निर्देष ॥

पात्रें काष्ट मृत्तिका वंश । आणि ग्रिभा बहुवस । हा दर्शन शेष विशेष । बोलिला असे ॥ ५७५ ॥

॥ " ब्रम्हविद्योपनिषछ्रुतिः " ॥

सोयमुदरपात्रेण लाभालाभौ ( भे ) समौ ( मो )-
भूत्वा मार्दवं ( त्तिकं ) वैणवंदार्वलाबुमयं पात्रं गृही-
त्वा भैक्षमेकान्ततो जहुयात् ॥ १८२ ॥

" भागवत "

दृष्टिपूतं न्यसेत्पादं वस्त्रपूतं पिबेज्जलं ॥
सत्यपूतं वदेद्वाक्यं मनःपूतं समाचरेत् ॥ १८३ ॥

तो येकांती करी भिक्षा भोजन । सदा घे उदक शोधून । चाले दृष्टी निरीक्षण । वाचा सत्य बोले ॥ ५७८ ॥

॥ प्र० ५२ न महात्म्यारहिवासठाय ॥

देवगृह शून्यघर । वृक्षमूल नदीतीर । तेथें असें निरंतर । ममता रहित ॥ ५७९ ॥

॥ " ब्रह्मविद्योपानिषदि " ॥

शून्यगारदेवगृहतृणकूटवल्मीकवृक्षमूलकुलालशाला-
नदीपुलिनगिरिकुहरकंदरकोटरनिर्झरस्थंडिलेष्वानि-
केतवासी ॥ १८४ ॥

तेथें तो ध्यानपरायण मुनी । देहत्याग संन्यास करूनी । म्हणजे मनोद्वंद्वादित्यजुनी । तोची महात्मा ॥५८१॥ योगी

यती हंस हे नावें । परमहंस महात्मा म्हणावें । हें आघवे बोलणें पाहावें । वेदयुक्त ॥ ५८२ ॥

॥ " ब्रम्हविद्योपनिषद " ॥

**प्रयतो निर्ममो ध्यानपरायणः स एवमुनिः संन्यासेन देहत्यागं करोति सः संन्यासी योगी च एवयतिः सहंसः स परमहंस स एव महात्मा ॥ १८५ ॥**

**॥ प्र० ५३ उर्ध्वमूल दंड धार्य ॥**

तयाचा दंड उर्ध्वमूल । गौ सर्पादि सकळ । निर्वाण करावया केवळ । हेचि कारण ॥ ५८४ ॥

॥ " ब्रम्हविद्योपनिषादि-" ॥

**शतखण्डजीर्णकंथा गोश्वसर्पादिनिवारणार्थमूर्ध्वमूलंदंडं दधत इति ॥ १८६ ॥**

तरी तयासी कवणाचें ध्यान । तें आइका साक्षी प्रमाण । ती साक्षी विस्तारून । सांगेन आतां ॥ ५८६ ॥

**॥ प्र० ५४ महात्मा ध्यानमती ॥**

इयेलोकीं दोन पुरुष । या वेगळा तिसरा उत्तम देख ऐसीं सार वस्तु हृदयीं वास तयाची मती कैसी ॥ ५८७ ॥ माझी वासुदेव धन संपत्ती । तोचि निजपिता अखंड चित्तीं । येर देहपरत्व पिते असतीं । ते नव्हे म्हणें ॥ ५८८ ॥ तेणें कुंठें जन्म मरण संसृती । मग तो पावि मोक्ष प्राप्ति । तो महात्मा दुर्लभ ये क्षिती । निजनाथ म्हणें ॥ ५८९ ॥ तरी तिन्ही पुरुष आइकता । परमेश्वर निवाड होय तत्वता । तेणें जोडे प्रसन्नता । तया पुरुषा ॥ ५९० ॥

॥ " तथाच गीतायां " ॥

**द्वाविमौ पुरुषौ लोके क्षरश्चाक्षर एव च ।**

**क्षरः सर्वाणि भूतानि कूटस्थोक्षर उच्यते ॥१८७॥**

तरीया शरीर पुर लोका । सत्यत्व दोनि पुरुष देखा । एकक्षर एकअक्षर आइका । निर्धारुनिया ॥ ५९२ ॥ क्षरं म्हणजे चिदंशातें । अक्षर म्हणिजे नपुंसका ब्रम्हातें । जे व्यापक पणें भरलें तेथें । अखंडित असे ॥ ५९३ ॥ क्षर तो सर्व भूतीं । प्रत्यक्ष प्रत्यक्ष व्यक्तीं । आणि अक्षर तो व्यापकत्वी । मिळाला असें ॥ ५९४ ॥

॥ "गीतायां" ॥

**उत्तमः पुरुस्त्वन्यः परमात्मेत्युदात्हृतः ॥**
**यो लोकत्रयमाविश्य बिभर्त्यव्यय ईश्वरः ॥ १८८ ॥**

या दोहीं वेगळा निरुपम । जयातें म्हणिजे पुरुषोत्तम । सर्व व्यापक आत्माराम । बोलिजे तो ॥ ५९६ ॥ तो या लोक त्रयांत । असोनि सकळा विरहित । निर्धारिता तरी अव्यक्त । आणि व्यक्त परमेश्वर तो ॥ ५९७ ॥

॥ "गीतायां" ॥

**यस्मात्क्षरमतीतोहमक्षरादपिचोत्तमः ॥**
**अतोस्मि लोके वेदे च प्रथितः पुरुषोत्तमः ॥१८९॥**

जो क्षरासी अतीत । अक्षराहूनि उत्तम समर्थ । जो वेदशास्त्री वाखाणित । पुरुषोत्तम म्हणोनिया ॥ ५९९ ॥ हे तिन्ही पुरुष । कवणें ठाई ठिकाण वस । तो ऐकत उपदेश । होता ये सकळा ॥ ६०० ॥ पर तो गुरु मुखें विण । हृदयीं नभासे जाण । तयाचे करीत असे ध्यान । मुनीश्वरतो ॥ ६०१ ॥ या पदार्थांचे होय निवाडे । तैंचि गुरु उपदेश जाला घडे । येऱ्हवी न फिटती सांकडें । जन्म मरणाचें ॥ ६०२ ॥ हा जाणितलया पदार्थ भेद । तैंचि

पाविजे परंपद । म्हणोनि गुरु करावा ब्रम्हाविद । जो उतरील पैलपार ॥ ६०३ ॥ इतर ग्रंथनाना बहुवस । तैसा हा नव्हे दर्शन प्रकाश । जे सकळाहुनि सार विशेष । तो सांगता ये कवी ॥ ६०४ ॥ निगम आगम वेद । पुराण विद्या बहुशास्त्र भेद । याची शोधनी घेऊनि प्रसिद्ध । दर्शनप्रकाश केला ॥ ६०५ ॥

॥ प्र० ५५ ग्रंथ शोधन वर्णन ॥

तर ग्रंथ शोधनी केसी केली । सकळांचीं मुळें श्रुति सूत्रें गणिली । साध्य साधनें सांगितलीं । उषग्रंथ तेही ॥ ६०६ ॥ काळ पदार्थ अध्यायजाणा । उपनिषदें नावें गणना । धांडोळोनि परमेश्वर विचारणा । केली जेणें ॥ ६०७॥ तो 'त्रितापहर' (शशि) श्रीवर्धनाचा सुत । 'दैत्यारीनामें' विख्यात । परी तयासी प्रसन्न जाला अनंत । ह्मणोनि ग्रंथ बृधी ॥ ६०८ ॥ जो अंक ( ९ ) ग्रामासी पर । तयाचे ध्यान करिती निरंतर । हे सकळाहुनि सार । दैवें पाविजे ॥ ६०९ ॥

॥ प्र० ५६ अंक ग्रामापर परमेश्वर ॥

" तथाच निर्वचनोप निषछ्रुतयः "

कर्मयोनिर्देवयोनिरंतरालं सुरालयं ।
सत्यंकैलासवैकुण्ठेक्षीराब्धिर्भैरवस्तथा ॥१९०॥
विश्वरूपं च चैतन्यमेतन्मायास्वरूपकं ।
मायापरं भवेद्ब्रह्म तत्परं केवलं विभुः ॥ १९१ ॥

तयाचें पावन केवळ परमे श्वरीं । हें वेदीं असे सकळ शास्त्रीं । ऐसें विचारुनि जो सेवाकरी । तोही मोक्षपावे ॥

६१२ ॥ तया महात्म्याचें ज्ञान । जीव देवताब्रह्म जाण । प्रपंच परमेश्वर लक्षण । जाणतीतें ॥ ६१३ ॥

॥ प्र० ५७ जीवदेवता ब्रह्मपरमेश्वर प्रपंचाभिन्न ॥

॥ पदार्थलक्षण ॥

" नारदगीतायां "

ब्रह्म जीवस्तथाविद्या प्रपंचोदैवतैः सह ।
स्वानन्दो नित्यमुक्तं च ( क्तिश्च ) षड्गुणेश्वरकं परं ॥

ब्रह्म जीवअविद्या सहित । प्रपंच आणि देवत । ईश्वर षड्गुणी परम म्हणत । मुनीश्वर ॥ ६१५ ॥ या चहूं पदार्थांचें ज्ञान । ते भिन्न भिन्न असे लक्षण । हें श्री कृष्ण निरोपण । नारद गीता ॥ ६१६ ॥ प्रपंच मिथ्या जड अज्ञान । विस्तार अविनाशन । दिव्यपार्थिव स्वत सिद्ध-लक्षण । बहुरूपता ॥ ६१७ ॥

" नारदगीतायां "

मिथ्याजडत्वे चाज्ञानं विस्तारोह्याविनाशकं ।
दिव्यपार्थिवप्रपंचो स्वात्सिद्धबहुरूपता ? ॥ ११३ ॥

जीवाचे असती चार भेद । एक असाध्य एक कष्ट साध्य । एक सुख साध्य सुसाध्य । हे मती बंधरूपी ॥ ६१९ ॥

असाध्यं कष्टसाध्यं च सुखसाध्यं सुसाध्ययोः ।
चत्वारो जीव भेदेन मतिबन्ध स्वरूपता ॥ ११४ ॥

आतां देवता निर्धार । ज्ञानादि पांचही प्रकार । अविद्या दिबंध कार्य विस्तार । पांचही जाणा ॥ ६२१ ॥

" नारदगीतायां "

ज्ञानं मुख्यप्रकाशं च पंचभिर्नित्यबद्धता ॥

**निकृष्टं साभिमानत्वं स्वानंदं चाधिनोपरं ॥ १९५ ॥**

त्या निकृष्ठा साभिमाना । उंच आनंद न प्रकाशे जाणा । आणि अपरा अधिना । असतीं तिया ॥ ६२३ ॥ या चाहूं षदार्थाचें ज्ञान । नकळे गुरुमुखा वांचून । याची जाणती खूण । ब्रह्मविद ते ॥ ६२४ ॥ ते महंत परम जा-णते । परावराचें ज्ञातें । सकळ शास्त्र वर्क्तें । परमहंस ते ॥ ६२५ ॥

**एतन्निर्वचनं ध्यायन्न भावाय स कल्पते ॥** [२]

तो पापा वेगळा पवित्र होय । हे सार ज्ञान जो लाहे । ऐसें बोलिलें आहे । उपनिषदीं ॥ ६२६ ॥

॥ " गीतायां " ॥

**यांति देवव्रता देवान् पितृन् यांति पितृव्रताः ॥**
**भूतानि यान्ति भूतेज्याः यांति मद्याजिनोपिमां ॥**

देव याचक पावती देवाते । भूत भजक पावती भूतातें । पितृ भक्त पितृ देवतांते । तयासी पतन असे ॥ ६२८ ॥ माझा भक्त भजे मातें । तो पावे माझिया परम पदातें । हें भासिलें ज्ञान मतें । तया पतन नाहीं ॥ ६२९ ॥ हा मार्ग ज्ञान रवी । तेथ इंद्रिय प्रकाश केवीं । अज्ञान जना रात्री दाखवी । शोभाय मान ॥ ६३० ॥ हे पदार्थ पाठे हीनंग परी वदतां समलक्षण न भंग । तरी आत्मत्व योग । बोलावें राजहंसीं ॥ ६३१ ॥

प्र० ५८ **श्लोकतस्करत्व ' शुभ्रवर्ण वक्रमुख '**

**ब्रूहि ब्रूहि पुनर्ब्रूहि अर्थं ब्रूहि विचक्षण ॥**
**ग्रथितं कथितं चैव षडेते श्लोकतस्कराः ॥१९७॥**

ग्रंथकृत्य असें एकाचें । नांव ठेवी आपुलें कां आणि-

कांचें । तो शुभ्र वर्ण वक्रमुख साचे । जैसे व्यास भाग-
वते ॥ ६३३ ॥ भारविकृत किरात ग्रंथ जाला । वनितेचा
पिता म्हणे आम्हीच केला । तो संदेहाचा उदधीं बुडाला ।
तेथ भारवीच काढिता ॥ ६३४ ॥ नरेंद्र कवीनें ग्रंथ
केला । तेथें राजा म्हणे आमचें नांव घाला । दोष चुक-
वुनि पालवसा केला । कवी बोल लागेल म्हणोनी ॥६३५॥
तोचि आईका सिद्धान्त । जेणें कळे अवघा परमार्थ । तो
सांगेन वृत्तांत । निर्गुण ज्ञानाचा ॥ ६३६ ॥

## प्र० ५९ निर्गुणज्ञान निरूपण परमेश्वराचे

हंसें 'ब्रम्हया' ज्ञान दिधलें । तेचि 'विवस्वता' सीं
सांगितले । तेचि श्रीकृष्णें ' उद्धव देवा ' विहिलें । तेचि
'अर्जुना' ॥६३७॥ तेंचि प्रशांते कलियुगीं दिधलें । जें युगा
युगीं गीतेशीं बोलिलें । तेंचि दशोपनिषदीं सांगितलें ।
तें निर्गुण ज्ञान बोलिजे ॥ ६३८ ॥ ब्रम्हमा वेद ज्ञान
होतें । पर हंसावतारें सांगितलें चौथें । ते जाणावे त्रिगुण
रहिते । साधन मोक्षाचें ॥ ६३९ ॥

" तथाच धगवतोक्तं "

कैवल्यं सात्त्विकं ज्ञानं रजो वैकल्पिकं तु यत् ॥
प्राकृतं तामसं ज्ञानमनिष्टं निर्गुणं स्मृतं ॥१९८॥
कालेन नष्टा प्रलये वाणीयंवेदसंज्ञिता ॥
मयाऽऽदौ ब्रह्मणे प्रोक्ता धर्मो यस्या महात्मकं ॥
स मामचिंतयद्देवः प्रश्नपारतितीर्षये ॥
तस्याहं हंसरूपेण सकाशमगमंतदा ॥ २०० ॥

निर्गुण ज्ञान तो महात्मा । मनीष्टां बोलिला पुरुषोत्तमा ।
तो दुर्लक्ष पैं गा आम्हा । सकळा मध्यें ॥ ६४१ ॥

"गीतायां"

बहूनां जन्मनामन्ते ज्ञानवान्मां प्रपद्यते ॥
वासुदेवः सर्वमिति स महात्मा सुदुर्लभः ॥२०१॥

ऐसें बहुता जन्माचें करणें । ज्ञानें करुनि मातें पावणें । हा वासुदेव सर्व माझे म्हणें । तो महात्मा दुर्लभ ॥६४५॥ उभय महात्मयांची रहणी । देखीली वेदगीता प्रमाणीं । तें सांगताये 'दैत्यारी' मुनी । श्रोतयांसी ॥६४६॥ वासुदेव सर्व गोत संपत्ती । ऐसें अखंड जयाचें चित्तीं । तो महात्मा दुर्लभ आम्हा येक्षीतीं निजनाथ म्हणें ॥६४७॥

॥ प्र० ६० २ महात्मे अवर्तन ॥

वेदगीता भागवत । दोन महात्मे बोलत । एक देव एक भक्त । असती सदा ॥ ६४८ ॥ तया देवासी अनुसरलें । त्यांही वित्त पुत्रादि लोक त्यजिले । साधनांतें आचरतें जाले । इच्छारूप ॥ ६४९ ॥ ते घरा आणि परिग्रहारहित । शिखा यज्ञोपवीत त्यजित । अंधा बधिरा परी वर्तत । विधी अर्थीं तरुणें ॥ ६५० ॥ स्त्रिअर्थीं तरी नपुंसक । मुका उन्मत आईक । या परी वर्तत देख । मुनीश्वर तो ॥ ६५१ ॥ अंतरीं काम क्रोधाचें शमन । बाह्य इंद्रियाचें दमन । ज्ञानें करुनि क्षाळन । आपुलें हिती ॥ ६५२ ॥ परत्म्याचें ठाईं रमत । तयाची क्रीडा आठवित । विधीबागे भोग सत्त । तेणें आनंदें असे ॥६५३॥ प्रणवासी परब्रम्ह ऐसें प्रकाशे । तें शून्य जाणत असें । या परी पूर्णता वसे । तें ज्ञान संपूर्णता ॥ ६५४ ॥ आइका दुसरे व्याख्यान । होचि लक्षण अवतारी जाण । जो संपूर्ण जीवोद्धर्ण । प्रवर्तला असें ॥ ६५५ ॥

"तथाच ब्रह्मविद्योपनिषच्छ्रुतिः"

ते देवाः पुत्रेषणायाश्च वित्तेषणायाश्च लोकेषणायाश्च ससाधनेभ्यो व्युत्थाय निरागारा निष्परिग्रहा अशिखा अयज्ञोपवीता अन्धा बाधिरा मुग्धा क्लीबा मूका उन्मता इव वर्तमानाः शान्ता दान्ता उपरि तितिक्षवः समाहिता आत्मारामा आत्मक्रीडा आत्ममिथुना आत्मानंदाः प्रणवमेव परब्रह्मात्मप्रकाशकं शून्यं जानन्तस्तत्रैव परिसमाप्ताः ॥

॥ प्र० ६१ आचार निर्गुण ॥

तयाचा आचार निर्गुण । ऐऱ्हवी नव्हे योगाचें लक्षण । हें केलें अर्जुनाशी निरोपण । श्रीकृष्ण नाथें ॥ ६५७ ॥

"गीतायां"

नात्यश्नतस्तु योगोस्ति न चैकान्तमनश्नतः ।
न चातिस्वप्नशीलस्य जाग्रतो नैव चार्जुन ॥ २०३ ॥

श्रीकृष्णे केलें निरोपण । जे अर्जुना लागुन । तें योगाचें लक्षण । आईका आतां ॥ ६५९ ॥ ना अतिशय अहारी । ना अत्यंत उपवास करी । पाहे तव निद्राकरी । अति जागृतीं योग नाहीं ॥ ६६० ॥

"गीतायां"

युक्ताहारविहारस्य युक्तचेष्टस्य कर्मसु ।
युक्तस्वप्नावबोधस्य योगो भवति दुःखहा ॥ २०४ ॥

आहारें विहारें युक्त । कर्मचेष्टे तैसाचि वर्तत । निद्रेचे ठाईं जागृत । तेणेंचि पाडें ॥ ६६२ ॥ तेणें योगे करुनि

आपुले । सकळही दुःख हरिलें । तेणें आनंदें डुले । परम सुखिया ॥ ६६३ ॥

"गीतायां"

समः शत्रौ च मित्रे च तथा मानापमानयोः ॥
शीतोष्णसुखदुःखेषु समः संगविवर्जितः ॥ २०५ ॥

अरि मित्र सारिखा । तैसाचि मान अपमान देखा । शीतोष्ण सुख दुःखा । वेगळातो ॥ ६६५ ॥

"गीतायां"

तुल्यनिंदास्तुतिर्मौनी संतुष्टो येन केनचित् ।
अनिकेतः स्थिरमतिर्भक्तिमान् मे प्रियो नरः ॥२०६॥

निंदेस्तुतिचे ठाईं । मौन्य ऐकोनि नायके कांहीं । मल- तेन प्रकारें पाही । संतोषिया ॥ ६६७ ॥ गृहाश्रमाचे ठाईं । बुद्धि येवली ही नाहीं । तो भक्त बोलिजे पैं ॥ प्रिये मज ॥ ६६८ ॥ ऐसा संतोषी करुनी आत्मा ॥ जाणें परमेश्वर महिमा । तो बाध न पवे उत्तमा । मी म्हणे कर्मे केलिया ॥ ६६९ ॥

"गीतायां"

न मां कर्माणि लिंपान्ति न मे कर्मफले स्पृहा ॥
इति मां योभिजानाति कर्मभिर्न स बध्यते ॥ २०७ ॥

मजकर्माची बाधा । नलगे जाण कदा । आणि फळा पेक्षेचि श्रद्धा । तेही नाहीं ॥ ६७१ ॥ ऐसें आमचें करणें । जो जाणे कर्तृत्व लक्षणें । तेही बाध न पवे मी म्हणे । कर्मे करुनियां ॥ ६७२ ॥

"गीतायां"

या निशा सर्वभूतानां तस्यां जागर्ति संयमी ॥

**यस्यां जाग्रति भूतानि सा निशा पश्यतो मुनेः॥२०८॥**

जया जिवाचे ठाई । ईश्वर ज्ञानाची सोय नाहीं । ते रात्रीच बोलिजे पैं । भूत जाता ॥ ६७४ ॥ जाणूनि ऐशीं रात्री । शयमें असे निरंतरी । ईश्वर ज्ञानेंसी अभ्यंतरीं । जागत असें ॥ ६७५ ॥ इंद्रियें विषयाचे ठाईं जागणें । ऐशी सर्व भुतांचीं लक्षणें । ये अर्थीं रात्रीच जाणे । मुनीश्वरासी ॥ ६७६ ॥

**तथाच ब्रह्मविद्योपनिषच्छ्रुतिः**

**त्रिष्वेकमाचरेद्ब्रह्म त्रिपाच्चरतिचोत्तरे ॥**
**सत्यानृतोपभोगार्थं तु द्वैतभावो महात्मनः ॥ २०९ ॥**

त्रि म्हणजे ज्ञानत्रय । तयामध्यें एकाचि ब्रह्महोय । मात्रिक अनुष्ठिलिया मोक्ष काय । म्हणावा असें ॥ ६७८ ॥ ऐसा तो मोक्ष मानी सत्य । अष्टभोग अनित्य असत । हे द्विभेद असे देखत । तो महात्मा म्हणिजे ॥ ६७९ ॥ जैसा उदैलिया दिनकर । नासुनि जाय अंधकार । प्रकाशे चराचर । सकळ जना ॥ ६८० ॥ ना चंद्र निववी सकळ जाती । चंदन वेधी वनस्पती । परिस लोह जाती । सुवर्ण करी ॥ ६८१ ॥ तैसे महात्मा महंत सन्निद्धीं । नासुनि जाय अज्ञान बुद्धी । प्रकाशे परम सिद्धी । सारासार ॥ ६८२ ॥ परएक अयोग्य पापरूप । तया न प्रकाशे ज्ञान दीप । जरी रवी तेजे जाला अमुप । तऱ्ही न प्रकाशे अंधा ॥ ६८३ ॥ चंदन वेधीं पुष्करा । चून खद्योत न निववेचि चंद्रा । तो अधीका रश्मि धारा । तप्त होय ॥ ६८४ ॥ तैसे एक पातकी प्राणिये । तयासी

काय करिती ज्ञानिये । जै ईश्वरी कृपा होये । तैचि उद्धरे तो ॥ ६८५ ॥ परी कृपा साधु भजणें जोडे । ऐसें सकळ शास्त्रीं गातीं पवाडे । जे नंद यशोदे जोडे । भजनास्तव ॥ ६८६ ॥ ग्रंथ श्रवणाचें कार्य । जो सकळा चातुर्य । तयाशी सर्व सिद्धी होय । तो सभाग्य ॥६८७॥ जैसे बितियाचे गुप्त धन । तें भाग्योदयें पुत्राहोय श्रवण । तें कवणाही न कळतांचि घेणे । तो शिहाणा बोलिजे ॥ ६८८ ॥ तैसा परमेश्वर पिता सकळ जीवा । तया असे मोक्ष सिद्धीचा ठेवा । तो आग्रहें ध्यावा । आपुला म्हणोनि ॥ ६८९ ॥ तेजें परमेश्वर कृपा जोडे । मग तोचि सारासार निवडे । तैं सकळ ऐकण्याचा अर्थ घडे । तया पुरुषा ॥ ६९० ॥ ना रत्न गारा जालिया एकवट । तयांत निवडी तो जवाहिरी श्रेष्ठ । तैसे नानामार्ग घनदाट । ओळखे तो ज्ञानिया ॥ ६९१ ॥

‘ तथाच श्रुतिः ’

“ ज्ञानं श्रुत्वा ब्राह्मण.त्क्षत्रियाद्वा ॥
वैश्यात् शूद्रात् चापि नीचादभीक्ष्णं ” ॥ २१० ॥

ज्ञान ऐकावें श्रुतिम्हणें । क्षत्रियापासून ब्राम्हणें । अथवा वैश्य शूद्र जाणें । नीचा पासूनिया ॥ ६९३ ॥ म्हणोनि तेथें परमेश्वर ज्ञान । आईकतां थोर पवित्रजाण । येर राहे तो अज्ञान । जैसा तैसा ॥ ६९४ ॥ श्रीकृष्ण म्हणे अर्जुना । जो माझिया भक्तासी करी नमना । तयाशी पुण्य होय जाणा । शत गौदानाचें ॥ ६९५ ॥

“ अश्वमेधपर्वाणि ”

मद्भक्तश्च नमस्कार्यो समालिंग्यो विशेषतः ।

कपिलागोशतं दत्तं तत्फलं जायते नृणां ॥ २११ ॥

जे यती मुनी जन । तयासि देती उदकें अन्न । तें मेरु समुद्र समान । भजन होय ॥ ६९७ ॥ तें फळ होय पार्था । शत गौदान समानता । तयाभक्ता शुचिभंता । प्रीति तयाचा तो धर्म ॥ ६९८ ॥

" भारते "

तत्फलं लभते पार्थ वैष्णवालिंगनान्नरः ।
मद्भक्तेषु च या प्रीतिः स धर्मः परिकीर्तितः २१२

" श्रुतिः "

यतेर्हस्तेजलं दद्या द्भैक्ष्यं दद्यात्पुनर्जलं ।
तद्दानं मेरुणा तुल्यं मज्जलं सागरोपमं ॥ २१३ ॥

हे गुणाणित साधुजन । परमाणु देता मेरु समान । जैसे सु भुई पीक जाण । तैसे तया होय ॥ ७०१ ॥

॥ संहितायां ॥

रजकश्चर्मकश्चैव नटो बुरुड एव च ।
कैवर्तश्च तथा म्लेच्छश्चांत्यजांश्च विवर्जयेत् ॥२१४॥
कैवर्त लब्ध को म्लेच्छ ( पाठांतरे )

चहूं वर्णीं भिक्षा उत्तम बोलिजे । तो करी पुरग्राम वर्ज । सप्तघरें त्यजोनि सहज । मुनीश्वरतो ॥ ७०३ ॥
इये घरें सर्व देशीं निषेध । येर ते देशपरत्व विध । चातुर्वर्णी सदा शुद्ध । विहिताचार ॥ ७०४ ॥

" तथाच भागवते "

भिक्षा चतुर्षु वर्णेषु विगर्ह्यान् वर्जयंश्चरेत् ॥
सप्तागारानसंक्लृप्तस्तुष्यन् लुब्धेन तावता ॥२१५॥
पुरग्रामव्रजान् सार्थन् भिक्षार्थं प्रविशंश्चरेत् ॥

**पुण्यदेशे सरिच्छैले वनाश्रमवतीं महीं ॥ २१६ ॥**

तो मुनिलक्षणयुक्त । तया सरिसा असे अनंत । तयाचेनि त्रिभुवन पुनीत । म्हणे आदि पुरुष ॥ ७०७ ॥

" भागवते "

**निरपेक्षं मुनिंशान्तं निर्वैरं समदर्शनं**
**अनुव्रजाम्यहं नित्यं पूयेयेत्यंघ्रिरेणुभिः ॥ २१७ ॥**

निरपेक्ष मुनीशांत । निर्वैर समदर्शनें वर्तत । तया सरिसा नित्य अनंत । असे जाणा ॥ ७०९ ॥ तो सकळांतें करी पवित्र । अनन्य भावें भजे निरंतर । तयातें म्हणिजे थोर । महात्मा तो ॥ ७१० ॥

" गीता "

**महात्मानस्तु मां पार्थ दैवीं प्रकृतिमाश्रिताः ॥**
**भजंत्यनन्यमनसो ज्ञात्वा भूतादिमव्ययम् ॥२१८॥**

मज आश्रित जो महात्मा । देवी प्रकृतिचा निरूपमा । तो अनन्य भावें आम्हां । भजे पैं गा ॥ ७१२ ॥ ते जाणती पैंगा मातें । समस्त भूत जातातें । प्रीति पूर्वक निमित्याते । मजभजती ॥ ७१३ ॥ ऐसे शरण रिगाले । त्यांही सकळ धर्मातें त्याजिले । ते परमेश्वरातें देखते जाले । पाप रहित जे ॥ ७१४ ॥

" गीता "

**सर्वधर्मान् परित्यज्य मामेकं शरणं व्रज ।**
**अहं त्वा सर्वपापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुचः २१९**

अगा तुजप्रती जेतुलें । सकळही इतर धर्म सांगीतले । तेतुलेही त्यजी पा बोले । आमचेनी ॥ ७१६ ॥ अगा शरण रिगालिया मातें । त्वा हातीले होईल सर्व पापातें ।

आणि सत्य देखावया मातें । यर शोचुनको ॥ ७१७ ॥
तयाची सुचना पारुखली । जे तयामोक्षाचि ठी जाली ।
हे निबंधीं असे बोलिली । परमेश्वर वाणी ॥ ७१८ ॥

"गोतासु"

प्राप्य पुण्यकृतां लोकानुषित्वा शाश्वतीः समाः ॥
शुचीनां श्रीमतां गेहे योगभ्रष्टोभिजायते ॥२२०॥

तयाचिया योग भ्रष्टा । शाश्वतीं समपादा पाविजे निष्टा ।
मा तयाचिय योग भ्रष्टा । मोक्ष काई म्हणावे असे ७२०
ऐसी परमेश्वरनिष्टा गहन । देवी केलें ज्याचे स्तवन । हे
भागवती निष्टा खुण । बोलिली असे ॥ ७२१ ॥

॥ प्र० ६२ देवांनीं श्रीकृष्णाचें स्तवन केलें ॥

"भागवते"

॥ हनुमानुवाच ॥

न्याय्योथ दण्डः कृतकिल्बिषेस्ति ॥
तवावतारः खुलुनिग्रहाय ॥ २२१ ॥

॥ वायुरुवाच ॥

नमः कृष्णाय रामाय वसुदेवसुताय च ॥
प्रद्युम्नायानिरुद्धाय साधूनां पतये नमः ॥ २२२ ॥

॥ वरुण उवाच ॥

कालाय कालनाभाय कालावयवसाक्षिणे ॥
विश्वाय तदुपद्रष्ट्रे तत्कर्त्रे तस्य हेतवे ॥ २२३ ॥

॥ चंद्रउवाच ॥

नमः प्रमाणमूलाय कवये शास्त्रयोनये ॥
प्रवृत्ताय निवृत्ताय निगमाय नमो नमः ॥ २२४ ॥

॥ दिनकर उवाच ॥

नमो भगवते तुभ्यं वासुदेवाय विष्णवे ॥
पुरुषायादिबीजाय पूर्णबोधाय ते नमः ॥ २२५ ॥

॥ इंद्र उवाच ॥

नमः पंकजनाभाय नमः पंकजमालिने ॥
नमः पंकजनेत्राय नमस्ते पंकजांघ्रये ॥ २२६ ॥

॥ विरंचिरुवाच ॥

भूतमात्रेंद्रियप्राणमनोबुद्ध्याशयात्मने ॥
त्रिगुणेनाभिमानेन गूढस्वात्मानुभूतये ॥ २२७ ॥
नमोनंताय सूक्ष्माय कूटस्थाय विपाश्चिते ॥
नानावादविरुद्धाय वाचये (?) वाक्यशक्तये ॥२२८॥

॥ विष्णुरुवाच ॥

नमामि त्वानंतशक्तिं परेशं
सर्वात्मानं केवलं ज्ञप्तिमात्रं ॥
विश्वोत्पत्तिस्थानसंहारहेतु
यत्तद्ब्रह्म ब्रह्मलिंगं प्रशांतं ॥ २२९ ॥

॥ महेशउवाच ॥

त्वं हि ब्रह्म परं ज्योतिर्गूढं ब्रह्मणि वाङ्मयं ॥
यः पश्यति महात्मानमाकाशमिव केवलम् ॥२३०॥

हनुमंत वरुण वायू । इंद्र चंद्रादि सूर्य । ब्रह्मा हरिहर तिन्ही देव । स्तविती जयातें ॥ ७३२ ॥ जो क्षीर सागरींचा नारायण । तोही करितां जाला स्तवन । म्हणोनि तया वेगळा जग जीवन । जाणें गुरु उपदेशें ॥७३३॥

॥ नारायण उवाच ॥

तावाह भूमौ परमेष्ठिनां प्रभु-

बद्धांजली सस्मितमूर्जया गिरा ।
द्विजात्मजा मे युवयोर्दिदृक्षुणा
मयापनीता भुविधर्मगुप्तये ॥ ७३१ ॥
कलावतीर्णाववनेर्भरासुरान्
ह वेह भूमौ त्वरयेतमंतिमे ॥
पूर्णकामावपि युवां नरनारायणावृषी २३२

जरी तोचि म्हणावा । लक्ष्मी आग्रह कां घ्यावा । नारायणें माथाकां तुक्षावा । कवणा कारणें ॥ ७३६ ॥ आणिक साक्षी असे एक । परी ते नेणती सकळ लोक । ते चतुर जाणती विवेक । जैसा तैसा ॥ ७३७ ॥ जेणें इंद्राचा गर्व हरिला । ब्रह्मा असे भुलविला । तेणें रुद्र मोहिला । कैलासींचा ॥ ७३८ ॥ इंद्र ब्रह्मा हरिहर । अश्वथामा महावीर । मागूं आला शक्ति थोर । पांडवा मारावया ॥ ७३९ ॥ तयाचें न चलें शक्ति सामर्थ्ये । तिन्ही देव मागो आलें तेथें । पांडवासी द्यावया कैलास वैकुंठ । आम्ही सेवा करुनि तुम्ही ॥ ७४० ॥ मुचकंद मागों आला मोक्षवर । तव दाखविलें श्रीकृष्णाचें घर । म्हणोनि मोक्ष नाहीं निर्धार । जाण तेथें ॥ ७४१ ॥

" एकादशे "

स्वर्गिणोप्येत मिच्छान्ति लोकं निरयिणंस्तथा ॥
साधकं ज्ञानभक्तिभ्यामुभयं तदसाधकं ॥ २३३ ॥

ज्ञान भक्ति मोक्षाचें साधन । तें नाहीं निरय देव गणा । म्हणोनि यातें इच्छिती जाणा । सकळ देव ॥ ७४३ ॥ मोक्ष होये ज्ञाना तव । तें ज्ञान नेणती सकळ देव । तें ऐका संदेह । सकळाचा ॥ ७४४ ॥

॥ प्र० ६३ सकळा संदेह वर्णन ॥

" तथाच षष्ठस्कन्धे "

धर्मं तु साक्षाद्भगवत्प्रणीत
न वै विदुस्त ऋषयो न देवाः ।
न सिद्धमुख्या असुरा मनुष्याः ।
कुतश्च विद्याधरचारणादयः ॥ २३४ ॥
जिव्हा न वक्ति भगवद्गुणनामधेयं
चेतश्च नो स्मरति तच्चरणारविंदं ।
कृष्णाय नो नमति यच्छिर एकदापि
तानानयध्वमसकृत्कृतकृष्णकृत्यं ॥ २३५ ॥

असो धर्म ऐसें म्हणत । आणि धर्म म्हणोनि करित । परी त्या धर्मातें नोळखत । उत्तम भेदें ॥ ७४७ ॥ तया धर्मा ते देव नेणती । ऋषी सिद्ध नोळखती । तेथें अन्याचार मनुष्य केउती कृपे वांचूनिया ॥ ७४८ ॥ अजामेळ प्रसंग पाहतां । गूढ पडिलें यमदूता । तयाचा निवाड करिता । परमेश्वर ज्ञानी ॥ ७४९ ॥ परमेश्वराचें नाम वाचे नाहीं । हृदयीं ध्यान न करी कांहीं । त्याही नमस्कार तोही घडेचिना ॥ ७५० ॥ ऐसा जो आकृती प्राणी । तयाशीं यमपुरी होय जाचणी । जो असे परमेश्वर ध्यानीं । तया भय नाहीं ॥ ७५१ ॥ ऐसें ज्ञान गूढ आईका । तें स्वर्ग नरकीं नाहीं लोका । तर देव बोलिले देखा । कैसे यापरी ॥ ७५२ ॥ परमेश्वराचें निरूपण । ब्रम्हा रुद्रा होय श्रवण । तो दुराश्रवणी देवता गण । म्हणोनिया ॥ ७५३ ॥ आणि निमित्य करूनी देवा । तें निरूपण होय अधिकाऱ्या जीवा । तो शब्दार्थ जाणावा ।

सारिखि वाटणी ॥ ७५४ ॥ देवव्रता मोक्षधर्म बोलिला । पार्वती या महात्मा सांगितला । तो दुराश्रवणी ऐकिला । म्हणोनिया ॥ ७५५ ॥ म्हणोनि प्रमाण वेदा । आणिलें साक्षी भेदा । ऐसा पंथ जाणावा शुद्धा । चतुर्यूगीं ॥ ७५३ ॥

" कुमार संभवे " वपुर्विरूपाक्षमलक्ष्यजन्मता ॥
दिगम्बरत्वेन निवेदितं वसु ॥
वरेषु यद्बालमृगाक्षि मृग्यते
तदस्ति किं व्यस्तमपि त्रिलोचने ॥ २३६ ॥
उवाच चैनं परमार्थतो हरं ॥ न वेत्सि नूनं यत एव मात्थ मां ॥ अलोकसामान्यमचिंत्यहेतुकं द्विषन्ति मंदाश्चरितं महात्मनां ॥ २३७ ॥

ऐसे पार्वतीचें बोलणें । उपनिषदी साक्षी जाणे । गीता भागवत संपूर्णे । गाही जाणिजे ॥ ७५९ ॥ पार्वती तप करीत होती । म्हैसें धरिलीं दिगांबर मूर्ति । दूषिली शंकर रूप स्थिती । तव पार्वती बोलिली ॥७६०॥ मंद मतींचें अज्ञान । ते महात्मया दूषिती जाण । परते नव्हती लहान । परमार्थी अधिक ॥ ७६१ ॥ तैसे त्वां दूषिले शंकरा । तरी गुणे अधिक अवधारा । मग ओळखीचा निर्धारा । केला तिये प्रती ॥ ७६२ ॥ ऐसे हे साक्षी असे अपारे । पर आणिले गाही मात्र । इये अर्थी बुझीजे व्यवहारे । पंडीत संत जनी ॥ ७६३ ॥ जरी पंच नगरें गाही । तऱ्ही सभे अवघी नेईजती ऐसें नाहीं । ते तोकडे नि निवडीती पाही । सुष्ट जाणते ॥ ७६४ ॥ ब्रम्हया वेद ज्ञान संपूर्ण । तरी का न सांगवें

पुत्राचा प्रश्न । म्हणोनि वेदा वेगळें परमेश्वर ज्ञान । प्रश्न फेडिला ॥ ७६५ ॥ तैसे 'विवस्वत' म्हणिजे सूर्य । तयाचें ज्ञान तया होता निश्चय । तरी तयासीं परमेश्वरें कां केला प्रभव । म्हणोनि ज्ञान वेगळें ॥ ७६६ ॥ येथें षड्शास्त्रांचि व्यावृती । तरी म्हणाल तुमची कवण भक्ती । तें आईका ज्ञान स्थिती । सांगेन आतां ॥ ७६७ ॥

॥ प्र० ६४ भक्ती ज्ञानस्थिती वर्णन ॥

'एकादशे'

न पारमेष्ठ्यं न महींद्रधिष्ण्यं
न सार्वभौमं न रसाधिपत्यं ।
न योगसिद्धीर्न पुनर्भवं वा
मय्यर्पितात्मेच्छतिमद्विनान्यत् ॥ २३८ ॥

'पारमेष्ठ्य' तें वेदांत म्हणिजे । 'महींद्र' ते धर्मशास्त्र जाणिजे । 'सार्वभौम' तें कामशास्त्र बोलिजे । 'रासाधिपत्य' ते सांख्य ॥ ७६९ ॥ 'योगसिधि' तें योगसाध्य । 'निश्रेयस' तो न्याय भेद । हें अपुनर्भवपद । न इच्छी भक्त ॥ ७७० ॥ हीं षड्‌ दर्शन साध्यें । तीं बोलिलीं माहा बुद्धें । परी आपलें तें शुद्ध । बोलिले भक्ता ॥७७१ सांगेन मागिल ज्ञानाची खूण । ज्ञान दिधलें 'उद्धवार्जुन' । हे वेदा वेगळें ज्ञान । असें चतुर्युगीं ॥ ७७२ ॥

"गीतायां"

॥ श्रीभगवानुवाच ॥

इमं विवस्वते योगं प्रोक्तवानहमव्ययं ॥
विवस्वान्मनवे प्राह मनुरिक्ष्वाकवेऽब्रवीत् ॥२३९॥

हा आम्ही 'विवस्वता' प्रती । योग निरोपिला निगुती ।

तेणें आपुल्या उक्ती । सांगितला ' मनुस ' ॥ ७७४ ॥ तेणें 'मनुनें' आईका । निरोपिलें 'इक्ष्वादिका'। तेणें कथिलें लोका । नेणोनिया ॥ ७७५ ॥

"गीतायां"

**एवं परंपराप्राप्तमिमं राजर्षयो विदुः ॥**
**स कालेनेह महता योगो नष्टः परंतप ॥ २४० ॥**

ऐशियापरी आईका । ' राजऋषी ' जनकादिका । तो येणे काळें करूनि देखा । योग नष्ट जाला ॥ ७७७ ॥

**स एवायं मया तेऽद्य योनः प्रोक्तः पुरातनः ॥**
**भक्तोसि मे सखा चेति रहस्यं ह्येतदुत्तमं ॥२४१॥**

तोचि योग आतां । तुज सांगिजता ये पार्था । भक्त सांगती सर्वथा । म्हणोनियां ॥ ७७९ ॥ हे रहस्य ज्ञान आईके । उत्तमाचें उत्तम विशेखें । तें तुज सांगितलें निके । जाण अर्जुना ॥ ७८० ॥

"गीतायां"

**यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत ॥**
**अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहं ॥२४२॥**

अगौज धर्म दिसे बुडत । आणि अधर्माचा उपजे वृच । तैं मी आपणयातें सृजित । होय अर्जुना ॥ ७८२ ॥ येथें धीर धरावा श्रोता । म्हणाल कवण कांहीं सांगता । तो निवाड होईल आतां । सुजाणासी ॥ ७८३ ॥ परमेश्वर मोक्ष दाता । जीवाशी होय ज्ञान देता । चहूंयुगीं होय उद्धरिता । तो ओळखीजे ॥ ७८४ ॥ हे साक्षा गीता, भागवतीं, । भविष्य, कल्प, वेदश्रुती, । आणिक सकळांही मती । बोलिली असे ॥ ७८५ ॥

"दशमे करभाजन"

कृते शुक्ला हरिर्ज्ञेयस्त्रेतायां रक्तवर्णवान् ॥
द्वापरे नीलवर्णश्च पीतवर्णः कलौ युगे ॥ २४३ ॥

॥ प्र० ६५ चहूंयुगीं शक गणना ॥

चहूंयुगीं शकगण। चंद्रावर पडे बान (१५)। ते संख्या आ्कती सुजान। चित्त देउनी ॥ ७८७ ॥ कृतयुगी विशेषक (३)। त्रेती असती (४) कळापक। द्वापरीं युग्म (२) कळीं कुलक (६) शक जाणा ॥ ७८८ ॥ 'मनु' वर्षे पांच लक्ष। 'मांधाता' तो एक लक्ष। 'मुचकंद' सवीस लक्ष। कृतयुगसंख्या ॥७८९॥ 'बळी दशलक्ष जाणिजे। 'वेणु' चारलक्ष म्हणिजे। 'धुंधुमार' दोन लक्ष पाहिजे। तीस सहस्र उणे ॥७९०॥ तीस सहस्र 'रघु'। ऐवं त्रेता युग अवघु। द्वापरीं दोन सहस्र 'ऋषभु'। 'भरतें' युगसंपे ॥ ७९१ ॥ कलियुगीं काळ ज्ञान। गत भविष्य वर्तमान। ते साही शक जाण। कवण कवण ॥ ७९२ ॥

"ज्योतिषे"

युधिष्ठिरो विक्रमशालिवाहनौ
ततो नृपस्थो विजयाभिनंदनः ॥
ततस्तु नागार्जुनकल्किभूपती
कलौ षडेते शककारका नृपाः ॥ २४४ ॥
क्रमेण वेदाब्धि (विधि) करव वह्नयश्च
शराऽग्निचंद्रा खखखाऽष्टभूमयः ॥
ततोयुतं लक्षचतुष्टयंच
शशिद्विनागाः शककालसंख्या ॥ २४५ ॥

हे साही शक अनुक्रम। तैसाचि जाणावा काळ नेम।

चवेनाळीस तीन सहस्र सम । 'युधिष्ठिर' शक ॥ ७९५ ॥ ' विक्रम ' एकशत पंचविस । आठरा सहस्र ' पुत्र' शेष । अयुत ' विजयाभी ' विशेष । ' नागार्जुन ' चार लक्ष ॥ ७९६ ॥ 'कलंकी' आठ शतें एकवीस । हे कलिसंख्या अशेष । आतां गत कलिशेष । सांगेन आईका ॥७९७॥ वेद सहस्र ऋषीशत । बेताळीस असें गणीत (४७४२) । तैं ग्रंथ संपूर्णत । दर्शन प्रकाश ॥ ७९८ ॥

॥ प्र० ६३ कलिभविष्य कथन. ॥

एकतीस सहस्र एकुण्यायसी । इतुका काळ होईल कलिसी । तै उठवील नागार्जुनासी । कनेरी शिष्य ७९९ इतुकीं गतकलि वर्तमान । तैं नगरीं राज्य करी नागार्जुन । तें नगर द्वारके समान । महाऋद्धिपूर्ते ॥ ८०० ॥ तें नगर छत्तीस योजन । तप्ती (तापी) संगमापासून । सेंदुरागिरी पर्यंत जाण । रचना होईल ॥ ८०१ ॥ तप्ती संगम सेंदुरा गिर । दक्षणें असे मेघाकर (मेंकर) । हे तिन्ही नगर महाद्वार । भविष्यीं बोलिलीं ॥ ८०२ ॥ तें तीर्थ महा विशेष । तेंथ ज्ञान मार्गाचा राहिवास । ते वंदिती पीत वर्ण परेश । जो चहूंयुगीं असे ॥ ८०३ ॥

" तथाच भविष्योत्तरपुराणे "

यद्भौ परमेश्वरस्य मनुजो द्वीपे च जांबूद्भवे
आर्यावर्तसुदेशगौतमितटे वामे दिशा कीर्तिता ॥
विंध्याशैलसमीपखेडविशदप्रांतं पुरं ऋद्धिकं (र)
नामाख्य द्विजविद्भवेति विबुधो भक्तिप्रदो मुक्तिदः

...यभूमिचे ठाईं परमेश्वर । मनुष्यरूपें अवतार । जलां जंबुद्वीपा माझार । तेंथ अरीख भाषा ॥ ८०५ ॥ गौतमीहुनि

वांमांगी देशे । तेंथ विझां ( विध्या ) चळ समीप दिशे । खेड प्रसिद्ध ऋद्धिपुर असें । नावें द्विज चिद्धव ॥८०६॥ तोविबुध भाक्ति मुक्तीचा दाता । परी हे लोक तुज नेणती तया अनंता । हे साक्षी ‘ विवेक सिद्धी ’ तत्वता । आणि ‘ भाविष्यपुराणीं ’ ॥ ८०७ ॥ आणि षडांगवेद । हा एकावन ग्रंथ भेद । ईतुके याचा ठाईं साक्षी प्रसिद्ध । बोलिली असे ॥ ८०८ ॥

“ तथाच भागवते ”

शुक्लं कृते वर बुधा निगदंति देवं ।
त्रेतारुणं तदपरेशजलांबुदाभं ॥
पीतं कलौ समदमांत्रिकवेदतंत्रैः–
संकीर्तनैरिति भिदा पुरुषं यजन्ति ॥ २४७ ॥

सनकादिक देव बोलणें । परमेश्वराचें अवतरणें । चहूं युगीं असें जाणें । ऐसे सांगितलें ॥ ८१० ॥ ऐसें ज्ञानामध्यें ज्ञानवर । भक्तिमध्यें भक्तिसार । पदामध्यें पद थोर । मोक्षपद ॥ ८११ ॥ येथें न धरावा अभिमान । जरी गुरु उपदेश जाला भिन्न । तरी सांपडे खुण । सार ज्ञानाची ८१२ सात्विकज्ञान तों अभेद । राजसज्ञानतो भेद-वाद । तामसज्ञान तों कर्मवाद । या वेगळें निर्गुण ८१३ चाऱ्ही भक्ती चार ज्ञानें । तयाचीं चतुर्विध पावनें । तया-मध्यें सार ज्ञानें । तो गुरु उपदेश ॥ ८१४ ॥

“ गीतायां ”

सर्वभूतेषु येनैकं भावमव्ययमीक्षते ॥
अविभक्तं विभक्तेषु तज्ज्ञानं विद्धि सात्त्विकं २४८

कोणीं एक वेदांतगुणे । सर्व भूतीं ऐक्य ऐसें म्हणें

विभक्ति अविभक्ति जाणे । तें सात्त्वीक ज्ञान ॥ ८१६ ॥

“ गीता ”

पृथक्त्वेन तु यज्ज्ञानं नानाभावान्पृथग्विधान् ॥
वेत्ति सर्वेषु भूतेषु तज्ज्ञानं विद्धि राजसं ॥२४९॥

प्रमाण मात्र ई शे (ठाईं) । जे स्थूळ सूक्ष्म कार्य असे ।
प्रपंच आत्मा भिन्न भिन्न दिसे । ते राजसज्ञान ॥८१८॥

“ गीतायां ”

यत्तु कृत्स्नवदेकस्मिन् कार्ये सक्तमहेतुकं ।
अतत्वार्थवदल्पंच तत्तामसमुदाहृतं ॥ २५० ॥

हें सकळीक जें कांहीं । तें अवघे मीच बुझें पाहीं ।
अल्प मतीचा देही ॥ तामस ज्ञानी ॥८२०॥

“ गीतायां ”

परंभूयः प्रवक्ष्यामि ज्ञानानां ज्ञानमुत्तमं ॥
यज्ज्ञात्वामुनयः सर्वे परांसिद्धिमितोगताः ॥२५१॥

मागुते सांगो ज्ञान पर । जे तीही ज्ञानाहुनी सार ।
जे जाणितले या मुनीश्वर । पावले परमसिद्धीं ॥ ८२२ ॥

“ गीता ”

इदं ज्ञानमुपाश्रित्य ममसाधर्म्यमागताः ॥
सर्गेपिनोपजायन्ते प्रलये न व्यथन्तिच ॥ २५२ ॥

माझें ज्ञान तो अंगिकारी । मज अनुसरे जो शरीरीं ।
तो संसरण संव्हारी । कधीं नवचे ॥ ८२४ ॥ त्रिविध
भक्ती हें साधन । तेणे साध्य पाविजे भिन्न । मागुतें होय
पतन । पुण्य सरलेया ॥ ८२५ ॥ हें पतनरूप भक्ती ।
सांडुनी धरावी निर्गुण गती । जे परमेश्वरातें यजती ।
तया पतन नाहीं ॥ ८२६ ॥

" गीतायां "

यजन्ते सात्विका देवान् यक्षरक्षांसि राजसाः ॥
प्रेतान् भूतगणांश्चान्ये यजन्ते तामसा जनाः ॥२५३॥

जे देव लोकांतें यजती । ते सात्विक श्रद्धेचे म्हाणिजती । आणि जे राजसभक्ती । ते वेगळी बोलिली ८२८ आणि यक्ष राक्षसा । जे यजती परियसां । ते श्रद्धा राजसा । मनुष्याचीं ॥ ८२९ ॥ आणि प्रेत भूतगणा । जे यजती अर्जुना । ते तामस श्रद्धेचे जाणा । मूढप्राणी ॥ ८३० ॥

" गीतायां "

ऊर्ध्वं गच्छन्ति सत्वस्था मध्ये तिष्ठन्ति राजसाः ॥
जघन्यगुणवृत्तिस्था अधो गच्छन्ति तामसाः ॥२५४॥

ऊर्ध्व गती सत्वस्था । मध्यें गती राजसा । जघन्य गती वृत्तिस्था । तामसासी अधोगती ॥ ८३२ ॥ चैतन्य वेर्‍ही ऊर्ध्व फळ । सात्विक पावे निर्मळ । राजसा मध्यें स्वर्गफळ । अधो गती तामतासी ॥ ८३३ ॥ राजस, तामस, सात्विक, भक्ति । या पतन रूपा बोलिजती । येथें तया नाहीं मुक्ती । परमेश्वराची ॥ ८३४ ॥

॥ गीता ॥

आब्रह्मभुवनाल्लोकाः पुनरावर्तिनोर्जुन ॥
मामुपेत्य तु कौंतेय पुनर्जन्म न विद्यत ॥ २५५ ॥

जे तया चिद्रूपात पावले । ते मागुते गर्भवासि आले । आणि माझि या प्राप्ति गेले । तया येणें नाहीं ॥ ८३६ ॥ ऐसीं जन्में गेलीं बहुतें । स्वर्ग नरक भोगित । येथें जन्म समर्पावें येक चित्ते । परमेश्वर आज्ञा ॥ ८३७ ॥

" गीता "

वासांसि जीर्णानि यथा विहाय
नवानि गृह्णाति नरोपराणि ॥
तथा शरीराणि विहाय जीर्णा-
न्यन्यानि संयाति नवानि देही ॥ २५६ ॥

जैसीं जुनीं सांडिजतीं वस्त्रें । नवीं घेईजती विचित्रें । तैसीं आत्मा घे नाना शरीरें । अर्जुनें सारखी ॥ ८३९ ॥ मनुष्य देही अर्जुन थोर । ब्राह्मण क्षत्रिय वैश्य शूद्र । चातुर्वर्ण्य कर्म निर्धार ॥ आईकां आतां ॥ ८४० ॥

॥ प्र० ६७ वर्णभेद ॥

" गीतायां "

ब्राह्मणक्षत्रियविशां शूद्राणां च परंतप ॥
कर्माणि प्रविभक्तानि स्वभावप्रभवैर्गुणैः ॥ २५७ ॥

ब्राह्मण क्षत्रिय अवधारी । वैश्य शूद्र चारी । याचे कर्म पृथक्काकारीं । सांगेन तुज ॥ ८४२ ॥ जयापासून जे निफजल । जाती कर्मै पैं गा जाले । स्वभावागुणा वेगळें । आईक पार्था ॥ ८४३ ॥

" गीतायां "

शमोदमस्तपः शौचं क्षान्तिरार्जवमेवच ॥
ज्ञानं विज्ञानमास्तिक्यं ब्रह्मकर्म स्वभावजं ॥ २५८ ॥

सकळ भूतीं शम । इंद्रयमनाचा नियम । ईश्वर विरहित धर्म्म । नानुष्ठिजो ॥ ८४५ ॥ तें तप बोलिजे पाहि । निर्मळ शुचिमंत देही । विशेष ज्ञानाचा ठाईं । जागत असें ॥ ८४६ ॥ शांतीतें अर्जुनें । हे ब्राह्मण स्वभाव लक्षणें । विस्तारलें विज्ञान जाणें । सहज कर्म ॥ ८४७ ॥

" गीतायां "

**शौर्यंतेजो धृतिर्दाक्ष्यं युद्धे चाप्यपलायनं ॥**
**दानमीश्वरभावश्च क्षात्रं कर्म स्वभावजं ॥ २५९ ॥**

शौर्यवंत आणि पराक्रमी । तेज शक्ती आणि उर्मी । धैर्यवंत आणि युद्धकर्मीं । मागा नसरे ॥ ८४९ ॥ ईश्वर परायण बुद्धी । दानदे नव्हे अपवादी । हे क्षत्रयाची स्वभाव सिद्धी । सहज कर्म ॥ ८५० ॥

" गीतायां "

**कृषिगोरक्षवाणिज्यं वैश्यकर्म स्वभावजं ॥**
**परिचर्यात्मकं कर्म शूद्रस्यापि स्वभावजं ॥ २६० ॥**

कृषी गोरक्ष वाणीषण । आणि क्रिय विक्रय वर्तत्ति ते जाण । सेवाधर्म विहित करण । शूद्रासी जाणा ॥८५२

" गीतायां "

**स्वे स्वे कर्मण्याभिरतः संसिद्धिं लभते नरः ॥**
**स्वकर्मनिरतः सिद्धिं यथा विन्दतितच्छृणु ॥ २६१ ॥**

आपुलालें स्वकर्म । कीं ज्ञान वर्णाश्रम धर्म । ते आपुला योनी फलनेम । श्रुति स्मृती चेनि पैंगा ॥ ८५३ ॥ हे चहूं वर्णाचे कर्म । तरी स्त्रीयांचा कवण धर्म । सदा पतिव्रता नेम । वर्तावे तेही ॥ ८५४ ॥ तया आठाही गती सम । परी तेथें फळें पावती विषम । उत्तम मध्यम आचार क्रम । स्वर्ग पावती ॥८५५ ॥

" गीता "

**हतोवा प्राप्स्यासिस्वर्गं जित्वावा भोक्ष्यसे महीम् ॥**
**तस्मादुत्तिष्ठ कौन्तेय युद्धाय कृतनिश्चयः ॥ २६२ ॥**

सन्मुख घाय पडलेया । स्वर्गप्राप्त होय क्षत्रिया ।

या कारणें उठी कौंतेया । संग्राम करी ॥ ७५६ ॥ परी कलयुगीं आचार वर्तन । न चलती हे गृहस्थजन । तरी कैसें स्वर्ग भूवन । पावतीतें ॥ ८५८ ॥ एसाही स्वर्ग पावलेया । मागुतें पतन असे तया । चौऱ्याशी नरक भोगावया । घालिती तेथें ॥ ८५९ ॥ शूद्र कोठे वसती । हे उत्तरा पंथें असती । तयासी शूद्र म्हणोन पाचारिती । कायस्थ शूद्र ॥ ८६० ॥ आतां महाराष्ट्र । रजक, न्हावी सुतार, । हे आदि करूनि शूद्राचार । वर्ततीते ॥ ८६१ ॥ या चहुंकर्माहुनि थोर असे । ते ब्रह्मविद्या गुरु मुखें प्रकाशे । तैं अज्ञान अंधकार नाशे । क्षणामाजी ॥ ८६२ ॥ तें जाणावें ब्रह्म विद्या ज्ञान । जें मोक्षाचें साध्य साधन । तेणें पारुखे आया गमन । जन्मां तरींचे ॥ ८६३ ॥ जीव जियेवेळीं सुख पावत । तिये वेळीं गर्व अहंकार भोगित । साधू संताते निंदित । अज्ञान पणें ॥ ८६४ ॥ तेचि क्षणें पावती आपदा । तेव्हेळीं म्हणती देवाधावे गोविंदा । साधुसंताचिया पदा । लागती वेळोवेळां ॥ ८६५ ॥ ऐसे क्षणोक्षणा काकुलती । म्हणोनि परमेश्वर असावा चित्ती । जें 'विदेहे' पुसिलीं मोक्ष स्थिती । कलयुगींची ॥ ८६६ ॥

॥ प्र० ६८ कलिस्थिती बर्णन ॥

कलियुगीं दोषाचें वर्तन । तरी कैसें होय उद्धरण । हे पुसले करभाजन । विदेह, जनकें, ॥ ८६७ ॥

"दशमे करभाजनः"

कलौदोषानिधे राजन्नस्ति ह्येको गुणोमहान् ॥
स्मरणादेव कृष्णस्य मुक्तबंधः परंव्रजेत् ॥ २३३ ॥

कलयुगीं बहु दोष प्रकट । तयामध्यें कृष्णस्मरण श्रेष्ट । तेणें मोक्ष पाविजे वरिष्ट । स्मरणानुरूप ॥ ८६९ ॥

"तथाच करभाजनः"

कृतादिषुप्रजा राजन् कलौमिच्छन्ति संभवम् ॥
कलौ खलु भविष्यन्ति परधर्मपरायणाः ॥ २६४ ॥

'नारायण'

ऐसे यां कलयुगांत । कृतयुगींचे जन इच्छित । जे अल्प काळें पारगत । होत असे ॥ ८७१ ॥ कलयुगीं आयुष्य शतवरुषे । तेतुला काळ अचरावा पुरुषें । तेणें मोक्ष गति विशेषें । म्हणोनि इच्छिती ॥८७२ ॥ परी जया युगांत । जैसा नाम रूप धरीत । तेंचि गुरु मुखे स्मरींत । तेणें मोक्ष पावे ॥८७३ ॥

॥ प्र० ६९ इंद्रिय अधिष्ठानें ॥

चौऱ्याशी लक्ष योनीत । मनुष्य देह विख्यात । तेथ चतुर्दश इंद्रिय वर्तत । पंधरावे अंतःकरण ॥८७४ ॥ आदि 'प्रजापती' चें अंतःकरण । बुद्धि असे 'शेषशयन'॥ मन चित्तीं, ब्रह्मा, विष्णु, । अहंकार 'रुद्र' ॥ ८७५॥ श्रोत्रीं 'चंद्र' नेत्रीं 'सूर्य' । रसने 'वरूण' घ्राणें 'वायु' । त्वचे अस्वीन 'देव, । जाण निरधारेंशी ॥ ८७६ ॥ वाचे 'वैश्वानर' । पाणि देवता 'इंद्र' पदीं 'विक्रम' उपस्थीं थोर 'प्रजापती' ॥ ८७७ ॥ आधारें 'नैऋृत्य' देवता । ऐसे अवघ्या मनुष्या वर्तता । तें देहज्ञानें सफळ होता । कुंठें संसृती ॥ ८७८ ॥ हें ज्ञान न सांगावें वेदपुरुषा । सांगावें चौगुणा मनुष्या । ऐसें जो जतन करी सायासा । तो मोक्ष पावे ॥ ८७९ ॥

" गीतायां "

इदं तेनातपस्काय नाभक्ताय कदाचन ॥
न चाशुश्रूषवे वाच्यं न चमांयोऽभ्यसूयाति ॥ २६५ ॥

श्रीकृष्णनाथ म्हणे पार्था ॥ तूं परहित अभक्ता ॥
निंदका अशुश्रुना ( पाल सेवाहीन ) । हे रहस्य सांगावे
॥ ८८१ ॥

" गीतायां "

तद्विद्धिप्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया ॥
उपदेक्ष्यन्ति ते ज्ञानं ज्ञानिनस्तत्त्व दर्शिनः ॥ २६६ ॥

तया ज्ञान उपाया कारणें । तयातें जाणूनि नमस्करणें ।
परी सेवा दास्य भाषणें । प्रसन्न होवावया ॥ ८८३ ॥
मग ते उपदेशिती तें ज्ञान । ते तत्वदर्शिय निर्वाण ।
जयाचेंनि पारुखें जन्म मरण । या जिवाचें ॥ ८८४ ॥
ऐसे हें तत्वदर्शिय मुनिश्वर । तयाचा त्रिविध संस्कार ।
तयाच्या भक्ता तोचि निरधार । बोलिला असे ॥८८५॥

॥ प्र० ७० त्रिविध संस्कार ॥

॥ तथ च ब्रह्मविद्योपनिषच्छ्रुतिः ॥

संस्कारस्त्रिविधः प्रोक्तो भूतले विजने वनं ॥
तथा जल मुनीनां च तद्भक्तानां च तादृशाः ॥२६७॥

सदा निक्षप करणें भूमिका । तोचि तया भक्तासी
देखा । जल वने जनादि आईका । अडनि सहज ॥८८७
जनसंस्कार चतुर्विध । तयाचा आईका निबंध । हे विज्ञान
श्वरी प्रसिद्ध । बोलिला असे ॥ ८८८ ॥

" तथाच विज्ञानेश्वरे "

विगतात्म शरीरं तु मनुष्यस्य धरातले ॥

**जले क्षिपति चाग्नौ वा वने तस्य सुहृज्जनः ॥२६८॥**

आत्मा गेल्या वरी । शरीर निक्षेपित धरा उदरी । जळा अथवा अग्नि भितरी । अथवा वनी ॥ ८९० ॥ हें जाणावे इतरमत । अखंड मनी बसे परमार्थ । तेंचि जीवाचे आत्महित । जें मागां बोलिलें ॥ ८९१ ॥ सकळांसी आदि परमेश्वर । तयाचा ज्ञानमार्ग थोर । ते नेणती गवा ( व्हा ) र । बोलती कैसे ॥ ८९२ ॥ या दर्शनांतें म्हणती अनुज । तें सकळासी साग्रज । या अर्थी निदर्शन सहज । दुर्योधनाचे ॥ ८९३ ॥

कर्णा आणि युधिष्ठिरा । दुर्योधन हासे निरंतर । तव मेंढा आणि खर । तयाचाचि पिता ॥ ८९४ ॥ जे जन पातकी प्रतिकूळ । ते वादे अहंकारे धरिती बळ । परते शत सहस्र वेळ । जिंतिले असती ॥ ८९५ ॥ जो सता करूनि साधूते जिंके । तो भस्मे अथवा लागे भिके । हे श्रीकृष्णनाथ सांगतां आईके । दुर्योधन तो ॥८९६ ॥ श्रीकृष्णे शिष्टाई झाल्यावर । मागितलें पंच नगर । मृत्तिका माखलें सुई अग्र । येतुकें नेदी ॥ ८९७ ॥

**' भारते '**

**सूच्यग्रेण सुतीक्ष्णेन यावद्धृत्स्याति मेदिनी ॥**
**तान(म)हं नाभिदास्यामि विना युद्धेन केशव॥८६९॥**

युद्धेविण कैसें देईजे । तव म्हणितिले कृष्ण राजें । एकादश शत सहस्र सहजे । जिंकिले तेही ॥ ८९९ ॥ तया बान भरा भितरीं । सांपडले ती तुम्ही दुराचारी । मारिती घरीचे घरीं । वेळ न लागता ॥ ९०० ॥

" भारते "

एकधा दशधा चैव शतधा च सहस्रधा ॥
वने पार्थ सरो वृष्टिदानवादिदिवौकसां ॥ २७० ॥

परमेश्वर भक्तातें । जे सदा सतावितें । तयासीं होय यहाघात बहुतें । परीचा पैं ॥ ९०२ ॥ म्हणोनि ईश्वराचें स्मरण । साधू संताचे भजन । तेणें होय उद्धरण । सृष्टी माजीं ॥ ९०३ ॥ तेथें सभानगर त्रिविध । जेथें जोहरी असती सुबुद्ध । एक डोळस एक अंध । अज्ञान ते ९०४ तया नुमटे ज्ञान । ते न भजती जेवी पाषाण । ये अर्थी दृष्टांत जाण । चंदनाचा ॥ ९०५ ॥ जैसे चंदन संन्निद्धी । वेणु पुष्कर नवेधी । तैसे प्रमादी वाणी सुबुद्धी । संचरे चिना ॥ ९०६ ॥ नातरी चंद्र निववी सकळा । चुन खडा तप्त होय आगळा । तैसे जना प्रतिकूळा । बुद्धि उपजें ॥ ९०७ ॥ भेटालिया कामधेनू चिंतामणी । न ओळखतां त्याजिलें दोन्ही । तैसे अज्ञान नेणुनि । निंदा करिती ॥ ९०८ ॥ जैसे तक्र दुधा एक वर्ण । तैसेचि हंस बक जाण । नातरी पितळ आणि सुवर्ण । पिवळे अवघे ॥ ९०९ ॥ नातरी अमृत आणि सुरा । अथवा कथील आणि खुरा । तथा गारा आणि वज्रा । सारिखे-पण ॥ ९१० ॥ येथ जाणतेनों न नपति यावे । एक थोर एकहीन जाणावे । परी नेणता न भुलावे । ज्ञावळे पणें ॥ ९११ ॥ जरी दिधला ज्ञान आरसा । अज्ञान अंधा न प्रकाशे आत्मठसा । एका सभाग्या डोळसा । वांचूनी ॥ ९१२ ॥ असो जयासी भाग्य थोर । तया येथें प्रकाशे सारासार । येरा न कळे प्रकार । अभाग्यासी

॥ ९१३ ॥ जैसा दर्पण देखे डोळस । निधान देखे पायाळ विशेष । तैसे जया ज्ञान ते मनुष्य । येर पशुवत ॥९१४ तरी ते मूळग्रंथ एकावन । तेथीची साक्षी ते प्रमाण । येर वाउगे जाण निरर्थक ॥ ९१५ ॥ एक हिंडती सप्त द्वीपावरी । परी तो न सांपडे श्रीहरी । ते आईका रचना सारी । सांगेन आतां ॥ ९१६ ॥

॥ प्र० ७१ पृथ्वी द्वीपादि वर्णन ॥

पृथ्वी रचना मत निर्धार । असे चौकोन चौरंगाकार । साडे सात कोडी (टीं) विस्तार । चहूंकडे ॥ ९१७ ॥

" तथाकवी "

**कृतं ब्रम्हाण्डगणितं मनुष्याणामनापदं ॥**
**सप्तचं कुलकं पंच मूल भूतंच कारकैः ॥ २७० ॥**

हे येत्ति ब्रह्मांडी संख्या अशेष । परीने परिसना होती कासाविस । मा अनंता ब्रह्मांडाचा विशेष । कैसा सांगावा ॥ ९१९ ॥ ऐसीं ब्रह्मांडे अनंतें । तीं अनतेचि गाणिली अनंते । ते संख्या आईकात श्रोते । जे सुजान ॥ ९२० ॥

॥ प्र० ७२ शून्य गाणेत ॥

सप्तशून्य ब्रम्हांड गणना । अष्टशून्य दशब्रह्मांडे जाणा । ग्रह (९) शून्य शतब्रम्हांड विचारणा । केली असे ९२१ ॥ दशशून्य सहस्र येक । रुद्र (११) शून्य दशसहस्र ऐक । द्वादश शून्य लक्षएक । दशलक्ष त्रयोदशे ॥९२२॥ कोडी एकीं ब्रह्मांडे चतुर्दश । दशकोडी पंचदश । अर्बुज (द) एक षट्दश (१६)। सप्त शे दशअर्बुज ॥ ९२३ ॥ पुराण ( १८ ) शून्य निर्बुज ( द ) जाणिज । एकूण वीस दश अर्बुज म्हणिज । वीस शून्य खर्व ब्रम्हांडें बोलिजे ॥

एकवीसें दश खर्व ॥ ९३४ ॥ बावीस ब्रम्हांडें महाखर्व ॥ तेवीस शून्य ब्रम्हांडें महादशखर्व । चोवीस शून्य ब्रम्हांडें पद्माव ॥ ९३५ ॥ सवीसेशून्य महापद्म । सतावीस शून्य महादशपद्म । अठ्ठावीस शून्य संखाव ( शंकु ) । ब्रम्हांड बोलिजे ॥ ९३६ ॥ दशसंख एकुंतीसे । महाशंख शून्य तिसे । महा दशशंख एकतिसे । बत्तीसे क्षौणी ॥९३७॥ तेतीसे दश क्षौणी । चौतीसे महाक्षौणी । पंचतीसे महादशक्षौणी । छत्तीसे क्षितीब्रम्हांडें ॥ ९३८ ॥ दशक्षिती ब्रम्हांड सतोतीसे । महाक्षिती अडोतीसे । महादश क्षिती एकुण चाळीसे ! चाळीसे निधीब्रम्हांड बोलिजे ॥९३९॥ एक ताळीसे दशनिधी ॥ बेताळिसे महानिधी ॥ त्रेताळिसे महा दशनिधी ॥ कल्प चोवेताळिसे ॥९४०॥ पंचेताळिसे दशकल्प ॥ सेताळिसे महाकल्प । सतेताळिसे महा दशकल्प । आठ्ठेताळीसे सागर ॥ ९४१ ॥ एकूण पंन्नासे दशसागर । पन्नासे महासागर । महादशसागर । एकावने ॥ ९४२ ॥ बावन शून्य अनंत म्हणिजे । त्रेपने दशअनंत जाणीजे । चोपने महाअनंत बोलिंजे ॥ पंचावने महादशअनंत ॥ ९४३ ॥ शून्यें वान सन्धा निक ( ५ ) आणि तेतुलेचि असती अंक । तरी गणना सकळीक । पदार्थ मात्र ॥ ९४४ ॥ ऐसी गणना बहुत । परी बोलिलो संकळीत । बहुत वदता संत । कोपती मज ॥ ९४५ ॥ येणेंचि अनंताचि महिमा । होय जीव देवताचि गणना । ज्ञानादि पांचही उत्तमा । रूप होय ॥ ९४६ ॥ अनंत सूर्य अनंत चंद्र । अनंत द्वीपें अनंत समुद्र । अनंता ब्रम्हांडी पदार्थ मात्र । गणना होय ॥

९४७ ॥ युग्म शून्य बानावरी पडत । शून्य परत्वभिन्न संख्या होत ॥ अंक (९) शून्य ब्रम्हांड गणित । ही दुसरी गणना ॥ ९४८ ॥

* ००००००००००;००००००००००; ॥
१० २०
००००००००००; ००००००००००; ०००००
३० ४०
०००००;००००० ॥
५० ५५

## ॥ प्र० ७३ पर्वत वर्णन ॥

अस्ताचला आणि उदयाचलाचे कोन । उत्तरे एका आड एक आले जाण । तया भवते सूर्याचे भ्रमण सदा असें ॥ ९४९ ॥ एक अष्ट पर्वत क्षुद्र । एक अष्ट असती महा थोर । हे सोळा ब्रह्मांडा भीतर । पर्वत जाणा ॥ ९५० ॥ चहूं दिशा नावें चाऱ्ही अचल । तया अलीकडे उदयाचळ । पश्चमे अस्ताचळ । उत्तरे लौकालोक (पर्वत) ॥ ९५१ ॥ दक्षणे मदिरा (मंदरा) चळ पर्वत । हे चाऱ्ही असती अंतर्गत ॥ अस्ताचळासी द्वार बोलत । तैसेचि उदयाचळीं ॥ ९५२ ॥ पाताळ विवर द्वारा । सूर्य करी येर झारा । चालावया सृष्टी च्याव्यापारा । आज्ञा प्रभुची ॥ ९५३ ॥ साठी लक्ष सूर्य प्रकाशे । तयापलीकडे अंधःकार असे । तयाही वरुते तेज प्रकाशे । थोरा शक्तिचें ॥ ९५४ ॥ सप्तद्वीपीं सूर्य प्रकाशे । तैसाचि पाताळीं विकासे । मेरु पुर्वे उघडे असे । सप्तद्वीपाची ॥ ९५५ ॥ पुर्वाचळा उदचळास ॥ मध्यें ते९.

कोडी पैस ॥ तेथोनि अस्ताचळ कोडी तीस । पश्चिमे कोडी तेरा ॥ ९५६ ॥ तैसेचि उत्तर दक्षण पर्वत चारी। तेरा तेरा कोडी पैस दोही अंतरी । मध्यें तीस कोडी अवधारी । एसी छपन कोडी ॥ ९५७ ॥ घटिकें एके चेनिमान । सूर्य कोडी एक करी गमन । तिसा घटीका तिस कोडी भ्रमण । अस्ताचळा पावे ॥ ९५८ ॥

आणिक एक मतांतर बुझ । चौदाकोडी एकी भुज । परी हे न घडे सहज । संख्या भेदे ॥ ९५९ ॥ तरी हे न घडे मसादीमत ॥ साडे सातकोटी भुज एक गणित । तयाचि वाटणी श्रोते आईकत । पूर्व उदयाचळ ॥ ९६० ॥ दोही अचळा मध्ये कोडी दोन । तेथोनि अस्ताचळ कोडी तीन । पाश्चिमाचळ कोडी दोन । भुज गणीत जालें ॥ ९६१ ॥ एके घटिके चाले दिंद्र । सतरालक्ष वेग वत्तर । सहा शते साठगांव निर्धार । आणि सार्ध योजने ( ३॥ ) ॥ ९६२ ॥ सूर्य तेज पांच लक्ष प्रकाशिलें । परी पाताळीं पृथ्वीनें आवरिलें । आकाशी आगळे विकाशिलें । ते महंत जाणती ॥ ९६३ यावेगळें जें तेज दिसे । अवघे पृथ्वी मंडळ प्रकाशे । तें विश्व शक्तीचें अंशें । व्यापार चालावया ॥ ९६४ ॥ षट् मास उत्तरायणी । सूर्य बैसे यमवहनी । आणि रात्रीं चंद्र वहनी । चाले वेगीं ॥ ९६५ ॥ यम वहनाचें चंद्रवहन । तेंचि हळु हळु पालटे जाण । तैसेच जाणावें दक्षणायन । याचेनि पालटे ॥ ९६६ ॥ मत एक उत्तरायण दक्षणायन । तै वक्रमार्गें ऋजु एक जाण ॥ हे सृष्टी चालावया कारण । तया व्यापारहा ॥ ९६७ ॥सप्तद्वीपी सप्तसमुद्र ।

नवखंडें अकरा रुद्र । आउठनद भद्र अरण्य चाऱ्हीं ॥ ९६८ ॥ नवग्रह अष्टकुळाचळ । चवदा रत्ने नव नागकुळ । बारा अदित्य सप्तपाताळ । एकवीस स्वर्ग ९६९ कश्यिप स्त्रिया तेरा । चौदा विद्या अवधारा । सप्तपाताळीं लोक विस्तारा । सप्तद्वीपीं कवण ॥ ९७० ॥ छपन कोडी पृथ्वी पसरु । साकोडी रुंदली सुमेरू । सतराकोडी व्यापिली समुद्र । तेराकोडी वनस्पती ॥ ९७१ ॥ नव कोडी रुंदली पर्वतीं । तेथ अकरा कोडी उरती । तयामध्यें नाना द्वीपावर्ती । रचना केली ॥ ९७२ ॥ जंबुद्वीपीं क्षार ( लवण ) समुद्र ऐकें । पालाशद्वीपीं ढोर समुद्र देख । कुशद्वीपीं सुर ( रा ) समुद्र ऐक । शाल्मद्वीपीं घृत समुद्र ॥ ९७३ ॥ कौंच द्वीपीं दधि समुद्र जाणिजे । अमळ द्वीपी पय समुद्र म्हणिजे । पुष्कर द्वीपी स्वादु समुद्र पाहिजे । ऐसीं सप्तद्वीपें ॥ ९७४ ॥ ब्रम्ह, नाग, महीखंड, । हिम, निशी, लक्ष्मीखंड, । निर्य, कूर्च, भरतखंड, । काशीखंड, दहावें ॥ ९७५ ॥ अमर, अडळ, अछेदक, । अविनाश, विभान, अभेदक, । तपनास्ती, बामाघोर, शुद्धक, । तत्पुरुष हनुमंत, अकरावा रुद्र ॥ ९७६ ॥ हे सांगितले अकरा रुद्र । आणिक असती महाभद्र । ते सांगताये मुनिंद्र । कवी डिंभ ॥ ९७७ ॥

" तथा शास्त्रान्तरेऽप्युक्तमस्ति "

प्रथमं धर्मरूपं च द्वितीयं नदकेश्वरं ॥
तृतीयं पशुपं साक्षाच्चतुर्थमृषभेश्वरं ॥ २७२ ॥
पंचमं जगदाराध्यं षष्ठंच बसवेश्वरं ॥
सप्तमं शशिसौभद्रं चाष्टमं भक्तवत्सलं ॥ २७३ ॥

**नवमं प्रथमधाधीशं दशमं मुक्तिदायकं ॥**
**एकादश शरीरांगं द्वादशैव वरप्रभुं ॥ २७४ ॥**
**सत्यकैलासवैकुण्ठशक्रसप्ततलानि वै ॥**
**चंद्रार्कमृत्युलोकाश्च भुवनानि चतुर्दश ॥ २७५ ॥**

हिम, रत्नागिरी, उदयाचळ, । गोमगिरी ( गोमेद ) अस्ताचळ । सवीळा गिरी, इंद्रनिळ । विंझ्यां ( ध्या ) चळ-आठवा पर्वत, ॥ ९८२ ॥ सवा लक्ष जंबुद्वीप परियसा । दोन लक्ष पलाशद्वीप सहसा । चारलक्ष कुशद्वीप विशेषा । शल्मली, द्वीप आठलक्ष ॥९८३॥ क्रौंच, सोळा लक्ष गणीत । अमळ, बत्तीस लक्ष । योजन वदत चौसष्टी पुष्कर, संकळीत । ही सप्तद्वीपें ॥९८४॥ एक मध्यें मेरुबोलिती । सप्तद्वीपें तयाभवतीं । परी हे नघडे रचना स्थिति । ब्रम्ह विद्या मतें ॥ ९८५ ॥ मेरु पर्लाकडे द्वीपें तीन । तैसींच दक्षणें, असती जाण । पूर्वे, सप्त पाताळे गहन । पश्चिमे, एकद्वीप ॥ ९८६ ॥ परी हा एक परिहारू । दुसरे सर्वांउतरे मेरू । हा ब्रम्हांड पुराणी निर्धारू । बोलिला असें ॥९८७॥ मेरु ऐल तळवटी । सप्त वृक्षाची ओळ गोमटी । तेचि द्वीपानावें सृष्टी । ठेवांले महाऋषी ॥ ९८८ ॥ ते सप्तद्वार्पी वेगळी निवाडे तयाभवते सप्त-समुद्राचे वेढे । आतां फिटावया सांकडे मत तिसरें ॥ ९८९ ॥ लसद्वीपा सप्त झाडें । द्वीपाहुनि द्वीप उच-वडे । हे बोलिले असे पुढें । एका भोंवते एक ॥९९०॥ जैसीया दुर्गाचिया पौवळी । तैसी सप्तद्वीपें वर्तुळा ओळी । द्वीपपरत्व समुद्र प्रभावळी । मध्यें जंबुद्वीप ॥ ९९१ ॥ ऐरावत, वासुकी, पौळिक, । दर्वेभु, ( वैज्ज ) दिग्गज्ज,

तक्षक, । यमदझातिक्षी, पुष्कर, ( शंख ) । हे नवनाग ॥ ९९२ ॥ अदिति, दिति, ( दनु ) । सेना, तिवैनता, ( विनता ) मिथुन, । भाना, जोगेश्वरी, सुप्रभाजाण । खडाग ( खडग ) नेत्रा ॥ ९९३ ॥ काळज्वरी, कनकरेखा, । भयविकासी, ऐका । तिये संतती नाहीं देखा । ऐसिया तेरा ॥ ९९४ ॥ अरुण, सूर्य, वेदांग, भानु । इंद्र, रवी, गभस्ति, यम जाणा । सुवर्णरेता, दिवाकर, विष्णु, मित्र, गणना । हे बारा सूर्य ॥ ९९५ ॥

" ज्योतिषे कस्यपी "

**अरुणो माघमासे तु सूर्यो वै फाल्गुने तथा ॥**
**चैत्रमासेपि वेदांगो भानुर्वैशाखतापनः ॥ २७६ ॥**
**ज्येष्ठमासे तपेदिंद्रश्चाषाढे तपते रविः ॥**
**गभस्तिः श्रावणे मासे यमो भाद्रपदे तथा ॥ २७७ ॥**
**स्वर्णरेताश्चाश्विने च कार्तिके च दिवाकरः ॥**
**मार्गशीर्षे तपेन्मित्रः पौषे विष्णुः सनातनः ॥ २७८ ॥**

क्षार समुद्र सवालक्ष । दोनलक्ष ढोर समुद्र । चार लक्ष सुर समुद्र आईक । आठ लक्ष घृत समुद्र ॥९९९॥ सोळा लक्ष दधि समुद्र जाणा । बत्तीस लक्ष पय समुद्र गणना । चौसष्ट लक्ष स्वादु समुद्र विचारणा । हे सप्त समुद्र ॥ १००० ॥ आईके नांव सप्त सागरा । लवण, इक्ष, सुरा, । घृत, ( सर्पि, ) दधी, सहावा क्षिरा, । सातवा नीर, समुद्र ॥ १००१ ॥

**लवणेक्षुसुराश्चैव सर्पिश्चैव दधिस्त ( त ) था ॥**
**क्षीरं चेति नीरश्चैव सप्तसागरमुच्यते ॥ २७९ ॥**

बद्रिकारण्य, पंचका, । कामिकारण्य, त्र्यंबका, । हे

अरण्य आईका । वेद संख्या ॥ १००३ ॥ आईका चैत्रारण्य, पूर्वे, । दक्षणें, गंधमादन, मिरवे । वैभ्रज,( वैरमाज ) पश्चिमे, सुहावे । ' उत्तरे, नंदारण्ये, ॥१००४॥

॥ उध्वास अरण्ये ॥

आणि द्वादश उध्वास यन । आईका अनुमान । तिये महा भ्यानक दारुण । तेथें कोणा रिगवेना ॥ १००५ ॥ प्रथम आपारण्यें, । दुसरे दिशारण्ये, । तीसरें तमारण्ये, । लोकारण्ये, चवथें ॥ १००६ ॥ त्रिकुटारण्ये, पांचवे । स्वर्गारण्ये, सहावे । अंतरारण्य, सातवे । आठवे यक्षारण्ये, ॥ १००७ ॥ मनुष्यारण्ये नववें । विध्वंसाअरण्ये दहावे । क्रूरमारण्ये, अकरावे । बारावे तळारण्ये, ॥ १००८ ॥

उध्वास.

ऐसी सृष्टी धांडोळिता । परी न तुटेचि संसृति व्यथा । एक परमेश्वर सिद्धांत मत्ता । वांचूनिया ॥ १००९ ॥ एक दाही दिशा धावत । परी न जोडेचि सिद्धांत मत । परमेश्वर कृपावंत । प्रसन्न होय जैं ॥ १०१० ॥ येरव्हीं घेतां पुराण गणित । नाहीं धवधनी तेथ । ते सांगता संख्या तुहुत । अठराची ॥ १०११ ॥

" द्वादश स्कंन्धे "

ब्राम्हं दशसहस्राणि, पाद्मं पंचोनषष्टि च ॥
श्रीवैष्णवं त्रयोविंशं चतुर्विंशति शैवकं ॥ २८० ॥

पद्मपुराण, पंचषट । भागवत ते दशाष्ट । विष्णु पुराण, तेवीस निष्ट । चौवी सहस्र शैवक ॥ १३ ॥

दशाष्टौ श्रीभागवतं नारदं पंचविंशति ॥
मार्कंण्डं नव वाह्नंच दशपंचचतुःशतं ॥ २८१ ॥

मार्कंड, ( वीस ) गिन्हे ( ? ) सहस्त्र जाणा । अवतार सहस्त्र ब्रम्ह पुराणा, । लिंग ते रुद्र संख्या गणना । ब्रम्हांड बारासहस्त्र ॥ १५ ॥

**चतुर्दश भविष्यं स्यात्तथा पंचशतानि च ॥**
**दशाष्टौ ब्रह्मवैवर्त लिङ्गमेकादशैवतु ॥ २८२ ॥**

अग्नी, सहस्त्रपंधरा, शतेंचार, । नारदपुराण, पंचवीस सहस्त्र, । भविष्यें पाचशतें, "रत्न संख्या कार" । अठरा ब्रम्हवैवर्तक, ॥ १०१७ ॥

**चतुर्विंशति वाराहमेकाशीतिसहस्त्रकं ॥**
**स्कदं शतं तथा चैकं वामनं दश कीर्तितम् ॥२८३॥**

दहासहस्त्र, वामन, । एकुणीसशतें, सौपर्ण, । कूर्म, सतरा सहश्रजाण । मत्स्य, सहस्त्रचौदा, ॥ १०१९ ॥

**कौर्मं सप्तदशाऽऽख्यातं मात्स्यं चैतच्चतुर्दश ॥**
**एकोनविंशत्सौपर्णं ब्रह्माण्डं द्वादशैव तत् ॥ २८४ ॥**

स्कंद पुराण, एक्यायशीसहस्त्र, शतजाणा । चोविस शतें, वराहापुराणा, । ऐशी लक्षचार गणना । आणि सहस्त्र दाहा, ॥१०२१ ॥

**एवं पुराणसंदोहश्चतुर्लक्षउदाहृतः ॥**
**रामायणं नारदीयं ख्यातं कवीतिहासकम् ॥ २८५ ॥**

आठरा पुराणाचा विशेष । षड्‍ सात्विकें सहा राजास । षड्‍ जाणिजे तामस । ऐसा त्रिविध भेद ॥ १०२३ ॥

**मात्स्यं कौर्मंतु वाराहं शैवं स्कंदं तथा परं ॥**
**अग्न्यंतानि षडेतानि तामसानि निबोधमे ॥ २८६ ॥**

मत्स्य. कूर्म, वराह, शिवे, । स्कंद, अग्नी. पुराण, बोलावे । तयाचें फळ असे बरवे । दु:खरूप ( ही तामसे )

**ब्रह्मांडं ब्रह्मवैवर्तमार्कण्डेयं तथापरं ॥**
**भविष्यं वामनं ब्राम्हं राजसानि निबोधमे ॥ २८७ ॥**

ब्रह्मांड, ब्रह्मवैवर्तक. जाण । मार्कंड. भविष्य. वामन, । सहावे ब्रह्मपुराण, । हीं सहा राजसें ॥ १०२७ ॥

**वैष्णवं नारदीयंच पाद्मं भागवतं तथा ॥**
**गरुडं वायवीयंच हरिवंशश्च सात्विकं ॥ २८८ ॥**

पुराण पद्म. नारद, विष्णु । भागवत, गरुड, वायु-पुराणु । हे सहा सात्विक जाणु । गणितेसी ॥ १०२९ ॥

**सात्विकं मोक्षदं प्रोक्तं राजसं स्वर्गदं स्मृतं ॥**
**तथैव तामसं ज्ञेयं निरयप्राप्तिहेतुकं ॥ २८९ ॥**

वैकुंठ, सत्यलोक । यासी कव्हनी एक म्हणती मोक्ष । तो पाविजे पुराणें सात्विक । राजसे स्वर्ग पाविजे ॥ १०३१ ॥ तामस पुराणाचें दुःखरूप । तें निरय फळ बोलिजे समिप । देवलोकीं ही निरय उमप । म्हणोनिया ॥ १०३२ ॥ ऐशीं हीं अठरा पुराणें । आगम वेद प्रमाणें । यांचें जंबुद्वीपीं वर्तणें । असे कर्मभूमीं १०३३ ॥ हे सांगितली चहूं युगीचि रचना । तरी ते आईका अनुक्रमणां । ते रचना सांगेन खुणा । तिथवार ॥ १०३४

**॥ प्र ० ७४ युगरचना काळनेम ॥**

कृष्णपक्ष, आश्विनमास । आणि 'प्रभव' पंचमी, दिवस । आदित्यवारीं, विशेष । ' कृतयुग' रचना ॥ १०३५ ॥ वैशाखमास, अक्षतृतीया । शुक्लपक्ष, असेतया । तैं 'त्रेतायुग निर्मिलें माया । ऐसें जाणा ॥ १०३६ ॥ आतां 'द्वापरयुग' प्रवेश । कृष्णपक्ष, माघमास, । अमावास्ये, चा दिवस । तैं प्रवेशलें ॥ १०३७ ॥ भाद्रपद, शुक्रवार ।

वद्य त्रयोदशी, निराधार । तैं 'कळयुगीं' सीं संचार । जाणावा श्रोता ॥ १०३८ ॥ तया युगांतजे दुष्टजन । ते पीडती साधुजन । ते आईका आख्यान । अनुक्रमें । ॥ १०३९ ॥ जो रजें, तमे काटला अंतरी । तो साधु संताचा द्वेषकरी । तरी मृत्यु आला झडकरी । ऐसें जाणावे ॥ १०४० ॥

॥ "तथोक्तं दशमे"

**ते वै रजःप्रकृतयस्तमसा मूढचेतसः ।**
**सतां विद्वेषमाचेरुरारादागतमृत्यवः ॥ २९० ॥**

तया संत महापुरुषांसी । व्यक्तिक्रमें करती अमान्यतेसी । तरी सर्व पुण्यराशी । नासती तयाचिया ॥ १०४२ ॥ लोक आशीर्वादाचें पुण्य । तरी धर्म ही जाय तत्क्षणें । ऐसें जाऊनी अपेशपणें । लक्ष्मी जाय तयाची ॥ १०४३ ॥ मग तो मृत्यु पावे । ह्मणोनि नेमें वर्तावे । नातरी पुराण आईकावें । जाणतेनि पुरुषें ॥ १०४४ ॥

"दशमे"

**आयुः श्रियं यशोधर्मं लोकानाशिष एवच ॥**
**हंति सर्वाणि श्रेयांसि पुंसो महदतिक्रमः ॥ २९१ ॥**

आणि जो पात्रापात्र न विचारी । तैसीच विसमता क्रियाकरी । तयासी विघ्नें येतीं झडकरी । वेळ न लागता ॥ १०४६ ॥ जो पूज्याते त्यजूनि भजे । अथवा अपूज्यातें आधी पूजे । तयासी तीन भाविष्य सहजें । होतलि देखा ॥ १०४७ ॥ घरीं, गांवीं, देशीं दुर्भिक्ष, । अखंड भय, चिंता, दुःख, । तिसरें मरण प्रत्यक्ष । होय तया ॥ १०४८ ॥

" दशमे "

**अपूज्या यत्रपूज्यन्ते पूज्यानांच व्यतिक्रमः ॥**
**त्रीणि तत्र भविष्यन्ति दुर्भिक्षं मरणं भयं ॥ २९२ ॥**

मातंगाही पस्यहीनें । न होवावे जाणतेनि जने । कांतो मातंग सद्गुणें । आगळा तया पस्ये ॥ १०५० ॥ तें आईका अख्यान । दुर्योधनें पाठविला पुरोचन । करावया दहन । पांडवांचें ॥ १०५१ ॥ तेणें मातंग बोलविला । घरीं नसता मातंगी घेऊन आला । तीयेचें चिन्ह देखुनि विस्मित जाला । दुर्योधन तो ॥ १०५२ ॥ तियेचे करी शूनेयाचि खापरी । एके करीं सिंचन करी । तव तो म्हणे तूं सर्व चांडाळी नारी । सिंचन कां करिती ॥ ॥ १०५३ ॥ ती म्हणे गौहत्या तृणजाळी अनेक । कन्या विकरा आणि निंदक । यावाटा गेलें असती अनेक । म्हणोनि सिंचते मही ॥ १०५४ ॥ मग ते गेली आपुलिया घरा । पुरोचनें अग्नि लाविला मंदीरा ( लाखागृहास )। ऐसेया जना नेती यमपुरा । कर्म भोगावया ॥ १०५५ ॥

" सप्तमस्कंधे "

**विप्राद्विषड्गुणयुतादरविंदनाभ–**
**पादारविंदविमुखाच्छ्वपचं वरिष्ठं ॥**
**मन्ये तदर्पितमनो वचने हितार्थ**
**प्राणं पुनाति सकुलं नतुभूरिमानः ॥२९३ ॥**

॥ " दुर्योधन उवाच " ॥

**कराधृतश्वाकपालि मदिरामांसभक्षिणि ॥**
**सर्व यातिषु (?) चांण्डालि कस्मात् सिंचासि मेदिनीं ॥**

॥ "मातंगी उवाच" ॥

**गोहन्ता तृणदाहीच कन्यामूल्यकरस्तथा ॥**
**निंदकास्ते गता मार्गे ततः सिंचामि मेदिनीं ॥ २५५ ॥**

चार वर्ण अठरा जाती । गृहस्थ धर्मे वर्तती नीती । ते पापावेगळे ये क्षिती । येर महा दोषी ॥ १०५९ ॥ आणि ' कामें, जु खेळणें, तस्करी, । ' कामें, वेश्या 'कामें, परद्वारी । ऐसे सप्त व्यसने अनाचारी । जैचे कमंडलु चोरं ॥ १०६० ॥

**द्यूतं च मद्यं पिशितं च वेश्या**
**पापर्द्धिचौर्य परदारसेवा ॥**
**एतानि सप्त व्यसनानि नित्यं**
**घोरातिघोरे नरके पचंति ॥ २९६ ॥**

अंतर बाह्य सदा क्रूरी । तेणें साधू संत न विचारीं । ते सदा दुःखी नरक द्वारीं । जैसे हंस डिंभ ॥ १०६२ ॥ लोभे कीर्ति पात्रें सुपात्रें केवळें । तयासी नेदी कांहीं कवणे काळे । धन संपत्ती वृथा जाय सकळे । जैसा लुब्धप्राणी ॥ १०६३ ॥ काम, क्रोध, लोभ, उर्मी, । त्यजोनि असावे गृहस्थ धर्मीं । तेणें सुखें असे आश्रर्मी । येऱ्हवी नासती पुण्य ॥ १०६४ ॥

॥ "गीतायां" ॥

**त्रिविधं नरकस्येदं द्वारं नाशनमात्मनः ॥**
**कामः क्रोधस्तथालोभतस्मादेतत् त्रयं त्यजेत् ॥२९७॥**

ब्रम्हदंताचे कुमर । हंसडिंभ महाविर । त्यांही दूषिले ऋषीभर । अज्ञान बुद्धी ॥ १०६६ ॥ ते ऋषेश्वरातें म्हणतें जाले । तुम्हीं कारे गृहस्थाश्रम त्यजीले । म्हणौनी कमंडलु

फोडीलें । सकळऋषींचे १०६७ तेणें पापें यमुने बुडाला । एक पोटीं सुरी घालिता जाला ऐसा दोहीस मृत्य आला । महा पातकी ते ॥ १०६८ ॥ म्हणोनि साधू निंदा न कीजे । तेणें सदा सुखी असीजे । एरव्ही अभावी पडिजें। महानरकीं ॥ १०६९ ॥ सन दान करी अनेक । परी वाचे शुभ न बोले एक । तो पावला शूकरमुख । तो देखिला भीमसेनें ॥ १०७० ॥

एकांते वसातिनित्यं गंधमादनपर्बते ॥
किमर्थं कांचनः कायः किमर्थं शुकरो मुखः २९८
बहुदानान्यहं दत्वा रत्ननीमहि सागरः ॥
नोक्तवान् शुभवाक्यंतु तेनमे शुकरो मुखः २९९

पुण्य कोपटी पापें धवलार। पुण्य माळबरड पाप गिरी-बर तयामध्यें निंदा महाथोर। तयाचे फळ आईका १०७३ सदा साधू निंदा आणि द्वेष । त्या सर्व काळीं दुःख आपेश वादीं संग्रामीं नाहीं येंश । हानी होय वेवसाई ॥ १०७४॥ वाणिज्य करी तरी सोळाचे बारा । खेती करी तरी नें तृणिं भारा । इहलोकीं येश नाहीं गवारा । तो मूढ प्राणी ॥ १०७५ ॥ पारधा जाय तरी लागे खुबा (नावेपक्षी) योग करी तरी आप मुख्यउभा । तयासी नाहीं शोभा । असिध्य कारक ॥ १७६ जरी उग्र तपकरी अभंगे । तरी देह होय चौरंगे । लक्ष्मी इंद्र चंद्र योगें । चंदयासी, केलें (?) ॥ १०७७ ॥ आणि त्रिदेह पावे । तरी आपुले निसी सिकस्त करावें । लक्ष्मणें केले नवे शूर्प-नखींचें ॥ १०७८ ॥ आणि कांते गिळूं पाहे । तरी तो फोडूनि जाय । हें हनुमंते केलें आहे । असाळींयेसी (?) ॥१०७९॥

जरी सामर्थे असे बहुत । अंतरिक्ष जाऊनि अग्नी विजवित (ता) । तेणें हनुमंतें केलें विख्यात । पुसें (च्छें) करूनिया ॥ १०८० ॥ साधु निंदा करील जाय । तयासी ऐसेंच होय । आणि निरय देह लाहे । तेथें दुःखे विचित्रें ॥ १०८१ ॥ म्हणोनि पुण्य दशांशें वाढत । पाप आढे अगाणित । तें सांगेंन प्रमी (ची) त । ऐका आतां ॥ १०८२ ॥ अहो नारदाची नारदी जाली । तिनें बहुतें दुःखे भोगिलीं । ते दुःखें सांगो नेणिजे बोलीं । श्रोते कंटाळती ॥ १०८३ ॥ एकवेळ स्त्री गागितली । तेणें त्रेसटें वर्षे भोगिलीं । लेंकुरवें होता थोर दुःखें जाली । मरता तयाहुनि ॥ १०८४ ॥ नाहीं चोळी लुगडें । तेणें गुप्त अंग दिसे उघडे । भुकेचे थोर कडाडे । ते दुःख काय सांगो ॥ १०८५ ॥ सदा करी दळा कांडा । मोळिया वाहे अखंडा । तिहीं ऋतुंचें दुःख प्रचंडा । घर नाहीं ॥ १०८६ ॥ परी तो देवऋषी ब्रह्मसुत । चहुं युगीं असे वर्तत । तयाची थोर ख्यात । देवां मध्यें ॥ १०८७ ॥ तो देवऋषी माजी वरीष्ट । विभूती अध्यांई जयाची प्रतिष्ठा । येऱ्हवीं शूकर होता । बहुते वेळे ॥ १०८८ ॥ जन्मेजय निंदा करिता । तेणें घडल्या अठरा हत्या । ते पापें जाला फेडिता । भारत श्रवणें ॥ १०८९ ॥ विश्रांती प्रसंगीं राज्यें दोनी । ऋषीं कमंडलु नेले चोरूनि ते जळीं मत्स्य होउनी । राहिले होते ॥ १०९० ॥ याग केले बर्वेया ओजा । ऋषी बिगारी आपुल्या काजा । तेणें पापें सर्प जाला राजा । तो देखील पांडवीं ॥ १०९१ ॥ कपिल ऋषी

केलों खस्ता । तेणें भस्म जाले समस्ता । ते अद्याषि ज-
ळता । विझेचिना ॥ १०९२ ॥ अहो परिक्षितीनें सळा
सर्प घातला ऋषी गळां । सातवे दिनीं सर्पे जाला व्या-
कुळा । मृत्यपावला ॥ १०९३ ॥ म्हणोनि ओखटें न
बोलावें । अतीतां दुःखनेदावे हें जाणतेंनि जाणावें । ने-
णती मूर्ख ॥ १०९४ ॥ साहा शास्त्रे चार वेद । अठ-
रा पुराणें आगम भेद । चौदा विद्या कुडें कषट बहुविध
। जीवें काय करावें ॥ १०९५ ॥ येतुकेयाची सेहताळी-
स मतें । एक एक मतीं भेद बहुतें । म्हणोनि भुलले
अनंते । नाना मतीं ॥ १०९६ ॥ ते भुली फेडुनि पर-
मेश्वरातें जाणें । तोचि बुझला गुरू खुणें । येर वायाचि
हालवी मानें । नेणती कांहीं ॥ १०९७ ॥ एक साधू निंदा
करित । सभेचे लोक न वारित । तयासी होय· घात ॥
सदा सर्वदां ॥ १०९८ ॥ ते निंदक आपण्यासहित
बेताळीस नरकीं पडत । चंद्र सुर्यांचि मर्यादा भोगित
। महा पातकी ते ॥ १०९९ ॥ म्हणोनि जाणता लोक
। निंदा करी आईक । करितया वारी एक । तो पुण्य
पुरुष॥ १०० ॥ऊ मारिली एके काळीं । तो बारावर्षे दिधला
सुळीं । तो काढिला चंद्रमौळी । परी पाप राहिसे ॥ १॥
अहिल्या अभिलाषु आला । तो गौतमें भगेंद्र केला ।
तेणें नांव पावला । भगेंद्रऐसें ॥ ११०२ ॥ वारिलें अनु-
नुसया नंदनें । ते मोडिले सासार्जुनें । तेणें मारिले दोघे
जनें । तोही मृत्यु पावला ॥ ३ ॥ ऐसें जे कुबुद्धी
वर्ततीं । ते कल्पांतीं दुःखावेगळे न होती । सदा दुःख-

दर यमभोगिती । मग यमपुरीं ॥ ४ ॥ परमेश्वरातें देव । आगमा नकळे तयाचे ठेव । ब्रह्मादिक नेणती भाव । तेथ ऋषी केउते ॥ ५ ॥ दर्शना लागले विवाद । लोका न कळतां जाले नाना भेद । म्हणोनि गौप्य परमेश्वर पद । नकळे कवणा ॥ ६ ॥ ऐसा निराकार आदि पुरुष । तो साकार जाला कृपावश । दिध- ला ज्ञान उपदेश । सृष्टी आदि ॥ ७ ॥ तेथोंनि मार्ग चतुर्युगीं वर्तत । ऐसीं युगें गेलीं बहुत । जैसे सातही वार फिरत । सर्वकाळीं ॥ ८ ॥ त्यां आदिपुरुषाच्या मार्गासि जें । म्हणती अपर अनुजे । परी तो सकळाहुनि साग्रजे । दुर्योधन न्यायें ॥ ९ ॥ आणि श्रीकृष्णनाथाचिया लिळा । रुक्मिया हांसे वेळोवेळां । बहुत बोले आगळा । म्हणे मीच जिंकेना ॥ १११० ॥ तव तेणेंचि हाराविले । एके मिशे अर्ध खांड केले । डोईचे पांच पाट काढिले । नापीक वंश जाला ॥ ११ ॥ स्त्रि अथवा पुरुष । साधूसंतीं घडे रजे डंभे (दंभें) दोष । तो दुःखें भोगिती बहुचस । सदा सर्वदां ॥ ॥१२॥ एक थोटी, मुकी, पांगुळे, । एक बधिरे, आंधळे, विकाळे । एकें कर्ण फोडे पोटसुळे, । एके बीनीसिकस्तें (?) । ॥ १३ ॥ एका कुष्ट, खतें खांडुके, । धातुक्षयो, जलो- दरादि अनेके । ऐसे नाना रोग शतसहस्र आईके । होताति देखा ॥ १४ ॥ एका कन्या पुत्र नव्हती । एका होउनी नास्ती होती । एका नाहीं भ्रतार संगती । एका नाहीं स्त्री ॥ १११५ ॥ ऐसीं पापें बहु विधु । ते सांगतां कोपतील साधु । परि कर्म विपाकीं प्रसिद्ध । बोलिले असे ॥ १६ ॥ ऐसीं लक्ष कोटी अनेकें । तेतुका ज्ञानिये

जाणतां पातके । तया प्रती सांगता नव्हे निके । म्हणोनि अल्पें ॥ १७ ॥

॥ प्र० ७५ गृहस्थ धर्मनिती ॥

आतां गृहस्थ धर्माची नीती । जे स्त्री पुरुष वर्तती । तयासी पवीत्र गती । बोलिली असे ॥ १८ ॥ जे भार्या सद्गुणी नित्य आचरे । तें पवित्र कुळ उद्धरे । ते आपण्यातें तारे । हे काइ म्हणावे असें ॥ १९ ॥ तरी ते सद्गुण कवण । पती कार्य मैत्रीपण । पती कारणीं अंगें दास्य करण । शयनी जैसी रंभा ॥ ११२० ॥ स्नेहीं जैसा माता स्नेहाळु । क्षमा जैसी धारित्री अढळु । परमेश्वर धर्मीं अनुकुळु । नीती मंत तें ॥ २१ ॥ जो पुरुष निती आचरे अभंगा । तयाचे आगमन इच्छीं गंगा । पातकें फिटावया योगा । पदीं राहीली ॥ २२ ॥ तरी तें आचरण कवण । परद्रव्यीं नाहीं अभीलाषण । परस्त्री नपुंसकपण नाहीं परद्रोह ॥ २३ ॥ अहो जो जनामध्यें असूनी । जे पुरुष पावती स्वर्ग भवनीं । तयाचीं ओळखी चौ चिन्हीं । येचि लोकीं ॥ २५ ॥

स्वर्गच्युतानामिह जीवलोके
चत्वारि चिन्हानि वसंतिदेहे ॥
दानप्रसंगो मधुरा च वाणी
देवार्चनं साधुषु पूज्यताच ॥ ३०० ॥

तरी ते चार चिन्हें कवणें । दान, वाचा, मधुर बोलणें । देवार्चन, साधू पुजनें । हे स्वर्ग ओळखी ॥२६॥ हे नीति मंता नाहीं चित्तीं । ते पुरुष जाती अधोगती । ते आईका पुराण विख्याती । बोलिली असे ॥ २७ ॥

असोनि याचि लोकीं । जो पुरुष पडेल नरकीं । तयाचि चौ चिन्हीं ओळखी । येचि देहीं जाणा ॥ २८ ॥

नरकच्युतानामिह जीव लोके
चत्वारि चिन्हानि वसंतिदेहे
न दानसंगः कुटिलाच वाणी
देवार्चनं साधुषु पूज्यता न ॥ २०१ ॥

तरीते चाऱ्ही चिन्हें कैसीं । नेदी दान कुटिळ वाचेसी । जनबंध वर्ते दरिद्रेसी । हीं नरक चिन्हें ॥ ३० ॥ अहो उद्दालकाची स्त्री । तो कर म्हणें ती ते न करी । वारिलें तें सदाकरी तेणें खेद खिन्न जाला ॥ ३१ ॥ तेणें पापें वनांतरी । शिळा जाली ते सुंदरी । तेथ पांडवासहित हरि । स्पर्शे उद्धरली ॥ ३२ ॥ जुहारविलें एके ब्राम्हणें तो स्त्रियेसि मागे भूषणें । ते तयासी नेदीचि लेणें । मग- जुवारी पिडला तो ॥ ३३ ॥ तेणें पापें जाली दुर्द(दुर्द)र आलिका । कागटोची तया मृत्यलोका । आणि सुतारें तासिली ते आळीका । ऐसें दुःख भोगीत असे ॥ ३४ ॥ आणि धर्म साक्षे कारण । गोंड ग्रामासी आला ब्राम्हण । तेथें तेणें गोंडें केला सन्मान । गोंडणी शिव्या दिधलिया ॥ ३५ ॥ तेणें ते जाली अंधशूकर । गोंड तो जाला राज- कुमर । ऐसें धर्माचें फळसार । असें जाणा ॥ ३६ ॥ तयाचें पद इच्छी गंगा । ऐसें सामर्थ्य नाहीं गृहस्थ मार्गा । परमेश्वर हस्तक योगा । वाचूनिया ॥३७॥ तो आपुलें मन तदर्पित । आणि तयाचें वचन न मानि हित । ऐसे जे गृ- हस्थ पुनीत । ते उद्धरिती कुळा ॥ ३८ ॥ जो ब्राम्हण बारागुणी आगळा । परमेश्वर भक्ति वेगळा । तयाहुनी

स्वपच ( मातंग ) उत्तम लिळा । बहुता परी ॥ ३९ ॥ कां तेणें आपुलें मन ईश्वरीं आर्पिलें । तयाचें वचन हित मानिलें । तेणें आपुलें कुळ पवित्र केलें । ब्रम्हापदीं बैसे तो ॥ ४० ॥

" तथाच सप्तमस्कंधे "

॥ ' नारद उवाच ' ॥

न जातिः कारणं तात गुणाः कैवल्यहेतवः ॥
व्रतस्थोपि हि चाण्डालः सोपि स्वर्गमवाप्नुयात् ॥३०२

ह्मणोनि सकळ लोक उत्तम । परमेश्वर भक्ती करी नेम । ने पद पावती मोक्षा सम । श्रीकृष्ण ह्मणे ॥ ४२ ॥ तयामध्यें ध्यान त्याग शुद्ध । तेणें पावती परम पद । तया नाहीं मागुता दुःख भेद । कल्पांतींही ॥ ४३ ॥ या कारणें गुरू करावा वेगें । येऱ्हवीं जे जन्मले गेले अवघे । तया कारणें धावाधाव करावी लागे । जव मनुष्य-देह आहे ॥ ४४ ॥ म्हणोनि भावें करावी भक्ती । तेणें महा पातकें नाशती । होय परमेश्वर मुक्ती । ज्ञानें करू-नियां ॥ ४२ ॥ ज्ञान जाले 'उध्वा' 'अर्जुना, । 'यदु' 'आरळका' राणा । 'मुचुकुंदा' ज्ञान जालें जाणा । मोक्षा नेलें ॥ ४६ ॥ पूर्वीं भक्ती केली वसुदेवें । जें परब्रम्ह उदरा यावें । तेंच साच केलें कृपाळुवे । द्वापर युगीं ॥ ४७ ॥ अन्न वस्त्र दिधलें ऋषी । तेणें पुण्य थालीं परियसी । वस्त्रें पुरविलीं हृषीकेशीं । तेणें निमित्य ॥ ४८ तयाचें जाणावें मोक्षपद । तें नव्हे स्वर्ग; वैकुंठ, क्षीराब्ध । जे मोक्षा गेलेया प्रसिद्ध । न येती मागुते ॥ ४९ ॥ अर्जुन सातही कुमर । देखुनी आला क्षीर सागर । आणि

जय विजय दैत्य अपार । आले देखुनिया ॥ २० ॥
म्हणोनि नव्हे मोक्षाचीं लक्षणें । या कारणें ज्ञानी गुरु करणें।
मग जाणिजेल साक्षी प्रमाणें । पर ब्रम्हतें ॥ ५१ ॥
तेथ मोक्ष नाहीं प्रसिद्ध । परमेश्वर सकळासि आद्य । हें
बोलिलें गीता उपनिषद । सत्य जाणा ॥ ५२ ॥ अहो ब्र-
म्हहत्या जन्मो जया । भारते सांगितली ते तया । तेणें
हत्या फिटूनि गेलिया । देव भक्त संबंधें ॥ ५३॥ तेथें
व्यासादि महा जाणते आईक । असतां गंगादि तीर्थें अ-
नेक । परी तो उपाय न सांगती च देख । न फिटती
म्हणोनी ॥ ५४ ॥ परिक्षितीं शाप दुषण । अधोगर्ता
होईल मरण । तेथें व्यास सांगता जाला आपण । वि-
धान तयाप्रती ॥ ५५ ॥ तो शुक देवाचेनि मुखें । भाग-
वत एके असकें । सप्तरात्रीं मुक्ती देखे । परिक्षितीसी ॥५६॥

" षष्ठमस्कंधे "

**प्रायश्चितानि चीर्णानि नारायणपराङ्मुखम् ॥**
**ननी (तु) पुनन्ति राजद्र सुराकुंभमिवापगा ॥३०३॥**

जसा सुरा भरलाघट । धुतां वास न संडे विट । तैसे
देवे विण तीर्थेंसी झगटे । पवित्रा नव्हे ॥ ५७ ॥ जो
सदा असे ध्यानीं । कथा मुखीं श्रवणीं । तेथवसे तीर्थ
लानी । महापवित्रतो ॥५८॥ पंडु पारधी खेळणें । तेणें
वधिली दोन्ही हरणें । ते फिटावया कारणें । सकळ तीर्थें
केली ॥ ६० ॥ जरी स्वर्गादि तीर्थें केली । तरी पायरी
प्राप्त जाली । ते परमेश्वरी फोडिली । अधोगती ॥ ६१ ॥
दृष्टांत कव ( व्ह ) णें एके पुरुषें रत्नें दाखविली विशेषें
ते देखती डोळसें । अंधळा न देखे ॥ ६२ ॥ तैसे प्रति-

कूळ जन । ते कहीन बुझे ज्ञान । अनुकूल जाणें खूण । सारासार ॥ ६३ ॥ मुचकुंदा मागतां मोक्ष । देव विचारी पडलें समस्त । तेही सांगितले भविष्य । परमेश्वराचें ॥ ६४ ॥ म्हणोनि सकळ उपाय करितां । न चुके जन्म मरण व्यथा । एक परमेश्वर स्मरण कथा । वांचुनिया ॥ ६५ ॥ ऋचीका मागता दान । ते शत एक श्यामकर्ण । इंद्र, ब्रम्हा, हरिहर आपण । बैसले होते ॥ ६६ ॥ देवी म्हणतिले श्यामकर्ण । सह्यांद्री असे अत्रिनंदन । तो देईल तत्क्षण । दत्तराज ॥ ६७ ॥ तयाची सामर्थ्य अनेके । माता तिन्ही देव केलीं बाळके । विनवितां सोडविलीं कवतुकें अनसुया ॥ ६८ ॥ आणिक ब्रम्हा, हरिहर, नारायणें । तया पृथ्वी देती गाऱ्हाणें । मग चिंता करूनि मौन्य । ध्यानस्त जाले ॥ ११६९ ॥

"तथा च दशमे उक्तं"

गिरं समाधौ गगने समीरितां
निशम्य वेधास्त्रिदशानुवाचह ॥
गां पौरुषीं मे शृणुतामराः पुन-
र्विधीयतामाशु तथैव माचिरं ॥ २०४ ॥
पुरैव पुंसावधृतो धराज्वरो
भवद्भिरंशैर्यदुपूपजन्यतां ॥
सयावदुर्व्या भरमीश्वरेश्वरः
स्वकालशक्त्या क्षपयंश्चरेदुवि ॥ २०५ ॥
वसुदेवगृहे साक्षाद्भगवान् पुरुषः परः ॥
जनिष्यते तत्पूजार्थं संभवंतु सुरस्त्रियः ॥ २०६ ॥

आकाशी वाचा जाली अशरीरी । म्हणें परब्रम्ह हो-

ईल वसुदेवाचे घरीं । तयाची सुर, स्त्री । होईल तेथें ॥ ॥११७३॥ तो फोडील पृथ्वीचा भारू । जो देवादि देव गुरू । तोचि जाणावा परमेश्वरू । मोक्ष दाता ॥ ७४ ॥ कथाकल्पतरू आदिपर्व । पार्वती आणि महादेव । तो जाला द्रौपदी पांडव । सेवक देवाचे ॥ ७५ ॥ राम पर-शराम अवतार । हनुमंत्त अकरारुद्र । तेहीं बंदिला अत्रि कुमर देवाधिदेव ॥ ७६ ॥

॥ प्र० ७६ उपसंहार ॥

देव खुण मुद्रा जाणिजे । ते जाणतां साच न मानिजे । मो पींडा ब्रम्हांडा वेगळा बोलिजे । क्षराक्षरासी अतीत ॥ ७७ ॥ जो षड्गुणासी वेगळा । आणि दाहा न कळे तयाची लिळा । असोनि सर्वा वेगळा । तया जाणती चौघे ( शब्दादि ४ ) ॥ ७८ ॥ तो आठासी अगोचर । चौविसा न कळे तयाचा निर्धार । ऐसा गूढ परमेश्वर । तया नेणती चौदा ॥ ७९ ॥ तूं दुर्भिक्षीं सवर्त देवो । भवसागरीं बुडता तरण उपावो । जी तूं महारोगा वैद्यरावो । परम पुरुषा ॥ ८० ॥ तूं अगाध अपरा अपर । तूंतें वानिती ब्रह्मादि रुद्र । शिणला महा महींद्र । अदिकरूनि ॥ ८१ ॥ शेष श्रमला सहस्र मुखें । जी तूं तें नेणें हा त्रिलोक । वाचा त्रया अतीत एक । देवराया तूं ॥ ८२॥ जरी तुझी कृपा होय अनंता । परी तोहि बोले भीत भीता। येर सकळ मतांता । गूढ रूप तूं ॥ ८३ ॥ तूंते वर्णिता पराचकीत । तेथ आपली केवढी मत । परी तूं कृपाळु अनंत भावग्राहिक ॥ ८४ ॥ तुझेनि कथा श्रवण । परिक्षिती दोष निवारण । तुझी लिळा वर्णन । म्हणोनियां

॥ ८५ ॥ जीव देवताचा आश्रय मानिलां । तो मनीं आल्हाद भरिला मा अनंत जेणें आश्राइला । तो सुखी मा सुखी ॥ ८६ ॥ जो सर्वार्थीं अनंत । तो परीपूर्ण वसे जेथ । तेणें आनंद भारित । तयाचेनि प्रसादे ॥ ८७ ॥ परमेश्वराचेनि वचन तयाचेंचि केलें वर्णन । येथ न लावावें दूषण । पंडित संत जनीं ॥ ८८ ॥ पुष्प कोंवळें वृक्ष ग्रामानाम । हरी अहार सातन पूर्वजन्म । तिथचंद्र जीववार उत्तम । तैं ग्रंथ संपूर्ण केला ॥ ८९ ॥ मयंकसुत मुरारी ग्रंथकृत । शके पंघरा शते नारद संतत ॥ १५६० ॥ गोसंवासरीं संपूर्ण ग्रंथ । दर्शन प्रकाश हा ॥ ११९० ॥

विडोपनाम्ना कविना कृतोयं
ग्रंथः परेषां मतबोधनाय ॥
दैत्यारिनाम्ना स्वपथप्रतिष्ठां
कर्तुं दृढां चातितरप्रयत्नैः ॥ ३०७ ॥
पठंति ये ते श्रुतिशास्त्रपारगाः
भवंति लोकत्रितये च सौख्यदाः ॥
जनो हि मूढः पठनेन सन्मतिं
लभेत सोख्यं च यशश्च पुष्कलं ॥ ३०८ ॥

इति परधर्मे महा मोक्षसाधने श्रीनाग देवाचार्यो पदेशे मतमतांतर अध्यात्म विद्या वर्णने दर्शण प्रकाश ग्रंथ समाप्त